नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका


सर्वांगीण विकासाच्या आघाडीवर
पंचवार्षिक योजना म्हणजे भारताच्या सर्वांगीण विकासाची आघाडी. शेती उद्योगधंदे इत्यादि बाबतींत भारताचा कायापालट होत आहे.
या राष्ट्रकार्यांत किर्लोस्कर एंजिनांचा शेतकी, उद्योग व जलवाहतूक इत्यादि क्षेत्रांत फार मोठा वांटा आहे. साहजिकच शेती व औद्योगिक विभागांत काम करणाऱ्या हजारों लोकांचें दैनंदिन जीवन सुलभ व सुखी झालें आहे.
किर्लोस्कर
डिझेल एंजिन
किर्लोस्कर एंजिनें मिळण्यास जरी अवधी लागला, तरी किर्लोस्कर एंजिनांची गरज किर्लोस्कर एंजिनेंच भरून काढतात ही वस्तुस्थिति सर्वमान्य झाली आहे.
५ हॉर्सपॉवर
१० हॉर्सपॉवर
२० हॉर्सपॉवर
४० हॉर्सपॉवर
KOE
किर्लोस्कर ऑईल ऑन्जिन्स लिमिटेड,
खडकी, पुणें ३

[अनुक्रमणिका]











अनुक्रमणिका





# दीपावली

**साहित्य-कला-संगम**

नोव्हेंबर : १९५८
वर्ष १४ वें

## अंतरंग रूपदर्शन

*कलाकृति :*

● चैत्रसखी ● ग्रीष्मरेखा ● मेघश्यामा ● शरदिनी ● हिमांगी ● शिशिरागम ● कर्पूरगौरा

*ललितसाहित्य :*

● वि. स. खांडेकर ● पु. भा. भावे ● स. आ. जोगळेकर ● न. वि. गाडगीळ ● विभावरी शिरूरकर ● अच्युत बर्वे ● बा. भ. बोरकर ● द. मा. मिरासदार ● विजय तेंडुलकर ● इरावती कर्वे ● ग. त्र्यं. देशपांडे ● रूप कथ्थक ● मधुसूदन अकल्लजकर ● म. गो. पाठक ● इंदिरा

आणि

● ग. दि. माडगूळकर यांची गीत-रसवंती

*रसिक हो, किती चतुर वायका ! :*

● मं. वि. राजाध्यक्ष ● मो. ग. रांगणेकर ● अनंत काणेकर ● वसंत सबनीस ● बाळ गंगाधर सामंत ● ग. रा. कामत



दलाल आर्ट स्टूडिओ प्रकाशन

संपादक दीनानाथ दलाल
कार्यकारी संपादक : ग. रा. कामत

× × × × × × × × × × × × × ×

चित्रांचे सेट्स् १९५५–५६ : प्रत्येकीं किंमत १॥ रु. १९५८ : २ रु.
तिन्ही सेट्स्ची एकत्रित ४॥ रु. शिवाय र. पो. खर्च १ रु. वेगळा.



अनुक्रमणिका

प्रतिवर्षाप्रमाणें दीपावलीचा हा अंक वाचकांच्या हातीं देतांना अत्यंत आनंद देत आहे. दीपावलीचा व्याप दरवर्षी वाढत चालला आहे आणि त्याच प्रमाणांत जबाबदारीहि. वाचकांच्या अपेक्षा पूर्ण करणं मोठं कष्टप्रद होत आहे; पण दीपावलीला आपली मानणाऱ्या, विविधक्षेत्रांतील अनेक व्यक्ती आणि संस्था सहकार्यासाठीं हात पुढं करतात म्हणूनच हे कष्ट सुसह्य आणि हलके होतात. प्रा. मं. वि. राजाध्यक्ष, स. आ. जोगळेकर, ग. दि. माडगूळकर, बाळ सामंत, अच्युत बर्वे प्रभृति लेखकमित्र लेखनसाह्य तर करतातच, पण अंकाची योजना आणि अंमलबजावणी या बाबतींतहि त्यांची सल्लामसलत लाभत असते. तूर्त इंग्लंडमध्यें असलेले श्री. पु. ल. देशपांडे यांची गैरहजेरी वाचकांना जाणवेल, पण दीपावलीला ती जाणवत नाहीं; कारण 'रसिकहो, किती चतुर वायका' या लेखमालेच्या योजनेंत त्यांचा हात होताच. 'टॉम अँड बे'चे श्री. गणेशराव तांबे, श्री. रा. ज. देशमुख आणि श्री. स. दाभोळकर यांचे आणि दीपावलीचे स्नेहसंबंध इतके जुने आणि घनिष्ट कीं, त्यांच्यावर कसलंहि काम सोपवतांना आम्हांला संकोच वाटत नाहीं. आणि तें करतांना त्यांनाहि. नागपूरच्या भारतविख्यात शिवराज फाईन आर्टचे श्री. बाबुराव धनवटे आणि त्यांचे बंधू यांच्याकडे दीपावलीच्या रंगीत छपाईचं श्रेय; आणि मौजेचे श्री. भागवत बंधू आणि त्यांच्या मुद्रणालयांतील कुशल कामगार बांधव यांच्याकडे आंतील छपाईच्या उत्कृष्टपणाचं श्रेय. या बाबतींत गतवर्षीपासून जगदीश्वर प्रेसचे श्री. भालचंद्र पाठक आणि त्यांच्या प्रेसमधील कामगारवर्ग यांचंहि परोपरीनं साह्य होत असतं. बाँबे प्रोसेसचे श्री. मोहनराव कामत आणि प्रभात प्रोसेसचे श्री. विष्णुपंत कडव यांची कामगिरी उत्तम ब्लॉक्स करून देण्याची आणि निर्मितिक्षेत्रांत आमचे स्टुडिओंतले सहकारी श्री. परब आणि म. सु. देसाई व वितरणक्षेत्रांत श्री. बाबुराव बागवे हे दीपावलीचे प्रमुख आधारस्तंभ. या सर्व व्यक्ती आणि संस्था इतक्या अगत्यानं आणि परोपरीनं साह्य करतात कीं, दीपावली तेच काढतात, आम्ही केवळ 'निमित्तमात्र' आहोंत असं म्हणण्यांत मुळींच अतिशयोक्ति नाहीं. या सर्वांच्या ऋणांतून इतक्यांतच मुक्त व्हायची इच्छा नसल्यामुळं त्यांचे औपचारिक आभार मानण्याचं धाडस करीत नाहीं. त्यांच्या ऋणाचा निर्देश करणं हें मात्र आमचं कर्तव्य आहे. या सर्वांचा आणि वाचकांचा लोभ निरंतर रहावा हीच आंतरिक इच्छा.

आमचे असंख्य वाचक, लेखक, हितचिंतक, जाहिरातदार, मुद्रक आणि विक्रेते या सर्वांना दीपावलीच्या आणि नव्या वर्षाच्या शुभकामना!


प्रकाशन स्थळ :
दलाल आर्ट स्टुडिओ
४०।४२ केनेडी ब्रिज
मुंबई ४

चित्र छपाई :
श्री शिवराज फाईन
आर्ट लिथो वर्क्स
नागपूर

मुद्रण स्थळ :
मौज प्रिंटिंग ब्यूरो
खटाववाडी, मुं. ४
आणि
श्री जगदीश्वर प्रिंटिंग प्रेस,
गायवाडी मुं. ४


[ पुढील पानावरून चालू ]



## हिमांगी

ऐन माघाचा महिना फुटे पहांट रानांत
ऊब अंगाची पुरेना वारें शिरलें कानांत
सैल पडल्या गात्रांना हवा आगटीचा शेक
खेळ पुरे रे खेळिया काड जाळावर टाक
अवघडल्या कटीला करकचला दुपेटा
गोड वाटतो तोंडाला थेट जाळाचा चपेटा
तन शिणलें तरीही येतें तोंडावर हंसूं
अंधारांतल्या कहाण्या नको रुजाड्नां पुसूं
काय वाई पोरपणा घेशी मातींत लोळण
अजुनीही हुळहुळे माझ्या ओठांची चाळण
आगटीच्या उजेडांत नाहीं कळली रे वेळ
एक कुणा पांखरांची कानीं येत आहे शीळ
आतां उठायला हवें आली जवळ प्रभात
अशी रात्र ना यायची येती जातील हेमंत

• •



## शिशिरागम

डोळां ओघळती आंसूं सुके ओठांची पाकळी
काल भरांत आलेली आज चळली डहाळी
कान मनाला सांगती तुझ्या प्रीतीच्या कहाण्या
किलबिलती मधेंच तार स्वरांत चिमण्या
तुझा हात लागलेला माझा भाग्यवंत घट
आज भरल्या भरेना आला आरंभीं शेवट
काय हरिणीसारखा मला लागला रे चळ
पाण्यावांचून मरेन परी दिसों मृगजळ
तुझ्या कानांत गुंजलीं उरा-उरांच्या भेटींत
सैल झालीं तीं कांकणें नुरे हिरा अंगठींत
पिकलेल्या पानापरी माझी गळली रे नीज
कुण्या सागरीं बुडालें माझ्या स्वप्नांचें जहाज
शिशिरागम जाहला उद्यां येईल वसंत
याच आशेवर एका आंसूं घेतात उसंत

• •



## चैत्रसखी

फूल फुलोऱ्याला यावें  तशी आलीस वनांत
ओठीं आंब्याचा मोहर  तुझ्या कोकिळ मनांत
देती वस्त्राला तणावा  तुझे उधाणले ऊर
कटीहून सुटूं पाहे  सखी तुझा पीतांबर
डोळ्या हवा अंधपणा  ओठा हवासा गारवा
माझ्या सांवळ्या छातींत  देतो हुंकार पारवा
माझ्या डोईंत डोलतें  पीस मोराचें मंथर
तुझ्या गोरट्या अंगांत  फिरे विजेची लहर
हिरवळीचें आसन  मृदंगाचा करूं लोड
आज कंठांत दाटलें  गाण्याहून 'कांहीं' गोड
घडी नाहीं ग यायची  पुन्हां आजच्यासारखी
मी ग तहानेला चैत्र  तूं तो माझी चैत्रसखी

• •



## मेघश्याम

आली मेघश्यामा वर्षा  आला घोंघावत वारा
काळवले सारे रंग  आला आकार अंधारा
दावे तोडून धांवले  बैल उधळून रानीं
कडाडली रे विजली  बसे कानठळीं कानीं
ओल्या ढगांत तुटली  एक बगळ्यांची माळ
आल्या झेंपावत धारा  भरारते वावटळ
असा कांहीं सुटे वास  रानीं भिजल्या मातीचा
हवा वाटला विळखा  मला पुरुष-जातीचा
खालीं वर काळें रान  भर दिवसां अंधार
कोसळल्या पावसांत  तुझा गावला आधार
काळ्या केसांच्या डोहींत  तसे रेशमी लपले
तुझें कणखर बोट  माझ्या काळेंत खुपलें

• •



ग. दि. माडगूळकरांची

# *गीत-रसवंती*

•



## ग्रीष्मरेखा

जाळाविण जळूं लागे  साऱ्या जगाचा पसारा
कुठें लपला कळेना  रोज रहाटता वारा
वैशाखाच्या काहिलीनें  अंधारलीं ग लोचनें
जीवा शरीर पेलेना  नको जाहलीं वसनें
सांवलींत जलाशय  होता एक सुस्तावला
थर्थरेला माझा जीव  मी ग पाण्यांत फेंकला
थंडगार त्या पाण्यांत  डुंबडुंबलों अखंड
माझ्या आकाराचा झाला  तरंगता मेघखंड
नुरे आठव उन्हाचा  आंत बाहेर गारवा
घेऊं लागल्या मासळ्या  तळपावलांचा चावा
पाणवठ्यावरी दिसे  अंगवठा तो अनोखा
आरस्पानी वसनांत  तूं ग ओलेती सुरेखा
दंतव्रणासम दिसे  तुझ्या ऊर्मीची मालिका
शीतळल्या देहांतून  उसळली ग्रीष्मरेखा

• •



## शारदिनी

कमळांच्या छत्राखालीं  जोड्या हंसांच्या जमल्या
दोन जिवाच्या मैत्रिणी  हिरवाळींत रेलल्या
धरणीशीं भेटूं आली  एक उत्फुल्ल डहाळी
गूज ऐकाया लपलीं  नदीतीरींचीं लव्हाळीं
एका कुमारीला सांगे  एक लाजरी प्रेमिका
कसें कुठें आणि कधीं  तिनें पाहिलें नायका
डोळा दाटलें चांदणें  भेट ओठांची भावुक
कुमारीच्या उरीं उठे  एक झोंबरी झुळुक
येतो एकीला आठव  एक स्वप्नास चितारी
शीतळल्या चांदण्यांत  आल्या सुगंधी लहरी
किती रात झाली याचा  दोघींनाही नाहीं धाक
दोघींनाही हांकारती  काव्यांतले चक्रवाक
दोन तरुण मनांचा  आहे चालला संवाद
रातफुलें फुलारतीं  झोंपीं जाईना शरद

• •

अनुक्रमणिका








अनुक्रमणिका



# सुरेखा

## पु. भा. भावे

*जोडीनं जाणाऱ्या त्या दोघांचं चित्र मोठं विरंगत दिसत होतं. नकळत मीच त्या चित्रांत रंग भरले होते. माझ्या त्या भयानक कर्तृत्वाकडे मी मूढपणें पहात बसलों....*

माझ्याकडे पुष्कळशीं मुलं येतात, मुली येतात, बाया येतात आणि म्हातारेकोतारेसुद्धां येतात. कुणाला माझं लिहिणं आवडतं म्हणून कुणी येतात. कुणाला बोलणं आवडतं म्हणून कुणी येतात. कुणाला माझीं मतं आवडतात आणि तसं सांगायला कांहीं माणसं माझ्याकडे येतात. आणि कुणाला माझं कांहीं म्हटल्या कांहींच आवडत नाहीं, आणि तेंसुद्धां मला सांगून टाकायला माणसं माझ्याकडे येतात. माणसं माझ्याकडे येतात, याचं कुणाला कांहीं विशेष वाटत नाहीं. पण एखादी तरुण मुलगी, त्यांतहि देखणी आणि तरुण मुलगी, आणि त्यांतहि देखणी, तरुण आणि कॉलेजांत शिकणारी एखादी मुलगी माझ्याकडे येऊं लागली, म्हणजे मात्र माणसं अगदीं बेचैन होऊन जातात. आणि मग थोडासा बेचैन मीसुद्धां होतों. माझ्या पुन्हां एकदां ध्यानांत येतं कीं, आमची पुरोगामी मंडळी कांहींहि बडबडत असली, तरी स्त्री-पुरुष-भेद कांहीं अद्याप आम्ही विसरलेलों नाहीं. स्त्री-पुरुष-समतेचा टाहो फोडणारे पुरोगामीसुद्धां तो भेद मुळींच विसरलेले नाहींत. कारण माझ्याकडे येणारी एखादी मुलगी पाहिली कीं, हे बापडे पुरोगामी सगळ्यांत जास्त अस्वस्थ होतात. आणि मग वेगवेगळ्या कारणामुळं मीहि अस्वस्थ होतों.

आज मी सुरेखामुळं अस्वस्थ झालों होतों. सुरेखा तरुण होती, सुरेख होती, तरतरीत होती आणि कॉलेजांत शिकत होती. अगदीं अलिकडेच तिची आणि माझी ओळख झाली होती. अलिकडे म्हणजे गेल्या दीड दोन महिन्यांत. पण ह्या दीडदोन महिन्यांत पुष्कळदां ती माझ्याकडे आली होती. पुष्कळदां प्रतिदिवशीं आली होती. कधीं दिवसांनून दोनदहि आली होती. निदान दोन दिवसांनून एकदां तरी ती माझ्याकडे येतच असे. आणि आजं पुरते पांच दिवस सुरेखा माझ्याकडे आली नाहीं. ती न आल्यामुळं मला कसंसंच वाटलं. खरं सांगायचं तर मला फार चुकल्या-सारखं वाटलं. मी अगदीं अस्वस्थ होऊन गेलों. माझी बायको चांगली

दी. २





अनुक्रमणिका

३–४ महिन्यांसाठीं माहेरीं गेली होती. आणि सुरेखाच्या संगतीची मला चटक लागली होती. सुरेखाच्या संगतीची मला संवय झाली होती, किंवा तिची संगत मला आवडूं लागली होती, किंवा तिच्या संगतीचा मला मोठा विरंगुळा वाटे असं कांहीतरी मी प्रथम लिहिणार होतों. पण तें खरं नव्हे. तें आपलं 'साहित्यिक' लिहिणं झालं असतं! खरं सांगायचं, म्हणजे सुरेखाच्या संगतीची मला चटकच लागली होती. एरवीं ती ४–५ दिवस आली नाहीं, म्हणून मला इतकं घाबरंघुबरं होऊन जाण्याचं काय कारण होतं? तिच्यासाठीं मी अगदीं दिवस, घटका, प्रहर आणि पळं कां मोजीत बसलों होतों? परंतु मी तिच्यासाठीं घटका, पळं मोजीत होतों हेंच खरं. गेल्या ५ दिवस आणि ७ घंट्यांत सुरेखा माझ्याकडे आली नव्हती!

आणि मग ती अकस्मात् माझ्याकडे आली. माझा चेहेरा उजळला. वृत्ती पालटल्या. उल्हासाची एक लाट माझ्या शरीरभर पसरून गेली.

"ये, सुरेखा!" मी म्हणालों, "गेले पांच दिवस कुठं होतीस?"

"इथंच होते." मी समोर केलेल्या आसनावर बसत सुरेखा म्हणाली.

"काय करीत होतीस?" गांभीर्याच्या आवरणाखालीं माझ्या मनाचे उद्रेक लपवण्याचा प्रयत्न करीत मी विचारलं, "अभ्यास?"

"अं हं!"

"मग काय करीत होतीस?"

"वाचत होते."

"काय?"

"तुमचीं पुस्तकं!"

"माझीं पुस्तकं मोठी भाग्यवान् आहेत!"

"नाहीं. तीं पुस्तकं वाचणारीं माणसं भाग्यवान् आहेत. खरंच, तुमचीं पुस्तकं फार चांगलीं आहेत."

"चांगलीं असोत कीं वाईट असोत. पण तीं भाग्यवान् निश्चित आहेत!"

"कशीं?"

"माझ्या पुस्तकांना तुझी संगत मिळाली, पण मला कांहीं मिळाली नाहीं."

"म्हणजे?"

"म्हणजे काय! गेले पांच दिवस मी तुझी वाट पहात होतों, सुरेखा. आणि तूं माझीं पुस्तकं वाचीत बसली होतीस!"

"तुमचीं पुस्तकं वाचतांना तुमच्या संगतींत असल्यासारखंच वाटतं."

"हें मात्र मला परवडणार नाहीं."

"कां?"

"कारण तूं आली नाहींस म्हणजे तूं आलेली नाहींस असंच मला वाटतं. बरं पण तें जाऊं दे. गेल्या पांच दिवसांचा वचपा आपण आज काढून टाकूं."

"म्हणजे काय करूं?" आपले हरणासारखे बोलके डोळे वर उचलीत सुरेखानं विचारलं.

"चला. आज आपण 'ग्रीन कॉर्नर' मध्यें जेवायला जाऊं."

"आणखी?"

"आणखी मग फिरायला जाऊं."

"आणखी?"

"आणखी मग सिनेमाला जाऊं. आज एक फार चांगलं चित्र लागलं आहे. 'पोर्ट्रेट ऑफ् जेनी.' थांब हं. मी कपडे करतों."

"कशाला?"

"वाः! मग सिनेमाला कपडे न करतांच जायचं?"

"तसं नाहीं."

"मग कसं?"

"रागावणार नसाल तर सांगते."

"सांग. सांग." मी अगदीं प्रेमाच्या पान्हा फुटल्यासारखा बोलूं लागलों, "मी तुझ्यावर कधीं रागावलों आहे का बरं?"

"तर मग मी कांहीं आज तुमच्याबरोबर सिनेमाला येणार नाहीं!"

"कां?" जागच्या जागीं उभा होत मी विचारलं, "अग, मी हें चित्र पूर्वीं एकदां पाहिलं आहे. फार चांगलं चित्र आहे."

"चित्र चांगलं असेल" मान खालीं घालीत सुरेखा म्हणाली, "आणखी मी तें पाहीनसुद्धां. पण तुमच्याबरोबर नाहीं."

"कां?" आ वासून मी विचारलं.

"मी नुकतंच तुमचं एक पुस्तक वाचलं." सुरेखा सांगूं लागली.

"वाचलं असशील. मग त्याच काय?" मी घाईला येऊन विचारलं.

"त्या पुस्तकांत तुम्ही लिहिलं आहे कीं, लग्न न झालेल्या तरुण मुली आजकाल परक्या पुरुषांबरोबर सिनेमाला जातात. जवळ जवळ बसतात. त्यांचा एकमेकांना स्पर्श होतो. थिएटरांत अंधेर असतो. बहुतेक बोलपट शृंगारिक आणि उत्तेजक असतात. स्त्रीपुरुषांना मोहांत पाडणारी ही सगळी परिस्थिति आहे. हे असे प्रसंग स्त्रीपुरुषांनीं आणि विशेषतः लग्न न झालेल्या मुलींनीं कटाक्षानं टाळले पाहिजेत. त्यांनीं विषाची परीक्षा पाहूं नये!"

"असं मी लिहिलं आहे?" श्वास रोखून मी विचारलं.

"हो."

"कुठं?"

"'लाल कंदील' या निबंधसंग्रहांत. फार चांगले निबंध आहेत ते. फार परिणाम झाला तुमच्या लिहिण्याचा माझ्यावर. तेव्हांपासून मी ठरवलं"

"काय ठरवलंस?" मी त्रासिक स्वरांत विचारलं.

"कीं शृंगारिक चित्रांना जायचं नाहीं."

"अग, पण पोर्ट्रेट ऑफ जेनी हें शृंगारिक चित्र नाहीं!"

"नसेल!" आपली कमळाच्या देठासारखी लवचिक मान कलती करून सुरेखा म्हणाली, "पण थिएटरांत अंधार तर असेल ना?"

—अर्थात् थिएटरांत अंधार होणं अपरिहार्य हतं. आवश्यक होतं. आणि गमतीचंहि होतं. "अर्थात् थिएटरांत अंधेर होईल." मी तिचं विधान मुकाट्यानं मान्य करीत म्हणालों.

"आणि तुम्ही माझ्या शेजारीं असाल." सुरेखा म्हणाली.

हें तिचं बोलणंहि अचूक होतं. तें मान्य करणं मला प्राप्तच होतं. डोकं खाजवीत मी म्हणालों, "होय. मी तुझ्या शेजारीं असेन खरा!"

"आणि मी तरुण कुमारिका आहे. आणखी तुम्ही पुरुष आहांत!"

अर्थात् माझं पौरुष मला नाकारतां येण्यासारखं नव्हतं. सुरेखा तरुण कुमारिका होती हेंहि खरंच होत. एवढंच नव्हे, तर ती देखणी आणि तरुण कुमारिका होती. आणि आतां ह्या सगळ्या कारणांसाठीं माझ्यासवें सिनेमाला यावयास ती नकार देत होती. आणि मी तर आजचा कार्यक्रम मनोमन ठरवून टाकला होता. तिच्या नकारानं माझा हिरमोड झाला होता. मला थोडासा रागहि आला होता. म्हणून निकरावर येऊन मी म्हणालों, "तर मग नाहीं येत तूं माझ्याबरोबर सिनेमाला?"

"नाही!"

"पहा. चित्र फार चांगलं आहे बरं?"

"मग मी तें माझ्या एखाद्या मैत्रिणीबरोबर पाहीन."

"मैत्रिणीबरोबर पहाशील?" निरुट स्वरांत मी विचारलं, "मग ह्यापूर्वीं इतके वेळां माझ्याबरोबर सिनेमाला आलीस तें?"

"तेव्हां मला कल्पना नव्हती."

"कसली कल्पना नव्हती?"

"कीं पुरुषाबरोबर असं एकटं सिनेमाला जाण्यांत कांहीं वाईट असतं पण तुमचं 'लाल कंदील' वाचल्यावर मला कळलं कीं, ती विषाची परीक्षा आहे! फार परिणाम झाला तुमच्या लिहिण्याचा माझ्यावर. तुम्ही फार तळमळून लिहितां. अगदीं माणसाच्या काळजाला हात घालतां. फार जिवंत लेखणी आहे तुमची!"

"माझी जिवंत लेखणी मरूं दे!" वैतागानं मी म्हणालों.

"छेः छेः" आपल्या पोरकट किनऱ्या स्वरांत सुरेखा बोलूं लागली, "भलतंच काय बोलतां? तरुण पिढीवर केवढे उपकार आहेत तुमचे! तुम्ही त्यांना त्यांच्या वाटेंतले खाचखळगे दाखवतां, त्यांना सावध करतां! मलासुद्धां तुम्ही सावध केलंत! पुन्हां नाहीं मी एकटी कुणा पुरुषाबरोबर सिनेमाला जाणार. अगदीं शपथपूर्वक सांगतें, नाहीं जाणार!"

आमचें राज्य!.... आमचा राज्यकारभार!....

: १ :

द्विभाषिकाची दही-हंडी!



सुरेखाचं बोलणं मी ऐकतच राहिलों. टांचणी लागलेल्या फुग्यासारखी माझी अवस्था झाली. सुरेखाबरोबर आजचा दिवस घालवण्याची माझी तीव्र इच्छा होती. "सिनेमाला नाहीं तर नाहीं, निदान फिरायला आणि जेवायला तरी चल." असं तिला म्हणावच्या मी बेतांत होतों. पण कष्टानं मी माझं मन आवरलं. सुरेखापेक्षां मी सगळ्याच दृष्टींनीं मोठा होतों. एखाद्या कॉलेजमधल्या पोराला शोभेल, असा लोचट आग्रह मी तिला करणं बरं दिसलं नसतं. काय बोलावं तेंहि मला कळेना.

पण सुरेखानं मला बोलायची संधिच दिली नाहीं. ती मला म्हणाली, "तुम्ही मात्र अवश्य सिनेमाला जा. मी आतां जातें. म्हणजे मग हा दुपारचा शोसुद्धां तुम्हांला मिळेल."

आणि मग काय होत आहे तें मला कळण्यापूर्वींच सुरेखा पायांत सँडल्स सरकावून निघून गेली.

"अग. सुरेखा, जरा थांबशील तर!" असं मला म्हणायचं होतं. पण माझ्या तोंडांतून शब्द उमटेना. माझी जीभ टाळ्याला चिकटून बसली होती. विरक्त आणि कष्टी मनानं मी सुरेखाच्या जाणाऱ्या आकृतीकडे नुसतं पहात राहिलों. अर्थात् त्या दिवशीं मी 'पोर्ट्रेट ऑफ जेनी'ला गेलों नाहीं त्यानंतर मी फारसा कुठं गेलोंच नाहीं. पुन्हां सुरेखा माझ्याकडे कधीं येते, ह्याची मी उतावीळपणें नुसती वाट पहात बसलों. दोन दिवस गेले. चार गेले. सहा गेले आणि सात गेले. माझी उत्कंठा आणि विमनस्कता अगदीं शिगेला जाऊन पोंचली. मनाला एक प्रकारची विलक्षण खिन्नता आली आणि हुरहूर लागून राहिली.

आणि मग आठव्या दिवशीं सुरेखा पुन्हां माझ्यापुढं येऊन उभी राहिली. तिला पहातांच माझ्या मनात प्रसन्नतेची लाट उठली. मधल्या ७ दिवसांतली ओसाडी मी

पार विसरून गेलों. आणि तिचे खांदे धरून तिला उमाळ्यानं हलवीत म्हणालों, "गेले सात दिवस कुठं होतीस, बाई?"

"इथंच होतें."

"काय करीत होतीस? अभ्यास?"

"अभ्यास केला थोडा. पण तुमचीं पुस्तकं वाचीत होतें. फार छान लिहितां तुम्ही. अगदीं जिणं सार्थक झाल्यासारखं वाटतं तुमचीं पुस्तकं वाचतांना!"

"बरं बरं." मी घाईनं म्हणालों, "आज आपण आपल्या वेळेचं सार्थक दुसऱ्या कुठल्या तरी रीतीनं करूं या!"

"कुठल्यां रीतीनं?" आपले काळेशार डोळे वर उचलून मोठ्या निरागस मुद्रेनं माझ्याकडे पहात सुरेखानं विचारलं.

"आज आपण सिनेमाला जाऊं, फार चांगलं चित्र लागलं आहे."

"बरं कां—" मधेंच आपला रेशमी तळवा पुढं करून मला अडवीत सुरेखा म्हणाली, "मी तुमचं तें पोर्ट्रेट ऑफ जेनी पाहिलं बरं कां!"

"कुणाबरोबर पाहिलंस?" कोरड्या स्वरांत मी विचारलं.

"मैत्रिणीबरोबर पाहिलं. खरंच, फार छान चित्र होतं."

"तर मग तसंच फार छान चित्र आतांहि लागलं आहे. 'ब्लू एंजल' नांवाचं. एका सरळमार्गी वयस्क प्राध्यापकाचं एका तरुण नर्तकीवर प्रेम कसं बसलं; आणि त्या बापड्याचा कसा भयंकर शेवट झाला, तें खरंच तूं पहाच! अगदीं काळजाला भिडेल असंच चित्र आहे!" मी उत्साहानं म्हणालों.

"म्हणजे चित्र प्रेमाचं आहे ना पण?" आपल्या मखमली ओठांची पुरचुंडी करीत सुरेखानं विचारलं.

"अं...होय" मी चांचपडत बोलूं लागलों, "पण तसं कांहीं तें सवंग चित्र नाहीं. मार्लिन डिट्रिच आणि एमिल जॅनिंग्जचीं अप्रतिम कामं त्यांत आहेत. जॅनिंग्जचं नांव तू ऐकलं आहेस कीं नाहींस? फार मोठा नट आहे, जुना नट आहे, चित्रहि फार जुनं आहे, पण फार चांगलं आहे. एकदां पाहिलंच पाहिजे असं हें चित्र आहे."

"मग मी तें पाहीन." सुरेखा म्हणाली.

"तर मग निघायचं?" मी उठून उभा होत म्हणालों, "हा अकराचा शो आपल्याला सहज सांपडेल."

"नाहीं. मी हा शो नाहीं पहाणार."

"मग कोणता पहाणार?"

"पाहीन कोणता तरी. पण तुमच्याबरोबर नाहीं पहाणार!"

"कां?" तीव्र स्वरांत मी विचारलं.

"रागावूं नका." विनवणीच्या स्वरांत ती बोलूं लागली, "मागंच नाहीं का मी तुम्हांला सांगितलं कीं, कुठल्याहि पुरुषाबरोबर ह्यापुढं मी एकटी सिनेमाला जाणार नाहीं म्हणून! खरोखर तुमच्या उपदेशाचा माझ्यावर फार परिणाम झाला आहे. किती जळजळीत लिहितां तुम्ही!"

आपले काळे डोळे उचलून मोठ्या कौतुकानं ती माझ्याकडे पाहूं लागली. तिच्या त्या डोळ्यांकडे पहातांच माझ्या मनाची विलक्षण घालमेल झाली. तिला आजहि इथून तसंच निघून जावं ही कल्पना मला मुळींच सहन होईना. आवेगानं मी म्हणालों,

"बरं, तर मग आज निदान ग्रीन कॉर्नरमध्यें जेवायला जाऊं या!"

कांहीं क्षण ती स्तब्ध झाली. व मग संकोचलेल्या स्वरांत म्हणाली, "नाहीं. मला वाटतं, तेंसुद्धां नाहीं जमणार!"

"कां नाहीं जमणार?" अकारण आवेशानं मी विचारलं.

"ग्रीन कॉर्नरमध्यें आपण बंद खोलींत बसतों, नाहीं का?"

"होय. बसतों."

"आपण दोघंच बसतों."

"अर्थात् बसतों."

"आणि आपण हॉटेलचं म्हणजे बाजारचं अन्न खातों—"

"हो. हॉटेलचं अन्न खाण्यासाठींच आपण हॉटेलांत जातों ना?"

"पण आतां नाहीं मी हॉटेलांत जाणार!"

"कां?" मी तिरसट स्वरांत प्रश्न केला.

"मी तसं ठरवलं आहे!"

"अग, पण कां?" मी जास्तच चिडखोर स्वरांत विचारलं.

"बाजारांत खाणं एकंदरींतच वाईट असतं. तशांत बायकांनीं हॉटेलांत खाणं तर फारच वाईट. बायका या गृहदेवता आहेत. त्यांनीं स्वतः घरीं स्वयंपाक केला पाहिजे. आणि दुसऱ्याला वाढलं पाहिजे. बाईनं बाहेर जाऊन खाणं मुळांतच वाईट. आणि दुसऱ्या पुरुषाबरोबर एका बंद खोलींत बसून जेवण घेणं तर फार फार वाईट. ती वाईट गोष्ट ह्यापुढं मी कधींहि करणार नाहीं."

"हें सगळं शहाणपण तुला कुणी शिकवलं?"

"तुमच्याच पुस्तकांतून मी हें सगळं शिकलें."

"कुठलं माझं पुस्तक?" मी रागानं विचारलं.

"लाल कंदील." सुरेखा भक्तिपूर्वक सांगूं लागली, "लाल कंदील, भाग दुसरा! त्यांत तुम्ही लिहिलं आहे कीं, मुलींनीं परक्या पुरुषाबरोबर सिनेमाला जाणं जितकं वाईट, तितकंच जवळजवळ हॉटेलांत जाऊन खाणंहि वाईट. थिएटरांतला अंधेर जितका धोक्याचा, तितकाच हॉटेलच्या प्रकाशांत दडलेला अंधेरहि धोक्याचा; फार तळमळून लिहिलं आहे तुम्ही. फार परिणाम झाला माझ्यावर तुमच्या लिहिण्याचा. तेव्हांपासून मी ठरवलं कीं, ह्यापुढं कधीं हॉटेलांत जेवायला जायचं नाहीं!"

"आणि ह्यापूर्वीं दोन डझन वेळां आलीस तें?" विचारलं.

"हॉटेलांत खाणं वाईट आहे ह्याची तेव्हां मला कल्पनाच नव्हती." त्याच निरागस स्वरांत सुरेखा सांगूं लागली, "आजकाल बहुतेक मुली हॉटेलांत खातात. आमच्यासारख्या खोली घेऊन बाहेर शिकायला रहाणाऱ्या मुलींना तर बाहेर खाण्याविना उपायच नसतो. पुष्कळदां पुरुषांच्या सोबतीनं आम्ही जेवायला जातों. पण आतां मला कळलं कीं, तें सारं चूक आहे!"

"नाहीं, नाहीं, सुरेखा—" मी जीव तोडून ओरडलों, "तें सारंच चूक आहे असं मी म्हणत नाहीं. आजकाल परिस्थितीच पुष्कळशी पालटली आहे."

"नाहीं." दृढ स्वरांत सुरेखा म्हणाली, "तें सारं चूकच आहे. माणसं परिस्थिति घडवीत असतात. माणसांनीं परिस्थितीचं दास बनायचं नसतं. फार उत्तम प्रकारें हें सगळं तुम्ही सिद्ध केलं आहांत. मला तुमचं म्हणणं अगदीं पटलं. तुमचा शब्द न् शब्द माझ्या काळजावर कोरला गेला. केवढं विलक्षण सामर्थ्य आहे तुमच्या लेखणींत!"

सुरेखा आपले जादूचे डोळे उचलून पुन्हां माझ्याकडे त्याच आदराच्या दृष्टीनं पाहूं लागली. तिचे ते डोळे पहातांच माझा जीव गलबलला. माझ्या लेखणीच्या सामर्थ्याला मी लाख शिव्या मोजल्या. माझ्या लेखणींत इतकं सामर्थ्य माझ्या मनांत मुळींच नव्हतं. सुरेखाच्या डोळ्यांत आणि सुरेखाच्या सहवासांत फार अधिक सामर्थ्य असल्याचा अनुभव मी ह्या क्षणीं घेत होतों. त्या सहवासावर मी प्रेम करीत होतों. आणि तो सहवासच सुरेखा मला नाकारीत होती. ती माझ्याबरोबर सिनेमाला येणार नव्हती. जेवायला येणार नव्हती. आणि सिनेमाला येण्याविषयीं


दीपावली शुभचिंतन
किर्लोस्कर
अन्नधान्यासाठीं परदेशीं जाणाऱ्या पैशाचा ओघ थांबविण्यास शेतीचें उत्पादन वाढविणें हा एकच उपाय आपल्यापाशीं आहे. तें काम शेतीचीं आधुनिक अवजारें आणि यंत्रसामुग्री वापरल्याशिवाय कसें शक्य आहे ?
एवढ्यासाठीं येत्या हंगामाकरितां खात्रीलायक किर्लोस्कर मालाची निवड करून स्वार्थ व देशकार्य साधा.
अधिक माहितीसाठीं लिहा :—
किर्लोस्कर ब्रदर्स लि.
किर्लोस्करवाडी, द. सातारा
TOM & BAY LTD.

किंवा जेवायला येण्याविषयीं मी तिला आग्रहं करणंहि कठीण होतं. माझींच वाक्यं ती माझ्या तोंडावर फेंकून स्मरीत होती. माझ्याच लेखणीनं माझा गळा कापला जात होता. मी खरोखर कुठं कुठं काय काय भरकटून ठेवलं होतं देव जाणे !

पण सुरेखा ह्यापुढं मजबरोबर सिनेमाला किंवा जेवायला येणार नाहीं, ही गोष्ट जवळजवळ निश्चित झाली होती. सुरेखाला मी ओळखत होतों. ती फार भावनाप्रधान मुलगी होती. आणि उत्कट भावनेचीं माणसं साधारणतः असतात, तशी हट्टी होती !

तिच्या नकारामुळं मी चिडलों आहे, कष्टी झालों आहे, हें ओळखण्याइतकी सुरेखा बुद्धिमान् होती. आणि आपल्यामुळं दुसऱ्याला दुःख झालेलं पाहून वाईट वाटण्याइतकी हळवीहि होती. माझ्या उतरलेल्या चेहेऱ्याकडे पहात ती म्हणत होती, "तुम्हाला नाहीं म्हणतांना मला फार वाईट वाटतं."

" तुला खरंच वाईट वाटत असेल, तर आतां माझं एक ऐकशील ?"

"काय ?"

"माझ्याबरोबर फिरायला चल."

"अं ?" विचार करीत सुरेखा थांबली. तिचा विचारी चेहेरा पाहून माझ्या पोटांत गोळा उठला आणि मस्तकांत तिडीक उठली व तिचे खांदे हलवीत मी ओरडलों, "विचार कसला करतेस ? फिरायला न जाण्याविषयीं सुद्धां मी कुठं कांहीं लिहून ठेवलं आहे कीं काय ?"

"थांबा. ऐका तर—" सुरेखा माझे हात दूर करीत म्हणाली.

"कांहीं ऐकत नाहीं." खांद्यावर कोट टाकून हातानं तिला बाहेर ओढीत मी म्हणालों, "आज माझं एवढं तुला ऐकलंच पाहिजे !"

—आणि मग मी आणि सुरेखा गांवाबाहेर हिरव्या रानांत लांब लांब फिरायला निघून गेलों. प्रथम कांहीं वेळ सुरेखा जरा अस्वस्थ होती. पण मग ती नेहमींसारखी हंसूं बोलूं लागली. बाहेरच्या हिरव्या सौंदर्यामुळं माझ्या आणि तिच्याहि वृत्ती उल्हसित होऊन गेल्या. सुरेखाची प्रसन्नता त्या दिवशीं इतकी परमावधीला गेली कीं, अखेर ती माझ्याबरोबर ग्रीन कॉर्नरमध्यें जेवायलाहि आली आणि लिबर्टींत सिनेमालाहि आली !

• •

मला वाटलं, सुरेखा आतां पुन्हां पूर्वपदावर आली. माझं अस्वस्थ झालेलं मन पुन्हां निरामय बनलं. मला वाटलं, सुरेखा आतां पुन्हां वारंवार माझ्याकडे येणार. नेहमींसारखी हंसणार, बोलणार आणि गाणार. अगदीं १–२ दिवसांतच ती माझ्याकडे येईल असं मला वाटत होतं. तसंच तिनं मला सांगितलंहि होतं. पण घडलं मात्र वेगळंच. दुसऱ्या दिवशीं सुरेखा माझ्याकडे आली नाहीं. तिसऱ्या दिवशींहि आली नाहीं. मला चुकल्यासारखं वाटलं, पण मी फारसा अस्वस्थ झालों नाहीं. आमच्या एकत्र फिरण्याच्या व जेवणाच्या स्मृतीच अजून मी मनांत घोळवीत होतों. त्या स्मृतींचा आनंद २–३ दिवस मला पुरला. पण तिसरा दिवस उजाडला आणि संपला. तरी सुरेखा आली नाहीं. आतां हळूहळू मी पुन्हां अस्वस्थ होऊं लागलों. ३ दिवस गेले, ६ गेले, १२ गेले, १५ गेले, आणि २० कष्टमय दिवस रेंगाळत निघून गेले. पुरते ३ आठवडे लोटले, आणि तरीहि सुरेखा आली नाहीं. आतां मात्र माझी अस्वस्थता, माझा संदेह व माझी वेदना शिगेला पोचली. माझ्याकडे आल्यावर सुरेखा ज्या वेत्रासनावर बसे, त्या आसनाकडे मी तुटल्या काळजानं पाहूं लागलों, ग्रीन कॉर्नरमधल्या आमच्या ठरीव खोलींतहि मी उगाचच जाऊन आलों. लिबर्टी





अनुक्रमणिका

थिएटरला हे मी वेड्यासारख्या प्रदक्षिणा घातल्या. पण सुरेखा मला दिसली नाहीं. मला भेटल्याविना इतके दिवस आजवर ती कधींहि राहिली नव्हती. तर मग काय सुरेखा आजारी असेल? आणि ह्या शंकेनं माझं काळीज चरकलं. कॉलेजांतल्या एखाद्या पागल पोराप्रमाणें त्या दिवशीं मी सुरेखाच्या वाटेवर धरणं देऊन उभा राहिलों. मुलांमुलींच्या रांगांमागून रांगा घोळक्यांमागून घोळके माझ्या दृष्टीसमोरून निघून जात होते. दहा झाले. साडेदहा झाले. अकरा वाजून गेले. पाण्याचा एखादा प्रवाह गडगडत रोरावत त्याची केवळ करंगळीएवढी धार व्हावी, व मग थेंबाथेंबानं तीहि आटत जावी, तशी वाटेवरली विद्यार्थ्यांची रहदारी आटत होती. आणि तरीहि त्या झिरपणाऱ्या रहदारींत सुरेखा कुठं दिसत नव्हती. माझ्या पोटांत पोकळी उत्पन्न झाली होती. डोकं भिरभिरत होतं. काय करावं हें मला कळेना. क्षणभर मला असंहि वाटलं कीं सरळ सुरेखाच्या विद्यालयांत जावं व तिचा शोध घ्यावा. पण तेंहि मला शोभण्यासारखं नव्हतं. आणि माझं वाटेवर उगाचच पहारा देत उभं रहाणं हे मोठं संशयास्पद वाटण्यासारखं होतं. म्हणून मी उगाचच कोंपऱ्यावरील चांभारासमोर ठोकाठोकी देण्यासाठीं जोडे फेंकले. व पुन्हां एकदां वाटेवरील रहदारीकडे डोळे लावून उभा राहिलों.

—आणि मग मला हळूहळू चढ चढणारा सुरेखाचा रिक्षा दिसला. धपधपत्या काळजानं मी पहात होतों. सुरेखाचा रिक्षा वळणावर येत होता, चांभाराच्या दिकानासमोर आला होता.

"सुरेखा!—" अनावर होणारी भावना व अनावर होणारा स्वर प्रयासानं आवरीत मी तिला हांक दिली, "सुरेखा! थांब—थांब!"

सुरेखानं वर पाहिलं. तिनं खूण केली व रिक्षा थांबला. झपाझप मी तिच्या दिशेनं चालत गेलों. "आजारी होतीस का, सुरेखा?" मी विचारलं.

"होते ४–५ दिवस आजारी—"

"पण मग इतके दिवस तूं कां आली नाहींस?"

"नाहीं आलें." सुरेखानं कांहीशा अस्वस्थ स्वरांत उत्तर दिलं.

"अग, पण कां नाहीं आलीस?"

"नाहीं आलें झालं!"

तिनं त्याच शब्दांची पुनरावृत्ति केली. मला तिचं तें उत्तर आवडलं नाहीं. पण तिच्याशीं भर वाटेवर वादविवाद करणं शक्य नव्हतं. मी केवळ इतकंच म्हणालों, "तर मग आज तुला यायला पाहिजे."

"आज नको." ती विचार करीत म्हणाली.

"आज नको तर केव्हां?" मी चढलेल्या स्वरांत प्रश्न केला.

"आज नको. परवां!" ती म्हणाली.

"परवां तरी निश्चित येणार कां?"

"येईन. येईन." एखादा अवघड विषय घाईघाईनं आवरता घ्यावा, अशा प्रकारें ती बोलली. आणि तिचा रिक्षा चालू लागला.

सुरेखा गेली त्या दिशेनं कांही क्षण मूढपणें मी नुसता पहात राहिलों; आज नव्हे, परवां! ती म्हणाली होती...आज नव्हे, परवां! आज कां नाहीं? उद्यां कां नाहीं? परवांच कां म्हणून? ह्यापूर्वी सुरेखा लागोपाठ माझ्याकडे कितीदां तरी आली होती. मग आताच तिला कसलं काम होतं? कसली अडचण होती? छेः छेः! माझ्याकडे येणं ती नुसती लांबणीवर टाकीत होती. एक दिवस नव्हे, दोन दिवस नव्हे, पुरते तीन आठवडे ती माझ्याकडे आलीच नव्हती. आणि आतांहि ती माझ्याकडे येणं पुढं ढकलीत होती. सुरेखा फार दिवस आजारीसुद्धां नव्हती. ती

मला टाळीत होती. एकप्रकारें ती माझा जाणूनबुजून अपमान करीत होती !

अपमानाच्या ह्या कल्पनेनं माझं मस्तक तडतडलं. ती माझा अपमान करीत होती. आणि तरी मी तिच्यामागं कशासाठीं धांवत होतों ? कां म्हणून तिची वाट पहात होतों ? तिनं आपण होऊन माझा परिचय करून घेतला होता. तो वाढवणं व टिकवणं हें तिचं काम होतं. माझी भेट हा तिलाहि उत्सुकतेचा व आनंदाचा विषय वाटायला हवा होता. त्याऐवजीं तिच्या भेटीची इतकी उत्सुकता केवळ मलाच वाटण्याचं काय कारण होतं ? माझ्या स्वाभिमानाचं काय झालं होतं ? शहाणपणाचं काय झालं होतं ? ह्या सार्वजनिक वाटेवर वेड्यासारखा मी तिची वाट पहात कां म्हणून उभा राहिलों होतों ? कां ? कां ?

—आणि ह्या विचारासरशीं आवेशानं मी घराकडे परत फिरलों. पण माझा आवेश फार काळ टिकला नाहीं. सुरेखाचं स्मरण मला होतच राहिलं तिची ती सुंदर आकृति, तिचे ते काळे डोळे, माझ्या डोळ्यां-समोर तरळतच राहिले. तिचा तो बालिश, किनरा स्वर माझ्या कानांत घुमतच राहिला. मी तिची वाट पहातच राहिलों. केवळ एक दिवस मधें होता. आणि मग सुरेखा येणार होती. पण तो एक दिवसहि मला फार कष्टदायक वाटला. तो एक दिवस गेला आणि उत्कंठेनं मी सुरेखाची वाट पहात राहिलों. एव्हांना तिचं वेळापत्रक मला पाठ झालं होतं. सामान्यतः दुपारीं अडीचपर्यंत सुरेखा मजकडे येत असे. धगधगत्या छातीनं मी अडीच वाजण्याची वाट पहात होतों. रखडत रखडत घड्याळाचा कांटा अडीचवर आला आणि पुढं गेला ! परंतु सुरेखा आली नाहीं. ती अडीचला आली नाहीं. तीन वाजले, साडेतीन, चार व पांच ! तरीहि सुरेखा आली नाहीं. त्या दिवशीं ती आलीच नाहीं. आणखी दोन दिवस ती आली नाहीं. निष्फळ प्रतीक्षेच्या काट्यांकुट्यांवर मी तळमळत होतों. कॉलेजच्या वाटेवर-तिच्या भेटण्याच्या मोहाशीं मी झगडत होतों. कुठल्या तरी बलवत्तर आकर्षणाच्या आवर्तांत गोते खात असल्याचा मी अनुभव घेत होतों. मी सुरेखाला मनोमन शिव्या देत होतों. तिची आठवणहि झटकून टाकण्याचा प्रयत्न करीत होतों. आणि तरीहि नकळत तिची वाट पहात होतों. जिन्यावर कुणाचींहि पावलं वाजलीं कीं, तीं सुरेखाचीं पावलं आहेत असं मला वाटे. मेजावर कुणाचीहि चिठ्ठी दिसली कीं, ती सुरेखाची चिठ्ठी आहे असा मला भास होई. माझ्या अनुपस्थितींत कदाचित् केव्हांतरी अवेळीं सुरेखा येईल, व तिची आणि माझी चुकामूक होईल ह्या भयानं मी घराबाहेर जाणंहि सोडून दिलं होतं. माझीं कामं तशींच सांचून रहात होतीं. कशांतच माझं मन रमत नव्हतं. सुरेखाची वाट पाहण्यांतच माझी सारी शक्ति संपून जात होती. कुठलंहि काम न करतांच सायंकाळपर्यंत मी विलक्षण थकून जात असे. वाट पहाण्याचा तो ताण मनाला व शरीराला पूर्णपणें पिळून टाकणारा होता. अशी तीन दिवस मी सुरेखाची वाट पाहिली. आणि नंतर माझी आशा व वाट पाहाण्याची शक्तीहि संपत आली. कसल्यातरी प्राणांतिक ग्लानीनं घेरल्यागत मी नुसताच डोळे मिटून बिछान्यावर पडून राहूं लागलों. आणि तेव्हांहि पुन्हां मला स्वर सुरेखाचाच ऐकूं येत होता. चेहरा तिचाच दिसत होता व तिच्याच गाण्याची तान माझ्या मनांत घुमून जात होती. असे किती दिवस मी सुरेखाची वाट पहाणार आहे, किती मला तिची वाट पहावी लागणार आहे, तें मला कळत नव्हतं. मी निःशक्त उदासीनतेनं नुसते दिवस मोजत होतों.

...आणि वाट पाहून पाहून वेडावलेल्या माझ्या वृत्ती जवळजवळ

बधिर झाल्यावर पुरत्या पांच दिवसांनीं एके दुपारीं सुरेखा अकस्मात् माझ्यासमोर येऊन उभी राहिली.

क्षणभर माझ्या दृष्टीवर माझा विश्वासच बसेना. मला वाटलं कीं अद्यापहि मी केवळ अपेक्षेच्या व आभासाच्या सृष्टींतच वावरत आहे. बिछान्यावर पडल्या पडल्या पांढऱ्या शुभ्र साडींतल्या सुरेखा नांवाच्या त्या स्वप्नाकृतीकडे मी नुसता पहातच राहिलों. पण नाहीं! तें केवळ स्वप्न नव्हत! तो केवळ आभास नव्हता. दारापाशींच थबकून उभी असलेली सुरेखा आतां आपलीं आरक्त पावलं टाकीत हळूहळू पुढं येत होती. सुरेखा कांहींशी कोमेजलेली दिसत होती. कांहींशी म्लान दिसत होती.

तिचा तो बालिश भाव धारण करणारा प्रिय व परिचित चेहरा पहातांच सुखदुःखाच्या संमिश्र संवेदनेनं माझं अस्तित्व शहारून गेलं. मी माझा संताप विसरलों, कष्ट व पश्चात्ताप विसरलों आणि आवेगानं पुढं होऊन तिचे दोन्ही हात धरीत म्हणालों, "सुरेखा! तू आलीस?"

ती कांहींच बोलली नाहीं तिचं मस्तक खालीं गेलं. चेहरा लाल पडला. तिचे हात तसेच अवमानानं दाबीत मी म्हणालों, "इतके दिवस तूं कां आली नाहींस, सुरेखा? सांग. कां आली नाहींस?"

सुरेखा चारदोन क्षण कांहींच बोलली नाहीं. मग तिनं एक सूक्ष्म श्वास सोडला. व माझ्या हातांतून आपले हात काढून घेण्याचा प्रयत्न करीत ती म्हणाली "माझा हात सोडा—"

"कां म्हणून?" तीक्ष्ण स्वरांत मी विचारलं, "कां म्हणून तुझा हात सोडूं? प्रथम तूं मला हें सांग कीं, इतके दिवस तूं माझ्याकडे कां आली नाहींस? मुद्दाम करून कां आली नाहींस? मी तुला आवडत नाहीं का? माझ्याकडे यायला तुला आवडत नाहीं का?"

"जें आवडत तें करायचं नसतं. जें करायला पाहिजे, तें आवडायला पाहिजे!"

सुरेखाचं तें वाक्य ऐकतांच मला चटका बसल्यासारखं झालं. तें वाक्य माझ्या ओळखीचं होतं. तिचे हात अधिकच घट्ट धरीत मी कडू स्वरांत विचारलं, "कुठं वाचलंस तूं हें वाक्य? 'लाल कंदील'चे एकूण सात भाग मी लिहिले आहेत. त्यापैकीं कुठल्या भागांत हें वाक्य आहे? सांग. कुठल्या भागांत आहे?"

"आधीं तुम्ही माझे हात सोडा बरं!"

"का बरं? मी काय इतका घाणेरडा माणूस आहे? कीं आज प्रथमच मी तुझे हात धरतों आहे?" मी तिच्या हातावरची पकड अधिकच बळकट केली.

"पण स्त्रीपुरुषांनीं उगाच एकमेकांना स्पर्श करणं वाईट आहे. नवराबायकोंनीं एकमेकांना स्पर्श करावा. सख्या बहीणभावंडांनीं करावा..."

सुरेखाचे शब्द मधेंच तोडीत मी ओरडलों,

"आणि मित्रानं आपल्या मैत्रिणीला स्पर्श करूं नये? त्यानं आपल्या तिच्याविषयींच्या भावना व्यक्त करूं नयेत?"

"नाहीं." सुरेखा म्हणाली, "तें मोहाला निमंत्रण आहे. स्पर्श ही मोहाची पहिली पायरी आहे."

"असा मोह मला झालेला तूं कधीं पाहिला आहेस का, सुरेखा?"

"तें मला सांगतां येत नाहीं. पण माणसाला असा मोह होऊं शकतो!"

"म्हणजे मी दुबळा माणूस आहे, मी चांगला माणूस नाहीं, असं का तुला म्हणायचं आहे, सुरेखा?"

"तुम्हांला मी वाईट म्हणत नाहीं. तुम्ही चांगले आहांत. पण चांगल्या माणसांतहि वाईटपणा असतो. आणि वाईट माणसांतहि चांगुलपणा असतो. माणसाचा स्वभाव एकरंगी नाहीं, तर दुरंगी असतो, बहुरंगी असतो, असं तुम्हीच लिहिलेलं आहे. फार चांगलं लिहिलं आहांत तुम्ही. तुमचं म्हणणं मला अगदीं पटलं. खरोखर, चांगला माणूसहि प्रसंगीं वाईट वागूं शकतो..."

"म्हणजे मी वाईट माणूस आहे असं तुझं म्हणणं!" मी उपरोधानं म्हणालों.

"तसं नव्हे." ती विनवणीच्या स्वरांत म्हणाली, "पण वाईटाला चांगल्यावर मात करणं शक्यच होणार नाहीं, असं माणसानं वागायला पाहिजे. मोहाचे प्रसंग माणसानं टाळायलाच पाहिजेत. मोहाशीं सामना करून मोह जिंकणं हें फार कठीण काम आहे. भीष्म, शुक, ह्यांसारख्या कांहीं अलौकिक पुरुषनाच तें शक्य झालं आहे. एरवीं सामान्य माणसांनीं मोहाचे प्रसंग मुळांतच टाळणं हाच उत्तम पक्ष, असं तुम्ही प्रतिपादन केलं आहे!"

"मी झक मारली आहे!" मी वैतागानं म्हणालों, "त्यापेक्षां सरळच सांग ना, कीं मी एक सहज मोहांत पडणारा माणूस आहे, असं तुला वाटतं!"

"तुम्हांला काय वाटतं?" सुरेखानं भुंवया उंचावून विचारलं, "तुम्हांला कधीं कशाचा मोहच पडणार नाहीं?"

"माझं सोड! पण तुला पडेल का कधीं कशाचा मोह?"

मी सुरेखाचे दोन्ही हात नव्या आवेगानं घट्ट धरले व तिच्याकडे रोखून पाहूं लागलों, सुरेखाच्या पापण्या थरथरल्या. तिची दृष्टि खालीं गेली. तिच्या तोंडून शब्द फुटेना.

"बोल ना—" मी तिला उपहासानं विचारलं, "तुला होईल का कधीं कशाचा मोह?"

"होतो—" दाटून आलेल्या कंठानं ती म्हणाली, "झाला होता."

"कधीं? कशाचा?

"तुमचा!" थरथरत्या ओठानं ती बोलूं लागली, "तुमच्या संगतीचा! तुमच्या बोलण्याचा!"

ते शब्द ऐकतांच एकाद्या चेंडूसारखं माझं काळीज उसळलं. मी ओरडून म्हणालों, "माझा तुला मोह पडतो? माझ्या संगतीचा तुला मोह पडतो?"

"होय." क्षमायाचनेच्या अपराधी स्वरांत ती बोलूं लागली, "त्या दिवशीं मी तुमच्याबरोबर फिरायला आलें. तसं करणं बरोबर नाहीं हें पटलेलं असतांना सुद्धां फिरायला आलें. गर्द रानांतल्या त्या विहिरीच्या कांठावर आपण बसलों. तुम्ही फार सुंदर बोलूं लागलांत. बोलतां बोलतां तुम्ही माझे हात धरलेत; हें सगळे वाईट आहे हें ठाऊक असतांनासुद्धां मी तुम्हांला माझे हात धरूं दिले. स्वतःला मी तुमच्या संगतींत विसरूनच गेलें. सारं बरं वाईट विसरलें. मग इतके दिवस मन आवरलं असतांना सुद्धां मी तुमच्याबरोबर जेवायला आलें, सिनेमाला आलें. सिनेमांत पुन्हां तुम्ही माझे हात धरलेत. त्याचं मग मला कांहींच वाटलं नाहीं. उलट तें मला चांगलच वाटलं. तुमच्याकडे येण्याचा पहिला मोह मी आवरला नाहीं. फिरायला येण्याचा दुसरा मोह मी आवरला नाहीं. मग सारखी मी मोहाला बळी पडतच गेलें. पण हें सगळं वाईट आहे, हें सगळं तुमच्या कृपेनं आतां मला कळलेलं आहे..."

"माझी कृपा?" वेड्यासारखा हंसत मी म्हणालों.

"होय. तुमच्या कृपेनंच हें मला कळलेलं आहे. बरं काय आणि वाईट काय, हें तुमच्या ग्रंथांच्या वाचनानंच मला कळलेलं आहे. मोह हा पापाचा पिता आहे, हें सुंदर आणि अर्थपूर्ण वाक्य तुम्ही लिहिलं आहे.

मोह मारण्याचा क्षण एकच. आणि तो म्हणजे मोहाचा जन्मक्षण. मोहाची मायाची सांखळी पहिल्या दुव्यापाशींच निर्धारानं तोडली पाहिजे, असं तुम्ही लिहिलं आहे. तुमची शपथ तसंच मी करणार आहे!"

"माझी शपथ?"

"होय. तुमच्या लेखणीला आणि तुम्हांला मी फार मानतें. म्हणून तसंच मी करणार आहे."

"तसं म्हणजे काय करणार आहेस तूं?" मी आकांतानं विचारलं.

"मी ..मी..." हुंदका आवरीत सुरेखा म्हणाली, "मोहाची सांखळी मी पहिल्या दुव्यापाशींच तोडणार आहे. ह्यापुढं मी इथं क... कधींसुद्धां येणार नाहीं!"

"कां?" पिसाटपणें मी किंचाळलों, "कां! कां! आपली मैत्री तुला इतक्यात नकोशी झाली?"

"आपली मैत्री हें मोहाचं साधन आहे. ती पापाच्या गर्तेकडे जाणारी वाट आहे."

"तूं हें काय बोलतेस, सुरेखा?"

"मी तुमच्याकडे एकटी येते. तुम्ही आणि मी इथं एकटे बसतों."

"पण या घरांत दुसरीं माणसं आहेत. माझे आईवडील आहेत, माझीं भावंडं आहेत."

"पण या खोलींत दुसरं कुणी नसतं. केवळ तुम्ही आणि मी असतों. फारच तर सख्ख्या बहीणभावंडांनीं असं एकटं बसावं. मावस, मामे किंवा आते बहिणीबरोबरसुद्धां शक्यतोंवर कुणी असं एकांतात बसू नये. हे तुमचे शब्द आहेत. आणि ते अगदीं बरोबर आहेत."

"सुरेखा!"

"तुम्ही लिहिलंत तें अगदीं बरोबर आहे. मी तुमची मावस, मामे किंवा आतेबहीण नाहीं. मी मुळीं तुमची बहीणच नाहीं!"

"पण तूं माझी मैत्रीण आहेस."

"तरुण स्त्रीपुरुषांची मैत्री ही बहुधा मोहाच्या मार्गानं जाते."

"कुणी सांगितलं तुला हें?"

"तुम्हीच सांगितलंत. तुम्हीच असं लिहिलं आहांत!"

"कुठं? लाल कंदिलांत?"

"नाहीं. हें तुमच्या नाटकांतलं वाक्य आहे. किती खरं आहे तें!"

"तुला त्या वाक्याचा खरेपणा कसा ठाऊक?"

"मी त्याचा अनुभव घेतें आहे. तें वाक्य खरं आहे. अगदीं खरं आहे. सोडा माझा हात."

"नाहीं सोडत!"

"सोडा. सोडा म्हणतें ना!" काकुळतीनं सुरेखा म्हणाली, "पुरुषानं स्त्रीचा हात धरायचा असतो, तिला सद्‌गुणांच्या मार्गावर ठेवण्यासाठीं! तिला मोहाच्या मार्गावर ओढण्यासाठीं नव्हे!"

"सुरेखा, काय बडबडते आहेस?"

"हें तुमच्या सुप्रसिद्ध कादंबरींतलं वाक्य आहे. किती सुंदर आहे हें वाक्य! अशीं सुंदर वाक्यं लिहिणाऱ्या माणसाच्या हातांत सदैव त्याची लेखणी असावी. माझ्यासारखीचा हात तिथं कधींसुद्धां नसावा. कारण स्त्रीचा हात म्हणजे मोहाचा हात, पापाचा हात! सोडा माझा हात—"

"उगाच मूर्खासारखं बोलूं नकोस!"

"नाहीं. नाहीं! किती शहाणपणाचीं वाक्यं आहेत हीं. तीं तुमचींच वाक्यं आहेत. त्या वाक्यांनींच मला सावध केलं. मला मोहाच्या मार्गानं



अनुक्रमणिका


ही दिवाळी व नूतन वर्ष
आपणांस आनंदाचें
व सुखसमृद्धीचें जावो !
plato
प्लेटो म्हात्रे प्रॉडक्ट
म्हात्रे पेन ॲन्ड प्लास्टिक इंडस्ट्रीज प्रायव्हेट लिमिटेड
व्यापारविषयक सर्व चौकशीसाठीं :
बेस्ट फाउंटन पेन डेपो,
७९, देवकरण मॅन्शन, प्रिन्सेस स्ट्रीट, मुंबई २.
PLATO

जायचं नाहीं! मला पापाच्या मार्गानं जायचं नाहीं! सोडा माझा हात—"

"पण तूं कुठं पापाच्या मार्गानं जाते आहेस?"

"जातें आहे. जातें आहे. पूर्वी मला त्याची कांहीं कल्पनाच नव्हती. पण आतां मला कळलं. ही मोहाची सांखळी मला तोडायलाच पाहिजे! सोडा माझा हात—"

"सोडत नाहीं!"

"सोडा म्हणतेना!"

"नाहीं सोडत!"

"कां नाहीं सोडत?"

"तुझा हात धरला म्हणजे मला चांगलं वाटतं. तुला वाटतं कीं नाहीं?"

"वाटतं—वाटतं!" हुंदका देत सुरेखा म्हणाली, "म्हणूनच मला हें सगळं संपवायचं आहे. एखाद्या पुरुषाला काळजापासून दोन हात दूर ठेवायचं असेल, तर त्याला प्रथम हातापासून हातभर अंतरावर ठेवलं पाहिजे. म्हणून म्हणतें, सोडा माझा हात!"

"नाहीं!"

"नाहीं सोडत?"

"नाहीं!"

सुरेखानं आपला हात एकदम सैल सोडला; व ओलावलेल्या स्थिर दृष्टीनं माझ्याकडे पहात ती म्हणाली, "तुमच्या हातांत अखेर असतं काय? हाडं—कातडं—मांस—माती! अगदीं मातीसारखी माती! त्या मातीचा तुम्हांला मोह पडला? माझ्या मातीच्या हाताची तुम्हांला भूल पडली? तुम्ही कधीं आपल्या बहिणीचा असा हात धरला होतांत? आईचा धरला होतांत?"

—माझ्या मस्तकावर जणूं प्रहार झाला. माझ्या कानांत जणूं कुणी इलाहल ओतलं. संतापाच्या तिरमिरीसरशीं मी सुरेखाचे हात झटकून ओरडलों, "माझ्या आईचं नांव काढतेस? कांहीं लाज नाहीं वाटत?"

"अहाहा!" सुरेखा मला वांकून नमस्कार करीत म्हणाली, "केवढीं परिणामकारक वाक्यं लिहलीं आहांत तुम्ही! असाच, अगदीं असाच परिणाम तुमच्या वाक्यांनीं माझ्यावर केला. तुमचींच वाक्यं मी आत्तां वापरलीं. त्या वाक्यांनीं मला वांचवलं आणि तुम्हांलाहि वांचवलं!"

"मरूं देत माहीं वाक्यं!" मी पिसाळून म्हणालों.

"नाहीं. नाहीं. तुमचीं हीं वाक्यंच नेहमीं जगणार आहेत. तुम्हांला चिरंजीव करणार आहेत. मोहांत पडणाऱ्या अनेकांना तीं वांचविणार आहेत. तुमच्या वाक्यांच्या प्रकाशांत मला माझा मार्ग दिसला. नेहमींच दिसत राहील. आता येऊं मी?"

"तूं जाणार, सुरेखा? नको. नको. थोडी थांब.. माझं ऐक तर!"

"नाहीं, नाहीं! आतां मला मोहांत पाडूं नका. स्वतः मोहांत पडूं नका. मला जाऊं द्या."

"पुन्हां कधीं येशील, सुरेखा?"

"पुन्हां?" जणूं आपल्या काळ्याशार डोळ्यांनीं भविष्याचा भेद घेण्याचा प्रयत्न करीत सुरेखा म्हणाली, "कुणास ठाऊक पुन्हां कधीं येईन तें. पुष्कळ...पुष्कळ दिवस येणार नाहीं. काहीं वर्षंसुद्धां येणार नाहीं. तुमचा निरोप घेतांना तुमच्याजवळ एक मागणं मागते. मागूं?"

"बोल, सुरेखा!"

"मला पुन्हां कधीं इथं बोलावूं नका. माझ्या वाटेवर उभे राहूं नका. मला भेटायचा प्रयत्न करूं नका!"

"हें कुठलं मागणं तूं मागते आहेस, सुरेखा! तुला ठाऊक आहे, तूं मला किती आवडतेस, तुझी संगत मला किती आवडते!"

"आवडत्या माणसासाठीं आवडत्या गोष्टींनंच मोल द्यावं लागतं. मी तुमच्यासमोर पदर पसरतें. मला एवढी भीक घाला."

सुरेखानं खरोखरच माझ्यासमोर पदर पसरला. माझं मस्तक भिरभिरूं लागलं. मी लिहिलेले प्रसंगच्या प्रसंग व वाक्यंच्या वाक्यं ती माझ्यासमोर जीवंत करीत होती. आतां ती म्हणत होती, "हें एवढं शेवटचं मागणं मागतें. मला एवढी भीक घाला."

"ठीक आहे. प्रयत्न करीन."

"मग येऊं मी आतां?" सुरेखा दाराकडे जाऊं लागली.

"हाच का आपल्या मैत्रीचा शेवट, सुरेखा? आपले संबंध सुरू होतात न होतात, तों त असे अखेर संपायचे होते? ही आपली शेवटचीच भेट आहे ना, सुरेखा?"

"हो. जवळजवळ तसंच. जो मार्ग चुकीचा आहे, तो सोडायलाच पाहिजे. जें सुरू रतां येण्यासारखं नाहीं, तें संपवायला पाहिजे!"

सुरेखानें दाराच्या दिशेनं आणखी कांहीं पावलं टाकलीं. मी हात पुढं करून झपाट्यानं तिच्या दिशेनं धांवलों.

"माझ्या अंगाला हात लावूं नका!" निश्चयाच्या स्वरांत सुरेखा म्हणाली.

"पण ह्या निरोपाच्या दिवशीं .." माझे हात आणखी पुढं झाले.

"नाहीं. नाहीं!" दोन पावलं मागं सरून सुरेखा म्हणाली, "अखेर नुसत्या स्पर्शांत असतं काय? कां म्हणून तुमच्या शरीराला ही ओढ लागते? माणूस म्हणजे काहीं केवळ शरीर नाहीं. मैत्री कांहीं केवळ शरीराची शरीराशीं नसते. मैत्री म्हणजे मन. मैत्री म्हणजे भावना! ह्या भावनेला कमीपणा आणणारें जें कांहीं असेल, तें माणसानं विसरायला पाहिजे."

"किती सहज तूं मला विसरते आहेस, सुरेखा!"

"विसरेन कशी? केवळ माझं शरीर तुमच्याजवळ येणार नाहीं. केवळ हाडामांसाची सुरेखा तुम्हांला दिसणार नाहीं. पण तुमची आठवण मला नेहमीं राहील. तुम्ही माझ्यापाशीं नेहमीं असाल!"

"मी तुझ्यापाशीं असेन?"

"होय. तुमच्या पुस्तकांच्या रूपानं तुमचे संवाद वाचतांना मला तुमचं बोलणं ऐकल्यासारखं वाटेल. तुमचीं वर्णनं वाचतांना मला तुमच्याबरोबर फिरल्यासारखं वाटेल. तुमच्या पात्रांच्या सहवासांत मला तुमचा सहवास मिळेल. तुमचीं स्फूर्तिदायक वाक्यं मला नेहमीं सामर्थ्य देतील. तुमच्याविषयीं माझ्या मनांत नेहमीं आदर राहील. स्नेहभावना राहील. अगदीं जगावेगळी आपली मैत्री असेल!"

"जगावेगळी असेल खरी!" मी उद्वेगानं म्हणालों.

"होय. ती केवळ मनाची मैत्री असेल भावनेची मैत्री असेल."

"केवळ आपण एकमेकांना कधीं दिसणार मात्र नाहीं. भेटणार मात्र नाहीं." मी कटु स्वरांत म्हणालों.

"नाहीं भेटणार." वादळ पचविणाऱ्या शांत स्वरांत सुरेखा म्हणाली, "एखाद्या कविकल्पनेसारखी आपली मैत्री असेल. तुम्हीच रंगवलेल्या तरल, उदात्त सुंदर स्वप्नाप्रमाणें आपली मैत्री असेल. त्या सुंदर कल्पना, शुद्ध मैत्रीचं तें सुंदर स्वप्न तुम्हांला प्रत्यक्षांत आणतां येणार नसेल, तर दुसऱ्या कुणाला तें प्रत्यक्षांत आणतां येईल? मी त्यायोग्य होईन, असा तुम्ही मला आशीर्वाद द्या!"

सुरेखा पुन्हां एकदां माझ्यासमोर वाकली.

"हें काय करतेस, सुरेखा?" मी मागं सरत म्हणालों.

"मी तुम्हांला नमस्कार करते आहे. तुमचा आशीर्वाद मागतें आहे. एका परीनं तुम्ही माझे गुरु आहांत !"

"गुरु ?" त्या विशेषणाचा संदर्भ व त्यांतली सूचना मुळींच न आवडून मी म्हणालों, "मी तुला नेहमीं बरोबरीच्या नात्यानं वागवीत आलों आहे."

"पण मी तुमच्या बरोबरीची नाहीं. सर्व दृष्टींनीं तुम्ही माझ्यापेक्षां मोठे आहांत. मी तुमच्यापाशीं आशीर्वाद मागतें आहे. जें चांगलं आहे, जें केलं पाहिजे, तें करायला कितीहि कठीण असलं, तरी तें करण्याची इच्छाशक्ति मला मिळेल असा तुम्ही मला आशीर्वाद द्या !"

सुरेखाचे ते शब्द ऐकून माझं मन चाखून गेलं. विरक्त बनलं. कुठं-तरी मी दुखावलों व चिडलों. कुठंतरी माझं मन द्रवलं. व तडकलंहि.

"जा सुरेखा ! सुखी हो !" मी म्हणालों.

आणि मग मोठी निर्णायक हालचाल करीत सुरेखा निघून गेली.

● ●

सुरेखा गेली. पण सुरेखाची स्मृति माझ्या मनांतून जाईना. एखादा खेळ प्रारंभींच थांबावा, एखाद्या फार सुंदर ग्रंथाचीं पानं मधेंच फाटून गेल्याचा अनुभव यावा, तसं मला वाटत होतं. सुरेखाचं नांवनिशाणहि पुसून टाकण्याचा प्रयत्न मी करीत होतों. पण त्या प्रयत्नांत मला यावं तितकं यश येत नव्हतं. अखेर सुरेखा होती कोण ? माझ्या मनावर तिचा एवढा अधिकार चालण्याचं कारण काय ? तिच्या नांवानं स्मरणी ओढीत बसण्यापलिकडे मला काय अन्य उद्योग नव्हते ? कीं तिच्याविना कुणी अन्य मुली माझ्या परिचयाच्या नव्हत्या ? माझ्या मनाची मी नानाप्रकारें समजूत घालण्याचा प्रयत्न करीत होतों. हळुंहळुं मी माझीं नित्य नैमित्तिक कामंहि करूं लागलों होतों. तिच्या वाटेवर उभं रहाण्याचं मी टाळलं होतं. पण तरीहि अद्याप तिची स्मृति माझ्या मनांत जागी होती. मोठ्या भयानक प्रखरतेनं जागी होती. सुरेखाला विसरण्यांत मी यश मिळवलं असं मला वाटतं न वाटतं, तोंच एखाद्या जिव्हारीं जाऊन बसलेल्या दुःखाप्रमाणें तिची आठवण माझ्या मनांत उमळून येई. मला तिचे शब्द आठवत. स्वर आठवे. तिच्या गाण्याची तान माझ्या मनांत उमटून जाई. माझ्या खोलींत आल्यावर ज्या वेत्रासनावर ती बसे, त्या वेत्रासनाकडे पहातांच माझ्या पोटांत तुटूं लागे. माझं मन क्षणभरहि स्थिर राहिलं कीं, तें चटकन सुरेखाकडे धाव घेत असल्याचं माझ्या वारंवार प्रत्ययास येत होतं. अपरात्रीं मला जाग येई; व माझ्या जागृतीचा पहिला क्षण सुरेखाच्या स्मरणानं व्यापलेला असे. कांहींतरी हरवल्यासारखं, कांहींतरी फार चुकल्यासारखं मला वाटे. आजवर हें असं कधीं झालंच नव्हतं. कुठलहि माणूस कधीं या रीतीनं मला तुटलं नव्हतं. माझ्यावर असा आघात कधीं झाला नव्हता. माझ्याच शब्दांनीं मला घायाळ केलं होतं. माझ्याच शब्दांनीं माझं रक्त काढलं होतं. मीं लिहिलेलीं वाक्यामागून वाक्यं, मी सांगितलेल्या कल्पनांमागून कल्पना माझ्यावर उलटल्या होत्या. त्यांनीं मला पराभूत केलं होतं. माझ्या लेखणीच्या सामर्थ्यामुळं सुरेखा माझ्याकडे आली होती. व त्याच सामर्थ्यामुळं ती मला अंतरली होती.

मला पुन्हां पुन्हां वाटे कीं, तिला भेटावं व तिच्याशीं बोलावं. शब्दांचे संदर्भ व अर्थ तिला समजावून सांगावेत. शब्दांमुळं जें गेलं, तें शब्दां-नींच परत आणावं. कारण जें झालं, तें मला फार अप्रिय वाटत होतं, फार दुःखदायक वाटत होतं. आणि सुरेखासारख्या मुलीसमोर अगतिक होणं, हेंहि मला तितकंच अप्रिय व दुःखदायक वाटत होतं.

(पुढील मजकूर पान १८८ वर पाहा)




*'तुझें आहे तुजपाशीं, परी तूं जागा चुकलासी'—वृंदावनांतल्या गोळवाड्यांत निसर्ग आणि गुरेंवासरें यांच्या सान्निध्यांत सुखानें कालक्रमणा करणाऱ्या गोपाळकृष्णालाहि हें पटलें. पण कधीं?....*

**स**मोर फेंसाळलेली यमुना गात गात चालली होती. दह्याचा माठ घेऊन लगबगीनें मथुरेच्या बाजाराला जाणाऱ्या गोपीसारखी! पण आज यमुनेच्या त्या चिरपरिचित संगीतांत कृष्णाचें मन रमेना!

वर विशाल वटवृक्ष आपलें छत्र पसरुन छाया देत होता. यशोदेच्या मायेसारखी छाया होती ती! वत्सल आणि विपुल! पण आज कृष्णाला त्या छायेची चिरपरिचित शीतलता जाणवेना!

त्यानें वटवृक्षाखालून पडल्या पडल्या पाहिलें. गोवर्धनाच्या पायथ्याजवळच्या कुरणांत गाई स्वच्छंदानें चरत होत्या. पक्ष्यांच्या छायांबरोबर त्याचे सवंगडी पळत होते. रानांतल्या पक्ष्यांचा आवाज कानांवर पडतांच हुबेहूब तसला आवाज काढून त्यांना उत्तर देत होते! पण आज त्या चिरपरिचित क्रीडांत कृष्णाचें लक्ष कांहीं केल्या लागेना!

त्यानें सहज पलीकडे पडलेलें एक मोरपिस उचललें. तें मोरपीस पूर्वी केव्हांतरी आपल्याच कानावरुन इथें गळून पडलें असावें असें त्याला वाटलें. तो त्या पिसाकडे निरखून पाहूं लागला. त्या मोरपिसावरल्या एका डोळ्यावर त्याची दृष्टि खिळून राहिली. डोळ्यासारखा डोळा! पण ज्याला कांहीं दिसत नाहीं, कांहीं पाहतां येत नाहीं असा डोळा!

आपलें जीवनहि असेंच होत आहे असें त्याच्या मनांत आलें. परवां पेंद्या मथुरेला गेला. कुब्जवनांतलें सौंदर्य पाहण्याची आपली हौसहि जणुं त्याच्याबरोबर गेली! 'कृष्णा संभाळ रे संभाळ अपुल्या गाई' असें



अनुक्रमणिका

म्हणणारा त्याच्यासारखा भोळाभाबडा, पण जिवाला जीव देणारा मित्र आपल्याला पुन्हां मिळेल का? छे! कोमेजलेल्या फुलाची पुन्हां कधीं कळी झाली आहे? गळून पडलेल्या मोरपिसाला पुन्हां कधीं नाचणाऱ्या मोराच्या पिसाऱ्यांत आसरा मिळाला आहे? वाहून गेलेलें यमुनेचें पाणी पुन्हां कधीं परत आलें आहे? पेंद्या परत येणार नाहीं—आपल्याला असा जिवाभावाचा मित्र पुन्हां मिळणार नाहीं!

पण पेंद्या गेला—आणि काल? काल राधा गेली! तिला जाणें भागच होतें. हा व्रज सोडून दुसरीकडे जायचें अनयानें ठरविलें. बायको ही बोलूनचालून नवऱ्याची सावली. तो जाईल तिकडे तिला गेलेंच पाहिजे. पण आपल्याला सोडून जातांना राधेला किती विलक्षण दुःख झालें! तिची मुद्रा भरून आलेल्या आभाळासारखी काळवंडली होती. तिच्या डोळ्यांतून पावसाच्या धारा गळत होत्या. शेवटीं किती कष्टानें तिनें आपलीं आसवें आवरलीं. कदंबवृक्षाखालीं मला पोटाशीं धरीत आणि माझ्या पाठीवरून हात फिरवीत ती म्हणाली, "कृष्णा, संभळून रहा हं. नि एक गोष्ट विसरू नकोस. खरं सुख या वृंदावनांत आहे. तें सोडून कुठं कुठं जाऊ नकोस!" रडतां रडतां ती हंसली. एकदम पाऊस उघडावा आणि इंद्रधनुष्य चमकूं लागावें तसें भासलें तिचें हें हंसणें.

पेंद्याप्रमाणें राधाहि पुन्हां परत येणार नाहीं. राधा केवळ आपली वडील बहीणच नव्हती! ती आपली धाकटी बहीणहि होती. वडील बहिणीप्रमाणें तिनें आपली काळजी केली, आपल्याला नेहमीं पाठीशीं घातलें; आणि धाकट्या बहिणीप्रमाणें तिनें आपल्यापाशीं नेहमीं एक हट्ट धरला—"हं. वाजीव ती तुझी मुरली! तुझी मुरली ऐकली कीं माझं मन कसं शांत शांत होतं! कृष्णा, तुझ्या मुरलींत अमृत भरलं आहे. हं वाजव ती! तूं मुरली वाजविली नाहींस तर मी घरीं जाणार नाहीं! वाट बघीन बघीन आणि यमुनेंत उडी टाकीन!"

आतां राधा वृंदावनांत परत येणार नाहीं या जाणिवेनें व्याकुळ झालेल्या कृष्णानें जवळ पडलेली आपली मुरली घेतली. तो ती वाजवूं लागला. पण तिच्यांतून पूर्वीसारखे मधुर सूर निघेनात! त्यानें ती उलट-सुलट केली, नीट निरखून पाहिली. मुरलींत कांहीं दोष नव्हता. पण राधेच्या सहवासांत तिच्यांतून जे जिवाला वेड लावणारे सूर बाहेर पडत होते, ते आतां कांहीं केल्या निघेनात! ते कुठें लपून बसले आहेत हें त्याला कळेना!

ते सूर काय राधेच्या मागून गेले? कुठें गेले ते? फुलाला सोडून जाणारा सुगंध जिथें जातो तिथें?

पेंद्या गेला, राधा गेली, मुरलीचे ते अमृतमधुर सूर गेले! किती लवकर, किती अचानक, आपल्या जीवनांतलें सौंदर्य गेलें—काव्य संपलें—सोनेरी स्वप्न लोपलें.

कितीतरी वेळ कृष्ण उदासपणें विचार करीत बसला होता. हें असें कसें झालें? कां झालें?

संध्याकाळ झाली. यमुनेच्या पाण्यावर काळ्या सावल्या पसरूं लागल्या. गुरेंवासरें घरीं परतूं लागलीं.

वटवृक्षाखालून कृष्ण उठला. इतक्यांत त्याच्याच दिशेनें येत असलेलीं दोन माणसें त्याला दिसलीं—एक तरुण, सुंदर स्त्री! आशेनें आकाशाला स्पर्श केला. ती राधा असेल काय? वृंदावनांत आपलें कांहींतरी राहिलें आहे, हरवलें आहे, असें वाटून तें शोधायला ती परत आली असेल काय? आणि त्या स्त्रीबरोबर दिसणारा तो म्हातारा—तो कोण बरें असावा? तिनें सोबतीला घेतलेला कुणीतरी माणूस? ज्याला जगण्या-खेरीज दुसरा कांहीं उद्योग नाहीं असा—

तीं दोन्हीं माणसें जवळ आलीं. छे! ती तरुण स्त्री राधा नव्हती! अधूनमधून एखादी अप्सरा पृथ्वीवर क्रीडा करायला येते म्हणतात! तशी भासत होती ती!

तिच्या अंगावरल्या हिरव्यागार वस्त्रावर नाना रंगांचीं फुलपांखरें नाचत होतीं. तिच्या ओठावरलें स्मित स्वतःभोंवतीं पिंगा घालीत पळा-पळाला फुलत होतें. ती त्या वृद्धाशीं कांहींतरी बोलत होती. पण तें तोंडानें! तिच्या डोळ्यांच्या गुजगोष्टी चालल्या होत्या त्या आकाशांत हळूहळू उगवूं लागलेल्या चांदण्यांशीं!

ती जितकी लावण्यवती होती, तितकाच तो म्हातारा कुरूप होता! मुद्रेवरून त्याला वाटचालीचा फार शीण झाला असावा, तो युगानुयुगें चालतच राहिला असावा, असा भास होत होता! त्याच्या अंगावरलें वस्त्रहि मोठें विचित्र होतें. वाघाच्या कातड्यापासून मृदुल दुकूलापर्यंत किती प्रकारचे तुकडे एकत्र शिवून लज्जारक्षणाकरितां त्यानें तें वस्त्र तयार केलें होतें कुणाला ठाऊक! त्याचे डोळे अधुनमधून पाणावत होते, ते करुणेनें कीं वृद्धत्वानें तें देव जाणे! आपल्या तरुण मैत्रिणीशीं बोलतां बोलतां तो मधेंच खालीं वांकत होता, एखादा लहानसा दगड उचलत होता आणि तो आपल्या डाव्या खांद्याला लावलेल्या झोळींत टाकीत होता.

तीं दोघेंहि हळूहळू कृष्णाजवळ आलीं.

कुतूहलानें वृद्धाकडे पाहत कृष्ण म्हणाला, "आजोबा, तुम्ही फार थकलेले दिसतां. आमच्या घरीं चला. रात्रीं वस्तीला राहा. विश्रांति घ्या! नि मग उद्यां सकाळीं—"

म्हातारा नकारार्थी मान हलवीत म्हणाला, "अरे पोरा, माझ्या पायां-तल्या शक्तीची तुला कल्पना नाहीं!"

"आपलं नांव काय आजोबा?"

"माझं नांव? तें मला कुठं ठाऊक आहे? मला हांक मारण्याचा प्रसं-गच कधीं कुणावर येत नाहीं! मी चिरप्रवासी आहे. अष्टौप्रहर मी चालत असतों."

"आणि ही तुमच्याबरोबरची मुलगी? हिचं नांव?"

वृद्ध खो खो हंसत म्हणाला, "ही माझी मुलगी नाहीं वेड्या! ती बायको आहे माझी!"

ती तरुणी आतां पुढें झाली. ती कृष्णाला म्हणाली, "तुझं नांव काय?"

"कृष्ण."

"कृष्ण? फार मोठ्या माणसाचं नांव आहे हें! काय करतोस तूं इथं?"

"हा आमचा व्रज आहे. या गोळवाड्यांतलं सारं काम आम्ही करतों. गाईवासरं हें आमचं धन. त्यांच रक्षण हें आमचं जीवन!"

"तूं अगदींच खेडवळ दिसतोस बाबा! अरे वेड्या, तुझ्यासारखे तरुण काय केवळ गुराखी व्हायला जन्माला येतात? तुझ्यासारख्या पुरु-षाचा जन्म पराक्रमाकरितां असतो. तुझ्याच नांवाचा एक दुसरा महापुरुष आहे—त्याला श्रीकृष्ण म्हणतात!"

"कुठं आहे तो?"

"पश्चिम समुद्राजवळ द्वारकेंत. त्याची सारी नगरी सोन्याची आहे. आणि तूं इथं शेणानं सारवलेल्या नि मातीनं लिंपलेल्या झोपडींत दिवस कंठीत राहिला आहेस."

वृद्ध मधेंच म्हणाला, "पोरा, निळ्या आकाशांत सोनेरी चंद्रकोर कधीं

अनुक्रमणिका

पाहिली आहेस का? तळ्याच्या निळसर पाण्यांत सोन्याचं कमळ कधीं पाहिलं आहेस का? तशी ती समुद्रांतली नगरी आहे. ज्यानं सोन्याची द्वारका पाहिली नाहीं त्याचा जन्म फुकट आहे, मातीमोल आहे!"

ती तरुणी म्हणाली, "वेड्या, या खेड्यांत कशाला कुजत पडलाहेस? अरे, त्या श्रीकृष्णाशीं तुझं कांहीं दूरचं नातं लागत असेलच कीं! लागत नसलं, तर नवं निर्माण कर. चल, जा. अस्साच्या अस्सा द्वारकेला जा—"

वृद्ध मधेंच उद्गारला, "आम्ही द्वारकेंत होतोंच ना? अबबब! काय तें कृष्णाचं ऐश्वर्य! तें वैभव पाहून आम्ही अगदीं थक्क झालों. त्याचा एक दरिद्री बालमित्र त्याला भेटायला आला होता. सुदामा त्याचं नांव! त्या गरीब ब्राह्मणाला कृष्णानं काय काय द्यावं? धनधान्य, हत्तीघोडे, दासदासी, हिरेमाणकें—तो ब्राह्मण घरीं परत गेला, तेव्हां त्याच्या बायकोलासुद्धां त्याची ओळख पटेना!"

बोलतां बोलतां म्हातारा पोट धरधरून हंसूं लागला. तेव्हां ती तरुणी त्याचा हात धरून म्हणाली, "तिला नसेल पटली आपल्या नवऱ्याची ओळख! पण मी तुम्हांला पुरी ओळखून आहे हं! मी अष्टौप्रहर चालत असतों म्हणून लोकांना सांगायचं आणि वाटेंत कुणी भेटला रे भेटला कीं त्याच्याशीं बोलत उभं राहायचं! तो द्वारकेंतला श्रीकृष्ण चांगला सोन्याचा रथ देत होता तुम्हांला! पण—"

त्या वृद्धाचा हात धरून ती तावातावानें चालूं लागली. दोघेंहि हां हां म्हणतां काळोखांत दिसेनाशीं झालीं.

कृष्ण विचार करीत घरीं आला. यशोदेनें त्याच्या आवडीचा दहीभात कालवून ठेवला होता. पण त्याला तो खाववेना. हातांत मोरवेलीची काठी घेऊन तो अंगणांत अस्वस्थपणें फेऱ्या घालूं लागला. वर चांदण्या लखलखत होत्या. मघांची ती तरुणीच जणुं लाख डोळ्यांनीं त्याच्याशीं बोलत होती. भोंवतालीं काळोख पसरला होता. मघांचा तो म्हाताराच जसा कांहीं काळोखाच्या अनंत हातांनीं त्याला कुरवाळीत होता!

नकळत कृष्णानें हातांतल्या मोरवेलीच्या काठीचे तुकडे केले—ते अंगणांत फेंकून दिले.

तो अंथरुणावर येऊन पडला. पण आज त्याची कांबळी त्याला ऊब देईना. त्याचा डोळ्याला डोळा लागेना. मोहोळांतल्या मधमाश्या एखाद्यावर तुटून पडाव्यात, तशा साऱ्या जुन्या गोड गोड आठवणी त्याच्या मनाला दंश करूं लागल्या!

उशाशीं ठेवलेली मुरली घेऊन तो बाहेर आला. यमुनेच्या तीरावर कदंबवृक्षाखालीं गेला. त्यानें मुरली वाजविण्याचा प्रयत्न केला. पण आतां तिच्यांतून एकहि सूर निघेना. ती मुरली एकदम मुकी कां झाली हें त्याला कळेना!

अशा स्थितींत वृंदावनांत राहण्यांत कसलें सुख होतें? त्यापेक्षां संध्याकाळीं भेटलेल्या त्या विलक्षण जोडप्यानें वर्णन केलेल्या द्वारकेंत गेलेलें काय वाईट? इथें आपलें जें हरवलें आहे, तें तिथें आपल्याला मिळेल!

मनाशीं निश्चय करून कृष्ण कालिया डोहाकडे गेला. कितीतरी वेळ तो त्या डोहाच्या कांठावर एखाद्या दगडी मूर्तीसारखा उभा होता! शेवटीं त्यानें वृंदावनांतल्या भूमीची चिमूटभर माती घेतली आणि ती कपाळाला लावली. मग हातांतली मुरली समोरच्या डोहांत फेंकून देऊन त्यानें यमुनेकडे, गोवर्धनाकडे, वृंदावनाकडे, साऱ्या गतजीवनाकडे पाठ फिरवली आणि तो झपाझप चालूं लागला.

## : २ :

वृंदावन मागें पडलें—दूर राहिलें! दररोज अधिक अधिक दूर होऊं लागलें. पण पहिले कांहीं दिवस कृष्णाचें मन तिथल्या आठवणींनीं अतिशय अस्वस्थ होतें. दिवस कसाबसा वाटचालींत जाई. पण रात्रीं विसाव्याकरितां कुठल्यातरी देवळांत नाहींतर धर्मशाळेंत अंग टेकलें, कीं त्याचें मन भरकन उडून वृंदावन गाठे. वाटचालीनें शरीर शिणलें असूनहि त्याला चटकन् झोंप लागत नसे. मोठ्या कष्टानें ती लागली तरी उभ्या पिकावर टोळधाड यावी, त्याप्रमाणें स्वप्नांचे थवेच्या थवे येऊन तिच्यावर बसत!

हीं सारीं स्वप्नें वृंदावनाविषयींचीं असत. एका स्वप्नांत गधा प्रचंड डेऱ्यांत सारी यमुना ओतून तिचें मंथन करीत आहे असें दिसे. हें विचित्र ताक ज्या रवीनें ती करी, ती मध्येंच मुरलीसारखी दिसूं लागे. त्या रवीला बांधलेली दोरी—छे! भिऊन अंग चोरून बसलेला कालियाच

होता तो! ताक झाल्यावर गवैनें हळूच हातांवर झेलीत, सारखा करीत डेऱ्यांतून लोण्याचा गोळा बाहेर काढला. तो गोळा एकदम हंसूं लागला. छे! तो गोळा नव्हताच मुळीं! तो तर होता पेंद्या!

दुसऱ्या स्वप्नांत राधा आपल्याला घुसळखांबाला बांधून ठेवीत आहे असा त्याला भास होई. ती म्हणे, "तूं मुलखाचा अवखळ आहेस. तुला मोकळं सोडलं, तर माझ्या हातांत तुरी देऊन तूं कुठंतरी दूरदूर पळून जाशील! मग मी तुला कुठं शोधायला येऊं? भूक लागली तरी मी तुला अस्सा बांधून ठेवणार नि माझ्या हातानं भरवणार!"

प्रत्येक रात्रीं अशीं नानाप्रकारचीं स्वप्नें त्याची झोंप मोडून टाकीत. मग ऐन मध्यरात्रीं तो बेचैन होऊन उठून बसे. त्याला वाटे, असें उठावें आणि तोंड फिरवून वृंदावनाच्या वाटेला लागावें!

पण पहांट झाली कीं त्याचें मन थाऱ्यावर येई. अरुणोदयानंतरचा पूर्वेकडला सोन्याचा पूर पाहिला कीं त्याला पश्चिमेकडल्या द्वारकेची आठवण होई. मग मन घट्ट करून त्या द्वारकेचें चिंतन करीत तो पुढें चालूं लागे.

**: ३ :**

निम्मी वाट मागें पडली. जुन्या स्वप्नांचे कांटे हळूंहळूं कमी बोचूं लागले. नव्या स्वप्नांच्या कळ्या उमलूं लागल्या. आपण द्वारकेला केव्हां पोचूं, तिथला श्रीकृष्ण आपल्याला लगेच भेटेल का, तो कसा दिसत असेल, इत्यादि प्रश्नांचीं गोड गोड उत्तरें त्याला स्वप्नांत मिळूं लागलीं.

एके दिवशीं संध्याकाळीं प्रसन्न मनःस्थितींत तो एका खेड्यांतल्या देवळापाशीं आला. देवळाबाहेरच पिंपळाचा मोठा पार होता. विसांवा घेण्याकरितां तो तिथें बसला. त्याच्या पाठोपाठ उलट वाटेनें आलेला दुसरा प्रवासी आला. तो त्याच्यापेक्षां वयानें बराच मोठा होता. पण त्याच्या मुद्रेवर वयापेक्षांहि निराशेच्या आणि विफलतेच्या खुणा अधिक दिसत होत्या.

तो प्रवासी त्याच पारावर येऊन बसला. तो आपल्या ओळखीचा आहे असा कृष्णाला क्षणभर भास झाला. पण आपण त्याला कुठें पाहिलें आहे हें मात्र त्याला आठवेना! शेवटीं एकदम त्याला आठवण झाली—यमुनेच्या पाण्यांत आपण आणि आपले सवंगडी एकमेकांचीं प्रतिबिंबें पाहत आणि त्यांना वाकुल्या दाखवीत खेळत होतों. त्यावेळीं एकदां हा मनुष्य आपल्याला दिसला होता—आपल्या प्रतिबिंबांतून त्याची आकृति वर आली होती!

छे! असें कसें होईल? ज्या मनुष्याला आपण आयुष्यांत आज प्रथम पाहत आहों, त्याचें प्रतिबिंब बालपणींच यमुनेच्या पाण्यांत आपल्याला दिसलें असेल, हें कसें शक्य आहे? छे! आपल्या वेड्या मनाला होणारा हा एक खुळा भास आहे!

तो विचार करीत असतांनाच त्या प्रौढ प्रवाशानें प्रश्न केला, "मित्रा, कुठं निघालाहेस तूं?"

"द्वारकेला."

"द्वारकेला? छे! दुसऱ्या कुठल्यातरी नगरीला जात असशील तूं! चुकून द्वारकेचं नांव जिभेवर आलं असेल तुझ्या?"

"छे! छे! मी द्वारकेलाच जातोंय्. श्रीकृष्णाच्या द्वारकेला. त्याचं नि माझं नांव एकच आहे. मी कृष्ण, तो श्रीकृष्ण. श्रीकृष्णाच्या सोन्याच्या द्वारकेला जातोंय् मी!"

"मग माझं ऐक."

"काय?"

"पुढं जाऊं नकोस."

"कां?"

"मागसानं उगीच पायपीट करण्यांत काय अर्थ आहे?"

"काय, म्हणतांय् काय तुम्ही?"

"तूं द्वारकेला कधींच पोचणार नाहींस!"

"इतकी द्वारका लांब आहे?"

"हो!"

"खोटं बोलतांय् तुम्ही!"

"असा चिडूं नकोस, रागावूं नकोस. द्वारका इथून जवळ होती!"

"होती काय? आहे—आहे—आहे!"

*आमचें राज्य!... आमचा राज्यकारभार!... : २ :*

**पंजाबची 'पंचाईत!'**





अनुक्रमणिका

"अं हं. आतां ती जवळ नाहीं—दूर नाहीं—"

"म्हणजे? काय बडबडतांय् तुम्ही? वेडबिड तर लागलं नाहीं ना तुम्हांला?"

"कधीं कधीं वेडा हाच जगांतला सर्वांत शहाणा मनुष्य ठरतो! मित्रा, द्वारका नांवाची नगरीच आतां अस्तित्वांत नाहीं!"

"काय झालं द्वारकेला?"

"ती समुद्रांत बुडाली!"

"शक्य नाहीं. मी द्वारकेला जाऊं नये म्हणून तुम्ही खोटं सांगतांय् हें मला. त्या सुंदर तरुणीनं आणि त्या प्रेमळ वृद्धानं सांगितलेलं सारं सारं."

"त्या तरुणीचं नांव काय? त्या वृद्धाचं नांव काय?"

कृष्णाला कुठें त्यांचीं नावें ठाऊक होतीं? तो गप्प बसला.

प्रौढ प्रवासी खिन्न स्वरानें त्याला म्हणाला, "तुला मी खोटं कशाला सांगूं? आपलं मूल जिवंत असतांना तें मेलं असं खोटंच सांगणारी आई कधीं कुणी पाहिली आहे का?"

"छे! अशी आई त्रिभुवनांत नसेल!"

"म्हणूनच मी सांगतो त्याच्यावर विश्वास ठेव. द्वारकेला जाण्याची निष्फळ धडपड आतां करूं नकोस!"

"तुमच्यावर आंधळेपणानं विश्वास ठेवावा असे तुम्ही कोण आहांत?"

"मी? द्वारका बुडाल्याचं दुःख ज्याला सर्वांत अधिक झालं आहे तो! ज्यानं द्वारका निर्माण केली तो! मी—मी—माझं नांव श्रीकृष्ण!"

कृष्ण चपापला. गोंधळला. मग टक लावून श्रीकृष्णाकडे पाहूं लागला. हळूंहळूं त्याच्या डोळ्यांतून घळघळा अश्रू गळूं लागले.

श्रीकृष्णानें कृष्णाच्या खांद्यावर हात ठेवला. पाठीवरून हात फिरविला. मग तो सावकाश बोलूं लागला, "तूं ल्हान आहेस अजून! कुठलंहि स्वप्न भंग पावलं कीं त्याचं अतिशय दुःख होण्याचं वयच आहे तुझं!"

"द्वारका बुडाली म्हणून तुम्हांला नाहीं दुःख होत?"

"होतंय्. पण तें तुझ्यासारखं नाहीं. ती कां बुडाली हें मला कळतंय्. ती बुडाली पापाच्या भारानं! वैभवाच्या उन्मादानं!"

"तुम्ही काय बोलतांय् तें कळत नाहीं मला!"

"काय सांगूं तुला? माझे यादव सुखी व्हावेत म्हणून मी सोन्याची द्वारका निर्माण केली. ऐश्वर्याच्या शिखरावर त्या सर्वांना मी नेऊन बसवलं. पण पिकलेलं फळ जसं हळूंहळूं कुजूं लागतं, तसं ध्येयशून्य वैभवहि हळूंहळूं पापांना जन्म देऊं लागतं. द्वारकेंतले यादव मौज म्हणून मद्य पितां पितां मद्यपी बनले. दारूच्या धुंदींत त्यांनीं एका महर्षीची कुचेष्टा केली आणि शेवटीं त्या ऋषीच्या शापानं—"

श्रीकृष्णाचा कंठ रुद्ध झाला. बोलतां बोलतां तो थांबला.

कांहींतरी बोललें पाहिजे म्हणून कृष्णानें विचारलें, "आतां कुठं चाललांय् तुम्ही?"

"जिथं हें दुःख विसरतां येईल तिथं! माझं जें हरवलं आहे तें मला परत मिळेल अशा जागीं!"

"मी सुद्धां त्यासाठींच द्वारकेला चाललों होतों. आतां मी तुमच्याबरोबर येईन. कुठं जायचं आपण? हिमालयांत?"

"अं हं!"

"मग? एखाद्या तीर्थक्षेत्राकडं?"

"त्याची कांहीं जरुरी नाहीं. कुठल्याहि तीर्थक्षेत्रापेक्षां अधिक पवित्र असं एक क्षेत्र मी शोधून काढलं आहे."

"तें कोणतं?"

"कुरुक्षेत्र!"

"तिथं काय आहे?"

"तिथं तुझं माझं जें जें कांहीं हरवलं आहे, तें तें शोधून देणारा एक महापुरुष आपल्याला भेटेल!"

"त्याचं नांव?"

"माझं नि त्याचं नांव एकच आहे. पण तो मोठा तत्त्वज्ञानी आहे म्हणून लोक त्याला भगवान् श्रीकृष्ण म्हणतात."

"ज्याचं जें हरवलं आहे तें भगवान् त्याला शोधून देतात?"

"हो! असं ऐकलंय खरं मी! कौरव आणि पांडव यांच्या युद्धांत त्यांनीं तेंच केलं! पांडवांचा मुख्य वीर अर्जुन! ऐनवेळीं समोर काकेमामे उभे राहिलेले पाहून त्याचा धीर हरपला. मी लढत नाहीं असं तो म्हणूं लागला. पण भगवान् श्रीकृष्णांनीं त्याला गीता सांगितली. मग अर्जुनाचा धीर परत आला. तो प्राण पणाला लावून लढला. अशी आहे ती गीता! त्या गीतेंत भगवान् श्रीकृष्णांनीं सुख आणि दुःख हीं माणसानं कशीं सारखीं मानावीं हें सांगितलं आहे म्हणे!"

कृष्ण उतावळेपणानें उद्गारला, "चला, श्रीकृष्णजी चला. आपण याच पावलीं कुरुक्षेत्राचा रस्ता धरू या."

## : ४ :

भूक, तहान, झोंप, विसांवा, दिवस, रात्र सारें सारें विसरून ते दोघे कुरुक्षेत्राच्या दिशेनें चालत होते. त्यांचे पाय धुळीनें काळवंडत होते, पण मनें पळापळाला सोनेरी प्रकाशानें उजळत होतीं.

कुरुक्षेत्राजवळच एका पर्णकुटिकेंत भगवान् श्रीकृष्ण तप करीत राहत आहेत असें त्यांना कळलें. एका बाजूला असलेली ती पर्णकुटी शोधून काढेपर्यंत दहाबारा घटका रात्र होऊन गेली!

उदास काळोख जिकडेतिकडे पसरला होता. त्या काळोखांत पर्णकुटीच्या दारांतच एक वयस्क पुरुष उभा असलेला त्यांना दिसला. ते अगदीं जवळ गेले. या पुरुषाची मुद्रा आपण कुठेंतरी पाहिली आहे असें श्रीकृष्णाला वाटलें. पण कुठें तें त्याला नीट आठवेना. अंधारांत वीज चमकावी, तशी मग एकदम त्याला आठवण झाली.

एकदां सत्यभामेनें समुद्रक्रीडेचा हट्ट धरला होता. एका चांदण्या रात्रीं तिला घेऊन आपण नौकाविहाराला गेलों होतों. गालाला गाल लावून आपलीं प्रतिबिंबें पाण्यांत पाहत होतों. तीं अगदीं अंधुक दिसत होतीं. मधेंच सत्यभामा एकदम दचकली. त्या प्रतिबिंबाकडे बोट दाखवूं लागली. आपण निरखून पाहिलें. आपल्या प्रतिबिंबांतून एक वयस्क आकृति बाहेर येत होती. ती आकृति याच पुरुषाची होती!

त्या पुरुषाला अभिवादन करून श्रीकृष्णानें लीनतेनें विचारलें, "भगवान् श्रीकृष्ण आपणच ना?"

"लोक मला भगवान् म्हणतात. पण माझ्यासारखा अभागी—"

श्रीकृष्ण चपापला. गीता सांगणाऱ्या तत्त्वज्ञान्याकडून असलें कांहीं उत्तर आपल्याला मिळेल अशी त्याला कल्पना नव्हती! क्षणभर थांबून तो म्हणाला, "आपली कीर्ति ऐकून फार दुरून आलों आहों आम्ही!"

"कसली कीर्ति?"

"मनाला शांति देण्याची."

"वाळूचे कण रगडून कुणाला अमृत मिळालं आहे?"

भगवान असें कां बोलत आहेत हें श्रीकृष्णाला कळेना. इतक्यांत तेच म्हणाले, "चला माझ्याबरोबर!"

"कुठं?"

"जियं कौरवपांडवांचं युद्ध झालं त्या कुरुक्षेत्रावर!"

"अशा अपरात्रीं?"

"हो! रोज रात्रीं मी तिथं जातों. ज्या जागीं अर्जुनाला गीता सांगितली, त्या जागीं मध्यरात्रीपर्यंत बसतों–विचार करतों! मी अर्जुनाला युद्धाला प्रवृत्त केलं हें खरं आहे. पण या युद्धानं कुणाचं कल्याण झालं? अठरा अक्षौहिणींचा इथं सत्यानाश झाला. पण त्यामुळं कोण सुखी झालं? पांडवांना राज्य मिळालं. पण त्या राज्यापायीं बाकी सर्व त्यांनीं गमावलं! अर्जुनाला स्थितप्रज्ञतेनं युद्धाचा उपदेश करणारा मी! पण रोज रात्रीं त्या युद्धभूमीवर जाऊन मी एकच विचार करीत बसतों—अर्जुन लढला नसता तर? तर अधिक बरें झालें असतें का? तो लढला नसता तर कदाचित् कौरव विजयी झाले असते! पण आज प्रत्येकाच्या जीवनाला आलेली ही स्मशानाची अवकळा तरी टळली असती! माझा उपदेश बरोबर होता कीं चूक होता, हें माझं मलाच कळेनासं झालं आहे. मी वैतागून गेलों आहे. मनःशांतीसाठीं कुठंतरी जावं असं मी सारखं म्हणत आहे!"

"कुठं जाणार आपण?" श्रीकृष्णानें उत्सुकतेनें विचारलें,

"वृंदावनाला. तिथं एक गोपाळकृष्ण आहे म्हणे! निसर्ग, प्राणी आणि माणसं या सर्वांचा तो जिवलग मित्र आहे. त्याच्यापाशीं एक मुरली आहे. त्या मुरलीचे सूर ऐकले कीं, जगांतल्या सर्व दुःखांचा विसर पडतो असं मागं मी ऐकलं होतं! पण मला माझ्या तत्त्वज्ञाना-या शक्तीचा अभिमान होता. तो अभिमान युद्धाचे हे परिणाम पाहून गळाला! आतां—"

कृष्ण हळूंच म्हणाला, "महाराज, मीच तो गोपाळकृष्ण! पण—"

भगवान् श्रीकृष्णानें त्याला पुढें बोलूंच दिलें नाहीं. तो त्याला म्हणाला, "मित्रा, चल, चल. याच पावलीं तुझ्या वृंदावनाला चल!"

: ५ :

तिघेहि वृंदावनांत आले. कालियां डोहाच्या कांठीं गेले. फेकून दिलेली मुरली बाहेर काढण्याकरितां कृष्ण डोहांत उडी टाकूं लागला. इतक्यांत पेंद्याची हांक त्याच्या कानावर आली. त्यानें वळून पाहिलें. तो पेंद्याच होता. कृष्णावांचून मथुरेंत करमेना म्हणून तो परत वृंदावनांत आला होता. पण तिथें कृष्णच नव्हता! त्याच्यासारखीच राधाहि कृष्णाला भेटायला आली होती. कृष्ण नाहीं म्हणून ती फार फार दुःखी झाली होती.

कृष्णानें विचारलें, "कुठं आहे ती?"

"तुला शोधायला गेलीय्. तूं इथं नाहींस म्हणून तुझी मुरली ती शोधूं लागली. ती कुठं मिळेना! मग ती कालियाच्या डोहावर येऊन एकटीच रडत बसूं लागली. एके दिवशीं या डोहांतून तिला तुझ्या मुरलीचे सूर ऐकूं येऊं लागले. तूं वृंदावन सोडून जायचा नाहींस अशी तिची खात्री होतीच! तूं डोहांत लपला आहेस असं तिच्या मनानं घेतलं! तुझ्या भेटीसाठीं तिनं डोहात उडी टाकली. लोकांनीं तिला काढली, तेव्हां ती बेशुद्ध होती. पण तुझी मुरली मात्र तिनं हातांत घट्ट धरली होती."

"कुठं आहे ती मुरली!" भगवान् श्रीकृष्णांनीं मधेंच प्रश्न केला.

"कृष्णाला शोधून काढून त्याला ती यायला राधा गेली आहे. जातांना ती म्हणाली, "सारं जग पालथं घालीन; पण कृष्णाला हुडकून काढीन, त्याच्या हातांत ही मुरली देईन नि तिचे गोड सूर ऐकतांना प्राण सोडीन."

हें ऐकून कृष्णाच्या डोळ्यांत पाणी उभें राहिलें याचें पेंद्याला नवल वाटलें नाहीं. पण त्याच्या बरोबरच्या त्या अपरिचित मोठीं माणसें आपले डोळे कां पुशीत आहेत हें त्याला कळेना! • • •


सौख्याचा क्षण
दिवाळीच्या या मंगलदिवशीं सर्वजण आनंदांत आहेत. आयुर्विम्यानें मिळालेल्या आर्थिक सुरक्षिततेमुळें व ती सतत मिळणार आहे या खात्रीमुळें हजारों कुटुंबांचा आनंद शतगुणित झाला आहे. म्हणूनच विमा कॉर्पोरेशनला ते मनापासून धन्यवाद देत आहेत, आपली कृतज्ञता व्यक्त करीत आहेत.
लाइफ इन्शुअरन्स कॉर्पोरेशन ऑफ इंडिया
ASP/LIC-SPJ




*अखेर तिच्या मनांत होतं तरी काय? प्रेमाच्या खेळांत सीमारेषेपर्यंत येऊन ती तिथंच कां घुटमळत होती? आणि माझ्या व्याकुळतेमुळें तिच्या जिवाला कसले क्लेश होत होते?....*

स्टॉपवर बस आली तेव्हां कंडक्टरनें पुकारा केला, "खाली एक आदमी आ जाव! खाली एक आदमी —"

पडत्या फळाची आज्ञा मानून मी एकदम पुढें झालों. माझ्या पाठोपाठ माणसांचा लोंढा आला पण त्या साऱ्यांना कंडक्टरनें अडवलें. मला आंत घेतलें आणि बाकीच्यांना हुसकून लावलें. वरच्या डेकवर जाऊं लागलों, तेवढ्या अवधींत बस चालू झाली. तोल सांवरीत मी वर गेलो आणि जागा कुठें आहे तें पाहूं लागला. पुढच्या बाजूला सीट आढळली तेव्हां गँगवेमधून पुढें झालों.

मी जागेवर बसतां न बसतां तोंच तिकिटासाठी कंडक्टर शेजारीं येऊन उभा राहिला. नेहमींच्या बेफिकिरपणानें 'शिवाजीपार्क' असें म्हणत मी खिशांत हात घातला. पण हाताला पाकीट लागलें नाहीं तेव्हां चपापून हात तसाच बाहेर काढला आणि घाईघाईत इतर खिसे चाचपूं लागलों.

माझा उडालेला गोंधळ कंडक्टरच्या लक्षांत आला असावा. मोठ्या आदबीनें त्यानें विचारलें, "काय झालें साहेब?"

काय झालें होतें तें माझ्या लक्षांत आलें होतें. पण तें त्याला सांगण्यांत अर्थ नव्हता. मी कांहींच न बोलतां त्याच्याकडे केविलवाणें पाहिलें, तेव्हां त्यानें विचारलें, "कुणी पाकीट मारलें काय साहेब?"

"नाहीं. मीच आफिसमध्यें विसरलों" आणि मग जागेवरून उठल्या-सारखे करीत मीं म्हटलें, "पुढच्या स्टॉपवर उतरून जाईन."



अनुक्रमणिका

कंडक्टर बाजूला झाला तेव्हां शेजारीं बसलेल्या व्यक्तीनें विचारलें, "पुढच्या स्टॉपवर उतरून काय करणार?"

नाजुक आवाजांत विचारलेल्या ह्या प्रश्नानें माझी नजर एकदम त्या बाजूला वळली. शेजारच्या व्यक्तीकडे मी इतका वेळ पाहिलेंहि नव्हतें. मला सर्वस्वी अपरिचित असलेली ही तरुण मुलगी आपल्या बोलक्या डोळ्यानें मला विचारीत होती, 'पुढच्या स्टॉपवर उतरून काय करणार?'

तिच्याकडे पाहून मी म्हटलें, "कुणीतरी ओळखीचा भेटला तर त्याच्याकडून जरुरीपुरते पैसे घेईन."

माझ्या ह्या बोलण्यावर ती मला समजणार नाहीं अशा बेतानं हंसली आणि माझ्या बाजूला झुकून विचारूं लागली, "तुमचें तिकिट मी काढलें तर तुमची कांहीं हरकत नाहीं ना?"

माझ्या खिशांत भरपूर पैसे असतांना माझ्यासाठीं कुणी कांहीं केलें असतें तर त्याचें मला विशेष वाटलें नसतें. पण ह्या अशा वेळीं तिच्याकडून मदत घेतांना मला संकोचल्यासारखें झालें. त्यामुळें तिच्या प्रश्नाला उत्तर न देतांच मी गप्प राहिलों. मी बोलत नाहीं त्याअर्थी माझी संमति आहे असें समजून तिनें कंडक्टरला जवळ बोलावलें आणि म्हटलें, "एक शिवाजी पार्क."

तिनें माझ्या हातांत तिकिट दिलें तेव्हां तिच्याकडे पहात मी म्हटलें, "औपचारिकपणें मीं तुमचे आभार मानले तर तें तुम्हांला आवडणार नाहीं—"

"खरं आहे. पण असा प्रस्ताव करून आभार मानणार आहां काय?"

तिच्या मनमोकळ्या प्रश्नानें मला एकदम हंसूं आलें. हंसत हंसतच मी म्हटलें, "नाहीं नाहीं. तसा वेडेपणा मी करणार नाहीं." आभार मानण्याचा वेडेपणा मी केला नाहीं, तरी मनमोकळं हंसण्याचा वेडेपणा माझ्या हातून घडला होता. बाजवीपेक्षां जास्त मोकळेपणान मी हंसलों होतों आणि तें तिला आवडलं नसावं. कारण माझ्याकडे दुर्लक्ष करून ती आतां खिडकींतून बाहेर पाहूं लागली होती.

केंप कॉर्नरवरून बस आतां पुढें सरकत होती. खुणेचीं ठिकाणें मागें पडत होतीं. समुद्रावरून येणाऱ्या वाऱ्याची चाहूल लागत होती आणि नकळत मी सुखावत होतों. असें असलें तरी शेजारीं बसलेल्या मुलीला चुकूनही स्पर्श होऊं नये म्हणून मी जरूर ती सावधगिरी बाळगीत होतों. एखाद्या चिमणीनें मुडपून बसावें, तशी ही मुलगी अंग चोरून बसली होती. हाजीअलीला बस आली आणि समुद्रावरून येणारा वारा आंत घुसूं लागला, तेव्हां तिनें आपला चेहरा चटकन् आंत वळवला. तिची माझी दृष्टभेट झाली, तेव्हां तिनें म्हटलें, "फार वारा आहे. नाहीं?"

तिच्या नाजुक देहाला वाऱ्याचा जोर सोसवत नसावा असें वाटून मी विचारलें, "शटर ओढून घेऊं काय?"

तिनें कांहीं उत्तर देण्यापूर्वीच अर्धेअधिक शटर खालीं ओढून घेतलें आणि बाजूला सरकत मी म्हटलें, "तुम्ही अशा अवघडून कां बसतां? माझा त्रास होतो काय?"

इतका वेळ ती अवघडून बसली होती ती आतां ऐसपैस बसली. आणि एका अर्थानें न बोलतांच तिनें माझ्या प्रश्नाचें उत्तर दिलें. ती कांहीं बोलली नाहीं तरी मला वाटलें तिला म्हणावयाचें होतें, 'माझ्यासारख्या सडपातळ देहाच्या मुलीला अशी किती जागा लागणार?' ती असं बोलली असती तर तें अगदीं वाजवी ठरलं असतं. कारण चणीनें ही मुलगी अगदीं लहान होती. एखाद्या सुरेख बाहुलीला सजवावं तशी ती दिसत होती. आणि कुणालाहि वारंवार पाहण्याचा मोह व्हावा इतकी ती मोहक होती. पण तिच्याकडे असें पहात राहणेंही ठीक नव्हतें. रेंगाळणाऱ्या नजरेचा भार ही ह्या चिमणीला सोसवला नसता.

पोर्तुगीज चर्चला बस वळली तेव्हां मी विचारलें, "तुम्ही कुठं उतरणार?"

खोडकरपणें हंसत तिनें म्हटलें, "तुम्हांला काय विचारायचं आहे? मी कुठं उतरणार कीं मी कुठें रहातें?"

ही मुलगी मोठी चतुर आहे हें माझ्या केव्हांच लक्षांत आलें होतें. ज्या खोडकरपणानें तिनें प्रश्न विचारला होता, त्याच खट्याळपणानें मी म्हटलें, "कुठें राहतां तें सांगितलंत तर जास्त छान होईल."

"कशाकरतां?"

ती कुठें रहाते हें मला कशाकरतां हवें होतें तें तिला सांगणें मोठें अवघड होतें. तरीही तिचा कांहीं गैरसमज होऊं नये म्हणून मी घाईघाईत म्हटलें, "अडल्या वेळीं तुम्ही मला मदत केली—"

"ती आतां पैसे परत करून तुम्ही फेडून टाकणार आहां; खरं ना?"

माझ्या मनांतला विचार तिनें बोलून दाखवला तेव्हां मी दचकलों. पण तसें न दाखवतां म्हटलें, "तुमचे पैसे परत करतां आले तर मला आनंद होईल."

"पण तुम्ही असं कांहीं केलं नाहीं तर मला विशेष आनंद होईल." आणि मग आपले टपोरे डोळे माझ्यावर रोखून तिनें विचारलें, "मी पैसे घेतलेच पाहिजेत असा तुमचा आग्रह आहे काय?"

"मुळींच नाहीं" आणि तिच्याकडे पहात मी म्हटलें, "पण तुमचें नांव कळावें असा-मात्र माझा जरूर आग्रह आहे."

"उपकारकर्तीचं नांव ठाऊक असलेलं बरं; नाहीं का?" ती असं बोलत होती, पण आपलं नांव सांगत नव्हती. मी एकदोनदां वळणावळणानें सुचवून पाहिलें. पण तिनें तिकडे लक्ष दिलें नाहीं.

शेवटीं शिवाजी पार्क आलें तेव्हां उठतां उठतां मी म्हटलें, "तुम्ही अजूनही आपलं नांव सांगितलं नाहीं."

माझ्याकडे पाहून ती हंसली आणि म्हणाली, "पुन्हां असेंच केव्हां भेटूं तेव्हां जरूर सांगेन."

एका धुंदींत मी खालीं उतरलों. खालीं उतरल्यावर एकदां वर पहावें आणि जमल्यास हात हलवावा असें फार वाटलें. पण तेवढा धीर मला झाला नाहीं. माझ्यापासून दूर जाणाऱ्या बसकडे मी कितीतरी वेळ नुसताच पहात राहिलों. नेहमींप्रमाणें हातांतील तिकिट फेंकून न देतां तें मी एका विशिष्ट भावनेनें जपून ठेवलें.

• •

ही मुलगी लौकरच पुन्हा केव्हांतरी दृष्टीस पडेल असा मला विश्वास वाटत होता. मोठ्या अपेक्षेनें मी त्याच वेळीं, त्याच स्टॉपवर दोनचार दिवस उभा रहात होतों. आशेनें बसमधें चढत होतों आणि पदरीं निराशा पडत होती. संथ पाण्यांत खडा पडावा आणि तरंग उठावे, तसें माझें झालें होतें. ध्यानीं मनीं नसतांना ही मुलगी मला भेटली होती. माझें तिनें तिकिट काढलें होतें. माझ्याजवळ ती थोडेंफार बोलली होती. पण तिनें गांवनांव सांगितलें नव्हतें. पुन्हा भेटल्यावर नांव सांगण्याचें तिनें आश्वासन दिलें होतें. पण तें आश्वासन कधीं सफल होईल असें आतां वाटत नव्हतें. तिच्याविषयीं आतां व्यर्थ विचार करावयाचा नाहीं असें मी मनाला बजावीत होतों आणि त्याच वेळीं मन तिचा विचार करीत होतें.

हलक्या हातानें कुणी गुदगुल्या केल्या म्हणजे जीव गुदमरतो, पण हसूंहि येतें. तसें माझें होत होतें. तिच्या विचारानें मी एकाचवेळीं अस्वस्थ होत होतों आणि सुखावतहि होतों. ती भेटेल म्हणून उगवत्या दिवसाचें मी स्वागत करीत होतों आणि भेटत नाहीं म्हणून निराश होत होतों.

पण हे आशानिराशेचे झोके मला फार दिवस खावे लागले नाहींत. अगदीं अचानक ती मला पुन्हां बसमध्येंच दिसली.

शिवाजी पार्कला मी बसमध्यें चढलों आणि वरच्या डेकवर नेहमींप्रमाणें जाऊन बसलों, तेव्हां पुढच्या बाजूला खिडकीजवळ बसलेली ती मला दिसली. कुसुंबी पातळांतल्या ह्या पाकोळीला पाहून माझ्या मनांत नाना तरंग उठले. एकदां वाटलें, पुढें व्हावें आणि ओळख आहे का म्हणून विचारावें. जमलें तर शेजारीं बसावें. पण मी तसें कांहीं केलें नाहीं. तिकिटासाठीं कंडक्टर शेजारीं आला, तेव्हां माझ्याबरोबर तिचेंहि तिकिट घेतलें. आणि मी तिकिट घेतल्याचें तिला आपोआपच कळेल ह्या भावनेनें स्वस्थ बसून राहिलों.

तिकिटें देत कंडक्टर पुढें गेला, तेव्हां तिकिटासाठीं तिनें पैसे पुढें केले. कंडक्टर तिच्यापाशीं काय बोलला तें मला कळलें नाहीं. पण तिनें एकदम चमकून मागें पाहिलें. मी दिसलों, तेव्हां तिचा चेहरा फुलासारखा फुलला. जागेवरुन उठत ती मी बसलो होतों तिथें आली आणि 'तुम्ही होय!' असा आश्चर्योद्गार काढीत माझ्या शेजारीं येऊन बसली.

ही मुलगी भेटावी म्हणून मी धडपड करीत होतों. निदान दृष्टीस तरी पडावी म्हणून गेले आठ दिवस झुरत होतों. आतां ती माझ्या शेजारीं येऊन बसली होती आणि तिच्यापाशीं काय बोलावें तें मला सुचत नव्हतें. असाच गप्प बसून राहिलों तर उतरण्याचें ठिकाणहि येईल आणि कांहीं न बोलतांच आमची ताटातूट होईल ह्या भयानें तिच्याकडे पहात मी म्हटलें, "तुम्ही कांहीं बोलत कां नाहीं?"

"हाच प्रश्न मी तुम्हांला विचारणार होते." आणि आम्ही दोघे हसूं लागलों.

हंसतां हंसतांच मी विचारलें, "आतां आज तरी नांव सांगणार कीं नाहीं?"

"सांगेन कीं–नांव न सांगायला काय झालं!" असं म्हणत तिनें मिस् देशपांडे असं आपलं नांव सांगितलं.

तिचं नाव ऐकून मी म्हटलं, "हें तर तुमचं आडनांव झालं."

"मग?"

"मला तुमचं नांव हवं आहे—"

'बरेच आहां कीं हो' अशा अर्थानें तिनें माझ्याकडे पाहिलें, आणि म्हटलं, "माझं नाव पल्लवी—मिस् पल्लवी देशपांडे."

"पल्लवी" असा तिच्या नांवाचा उच्चार करीत त्या नांवाची जणूं चव घेऊन मी विचारलें,

"तुम्हांला म्हणतात काय?"

"वेवी—"

"ओ हो! किती बरोबर!"

"कां हो! काय झालं?"

"कांहीं नाहीं. तुमच्यासारख्या नाजुक आणि सुरेख मुलीला वेवीच म्हटलं पाहिजे."

बोलण्याच्या भरांत ती नाजुक आणि सुरेख असल्याचें मी सांगून टाकलें होतें. माझ्या अभिप्रायानें ती थोडीफार खुलली. किंचित् माझ्या बाजूला सरकत तिनें म्हटलें, "माझं नांव विचारून घेतलंत. पण आपलं सांगितलं नाहींत—."

गंभीरपणाचा लटका आव आणीत मी म्हटलं,

"पुढच्या खेपेला भेटूं तेव्हां सांगेन."

"नाहीं हं—तसं चालायचं नाहीं."

"बरं बुवा" असं म्हणत मी माझं आडनांव, नांव आणि उपनांव सांगून टाकलं. तिच्या संभाव्य प्रश्नाचीं मी एका दमांत उत्तरें दिलीं, तेव्हां तिला हंसूं आलं. माझ्या स्वभावांतला खेळकरपणा तिच्या लक्षांत आला आणि ती मनमोकळं बोलूं लागली.

त्यादिवशीं आम्ही खूपच बोललों. एकमेकांचो अनेक दिवसांची ओळख असल्याप्रमाणें गप्पा मारल्या. माझ्याविषयीं शक्य तेवढे तपशील तिला दिले आणि मोठ्या खुबीनें तिची माहिती काढून घेतली. ती कुठें राहते, कुठच्या कॉलेजांत जाते, काय शिकते ह्या जुजबी माहितीबरोबर तिच्या आवडीनिवडींचाही तिनें ओझरता उल्लेख केला.

ऑपेरा हाऊस आलें आणि आतां मी उतरणार हें तिच्या लक्षांत आलें, तेव्हां तिनें आपल्या घरचा टेलिफोन नंबर मला दिला आणि घाईघाईत माझ्या ऑफिसचा टिपून घेतला.

• •

अजूनपर्यंत आमच्या दोनदांच गांठीभेटी झाल्या होत्या. त्याही धांवत्या आणि योगायोगानें. आतां ठरवून आणि तेंही सवडीनें भेटावें असें फार वाटत होतें. मनांत आणलें असतें तर तेंही अशक्य नव्हतें. तिचा टेलिफोन नंबर माझ्या हाताशीं होता. पण कांहीं कारण नसतांना तिला टेलिफोन करणें बाजवी नव्हते. तें ठीकही दिसलें नसतें. अधीरपणाचें प्रदर्शन झालें असतें आणि न बोलतांच तिनें मला बरोबर जोखलें असतें. तसें कांहीं होऊं नये म्हणून मी चालढकल केली. कदाचित् तीच आपणहून टेलिफोन करील म्हणून आशेनें वाट पाहिली.

आणि शेवटीं वाट पाहण्याचें सार्थक झालें!

एक दिवस ऑफिस सुटतां सुटतां तिचा टेलिफोन आला. साळुंकीसारख्या गोड आवाजांत तिनें विचारलें, "संदीप रणदिवेच का?"

"हो–मी संदीप" आणि मी तिला ओळखलें होतें तरी मुद्दामच विचारलें, "पण आपण कोण?"

माझ्या ह्या प्रश्नावर ती हंसली आणि म्हणाली, "ओळखा पाहूं. तीन चान्सीस्."

मला टेलिफोन करणारी अशी दुसरी कुणीच मुलगी माझ्या ओळखीची नव्हती. त्यामुळें भलतेंच नांव सांगून चान्स घेण्याचा संभवच उद्भवत नव्हता. तरीहि विचार केल्यासारखें करीत मी म्हटलें, "मिस् पल्लवी देशपांडे...बरोबर आहे काय?"

"बरोबर ओळखलं म्हणायचं." असं म्हणत तिनें श्वास घेतला आणि म्हटलें, "बोला—"

बोलण्यासारखें पुष्कळ होतें. पण टेलिफोन तिनें केला होता, तेव्हां बोलण्याची जबाबदारी तिच्यावर होती. ह्या गोष्टीचा मी उल्लेख केला, तेव्हां दुखावल्या आवाजांत तिनें विचारलें, "फोन केली ही चूक झाली काय?"

"असं काय बरं! मी कधीं असं म्हटलं का?"

"मग बोला."

आणि मी अभावितपणें बोलून गेलों, "असं काय! बोला ना."

आम्ही असंच बोलत राहिलों तर एकमेकाला बोलण्याचा आग्रह करण्यापलिकडे कांहीं बोलून होणार नाहीं हें ध्यानांत घेऊन मी विचारलें, "आज माझी आठवण कशी काय झाली?"

"झाली अशीच! ह्या बाजूला आलें होतें, वाटलं विचारावं कीं बरोबर दादरला जायचं का?"

मी एकदम सुखावून म्हटलें, "जाऊ कीं" आणि मग सावधगिरीनें विचारलें. "मग तुम्हीं माझ्या ऑफिसांत कां येत नाहीं?"

"मी कुठं येऊं तिकडे?"

"मग मी येऊ काय?"

"या कीं—" असें म्हणत तिनें खुणेचें ठिकाण सांगितलें. तिनें सांगितलेल्या खाणाखुणा लक्षांत ठेवून, 'हा आलोंच' असें म्हणत मी रिसीव्हर खालीं ठेवला आणि तडक ऑफिसच्या बाहेर पडलों.

पल्लवी आज फारच सुरेख दिसत होती. आकाशी रंगाच्या ऑर्गंडींत, नेहमीं सडपातळ दिसणारा तिचा देह जरा स्थूल वाटत होता.

मी दिसलों तेव्हां लटक्या रुसव्यानें तिनें म्हटलें, "किती वेळ टेलिफोन करायचा!"

नेहमीं एंगेज्ड असणाऱ्या ऑफिसच्या टेलिफोननें तिला दमवलें असणार हें माझ्या लक्षांत आलें. तरीही कांहीं समजलेंच नाहीं असें भासवीत मी विचारलें, "कां हो? काय झालें?"

"किती वेळा नंबर फिरवायचा! मेलीं बोटं दुखून आलीं."

मला फार वाटलें कीं तिला विचारावें, 'बोटं चेपून देऊं काय?' पण हा आगाऊपणा खपण्यासारखा नव्हता. म्हणून मी तसें कांहीं बोललों नाहीं. फक्त 'च् च्' असा दिलगिरीप्रदर्शक आवाज काढून विचारलें, "मग टेलिफोनचा नाद सोडून सरळ ऑफिसांतच कां नाहीं आला?"

"तुम्ही बोलावलं कुठ होतं?"

कांहीं प्रश्न असे असतात कीं, त्यावर उत्तर असलें तरी तें न देणें हेंच शहाणपणाचें ठरतें!

तिचा आतांचा प्रश्नहि तशाच स्वरूपाचा होता. मी जसें तिला ऑफिसात बोलावलें नव्हतें, तसेंच कधीं टेलिफोन करावयासहि सांगितलें नव्हतें. पण खरी गोष्ट बोलून रंगाचा बेरंग होऊं नये म्हणून मी गप्प राहिलों. विषय बदलून विचारलें, "कुठें जायचें?"

"कुठं म्हणजे! दादरला—"

"दादरला तर जायचंच आहे. पण कुठं चहा घ्यायचा काय?" आणि अपेक्षेनें तिच्याकडे पहात राहिलों.

पण तिनें माझी निराशा केली. माझा बेत तिनें गोड शब्दांत मोडून काढला आणि म्हटलें,

"चहाच घ्यायचा असेल तर दादरला घरीं घेऊं." आणि मग थांबल्यासारखें करून विचारलें, "येणार ना माझ्या घरीं?"

दादरला जाणारी बस वरळी नाक्यावर आली, तरी ती गप्प बसून राहिली. माझ्याशीं एक अक्षरहि बोलली नाहीं. नुसती शेजारीं बसून राहिली. ती बोलत नव्हती म्हणून मीहि बोलत नव्हतों. शेजारीं शेजारीं बसून गाडीच्या माणसांनीं कांहीं न बोलतां नुसतें एकमेकांकडे चोरून पाहण्यांत काय कमी सुख असतें! ह्या सुखाची लज्जत मी पुरेपूर चाखीत होतों. पण तिच्याकडे पाहतांना चुकूनहि दृष्टभेट झाली नाहीं, तेव्हां मी थोडा फार कावराबावरा झालों. तिच्या मनांत काय चाललें आहे त्याचा अंदाज येईना. तिचा मूड जायला असें एकाएकीं काय झालें तें लक्षांत येईना.

वरळीनाक्यावरून बस पुढें सरकली, तेव्हां तिच्या बाजूला झुकून मी विचारलें, "कसला विचार करतां आहां?" आणि तिनें डोळे उचलून माझ्याकडे पाहिलें, तेव्हां मी चपापलों. हळुवार आवाजांत विचारलें, "तुमच्या डोळ्यांत पाणी कां?"

हातांतल्या छोट्या रुमालानें तिनें डोळे पुसल्यासारखं केलं आणि म्हटलं, "मला थोडं बरं वाटत नाहीं."

"म्हणजे काय होतं?"

"छाती भरल्यासारखी वाटते. अस्वस्थ वाटतं." असं बोलत असतां-नाच तिनें एकदम विचारलं, "पुढच्या स्टॉपवर उतरून सोडा घेऊं या काय?"

"जरूर. सोडा घेतल्यावर तुम्हाला नक्की बरं वाटेल." असा मी तिला धीर दिला आणि बस केव्हां थांबते त्याची वाट पाहूं लागलों

एखाद्या लहान मुलाला जितकें जपून न्यावें तितक्या काळजीनें मी तिला बर्वेरोलीजमध्यें घेऊन गेलों. तिला संकोच वाटूं नये म्हणून मला नको होता तरी मीहि तिच्याबरोबर सोडा घेतला. तिच्या चेहऱ्यावर थोडी हुषारी दिसली, तेव्हां म्हटलं, "आतां थोडा वेळ स्वस्थ बसा. आपोआप बरं वाटेल."

"नको नको. आतां ठीक आहे. घरीं गेल कीं आपोआप बरं वाटेल."

आम्ही रस्त्यावर आलों, तेव्हां मी टॅक्सीला खूण केली. आंत बसतां बसतां तिनें म्हटलें, "माझ्यामुळें तुम्हांला किती त्रास!"

"असं बोललंच पाहिजे काय?"

माझा दुखावलेला स्वर ऐकून ती एकदम विरघळली आणि माझ्या बाजूला सरकून म्हणाली, "नाही. पुन्हा असं बोलणार नाही."

तिच्या घरापाशीं टॅक्सी आली तेव्हां मी विचारलं, "मी तुमच्या घरीं आलों, तर तें तुमच्या वडलांना आवडेल ना?"

"न आवडायला काय झालं? आपली ओळख कशी झाली, मी तुमचं तिकिट कसं काढलं, त्याची तुम्ही परतफेड कशी केली, ह्या साऱ्या गोष्टी मी पपाना सांगितल्या आहेत."

"बाहेर घडणारी प्रत्येक गोष्ट तुम्ही वडलांना सांगतां काय?"

"त्यांच्यापासून मी कांहींच चोरून ठेवीत नाहीं." तिचें हें बोलणें ऐकून मी दचकलों. थोडाफार अस्वस्थ झालों. जपून वागलें पाहिजे म्हणून मनाशीं खूणगांठ बांधली.

मी तिच्या घरीं गेलों, तेव्हां तिनें आपल्या वडलांशीं माझी ओळख करून दिली. वाटेंत तिला कसें अस्वस्थ वाटूं लागलें, मी बर्वेरोलींत तिला कसा घेऊन गेलों, जपून घरीं कसा घेऊन आलों ही सारी हकीकत तिनें वडलांना सांगितली. ती बोलत होती आणि माझ्याकडे पहात तिचे वडील नुसता हुंकार देत होते चारदोन जुजबी प्रश्नोत्तरांपलिकडे ह्या गृहस्थानें माझ्यांत विशेष रस घेतला नाहीं.

पण तिच्याकडचा माझा तासभर वेळ मोठा मजेंत गेला. चहाचा ट्रे घेऊन नोकर आला, तेव्हां तिनें माझ्यासाठीं मुद्दाम चहा तयार केला. मला साखर किती लागते, चहा वीक चालतो कीं स्ट्रॉंग, दूध किती लागतें इत्यादि गोष्टींची आस्थापूर्वक चौकशी केली. नाना विषयांवर माझ्याशीं गप्पा मारल्या. साहित्यापासून स्वयंपाकापर्यंत एकहि विषय तिनें शिल्लक ठेवला नाहीं. मोठ्या उत्साहानें ती बोलत होती आणि मी ऐकत होतों. बोलून बोलून ती दमली, तेव्हां उत्तमोत्तम इंग्रजी रेकॉर्ड्स तिनें वाजवून दाखवल्या. प्रत्येक गोष्टींत दिसून येणाऱ्या तिच्या सौंदर्यदृष्टीचें

मी कौतुक केलं, तेव्हां ती म्हणाली, "चांगल्या चांगल्या गोष्टींचं मला फार वेड आहे." आणि रेंगाळत्या नजरेनें माझ्याकडे पहात राहिली.

ह्या तिच्या उद्गारानें आणि विशिष्ट नजरेनें माझ्याकडे पहात राहण्यानें मला एकदम हलकें हलकें वाटूं लागलें. मी दिसावयास चांगला आहे हें मला ठाऊक होतें. पण तें तिच्याहि लक्षांत आलें होतें काय? चांगल्या चांगल्या गोष्टींत माझाहि अंतर्भाव करायचें तर ती सुचवीत नव्हती? कीं अगदीं सहज म्हणून ती असें बोलली होती?

ह्या गोष्टींचा विचार करीतच मी उठलों. निरोप घेतांना म्हटलें, "उद्या टेलिफोन करून मला प्रकृतीबद्दल सांगितलंत तर आनंद होईल."

"टेलिफोन मीच करावा असं आहे काय?"

"मी कुठं असं म्हटलं?"

"म्हणत नाहीं पण तसें वागतां." ती बोलत होती तें खरं होतं. अजूनपर्यंत मी कधींच पुढाकार घेऊन वागलों नव्हतों. बसमधें माझ्या शेजारीं आपण होऊन तीच येऊन बसली होती, टेलिफोन तिनेंच केला होता, मला बोलावून तिनेंच घेतलें होतें. हें सारें लक्षांत आलें. तेव्हां मी हंसल्यासारखें केलें आणि म्हटलें, "बरं बुवा! उद्यां मी टेलिफोन करीन. मग तर झालं."

• •

त्या नंतर अनेक ठिकाणीं अनेकवार आमच्या गांठीभेटी झाल्या. सुरवातीला आम्ही कांहीं कारणानें निमित्त शोधून भेटत होतों. पण पुढें पुढें कांहीं कारणहि लागनासें झालें. मनांत आलें म्हणजे एकमेकांना टेलिफोन करूं लागलों.

आम्ही भेटत होतों, गप्पागोष्टी करीत होतों. आणि एकमेकाला आवडवून घेत होतों. एकमेकांच्या आवडीनिवडीला फार जपत होतों, 'एखादं पातळ तुला फार खुलून दिसतं.' असें मी नुसतें सुचविलें, तरी मोठ्या अपूर्वाईनें तेंच पातळ ती पुन्हां पुन्हां नेसत होती. मला आवडत नाहीं म्हणून डोळ्यांत सुरमा घालण्याचें किंवा ओठांना रंग लावण्याचेंहि तिनें सोडून दिलें होतें. असें असलें तरी माझ्याविषयीं तिला काय वाटतें, हें तिनें कधीं बोलून दाखवलें नव्हतें. एकदां मी मात्र तिला म्हणालों होतों, "तूं मला फार आवडतेस!"

"मी कुणालाहि आवडेन असं पपा नेहमींच म्हणतात."

ह्या अशा वेळीं, पपा काय म्हणतात ह्याची तिला आठवण व्हावी याचें मला वाईट वाटलें. आवंढा गिळीत मी विचारलें, "आपण अशीं वारंवार भेटतो हें तूं घरीं सांगतेस काय?"

"अलबत्! पपांना सांगितल्याशिवाय मी कांहीं करीत नाहीं. आणि न सांगण्यासारखं त्यांत काय आहे?"

ती बोलत होती तें एका अर्थानें बरोबर होतें. इतरांपासून चोरून ठेवावें असें आमच्या बाबतींत कांहींच घडलें नव्हतें. आम्ही भेटत होतों, एकत्र फिरत होतों, पण मर्यादा सोडून कधींहि वागत नव्हतों. एकमेकांच्या शरिराला स्पर्श तर करीत नव्हतोंच, पण शेजारींशेजारीं बसावयाचें झालें तरीहि फार जपून बसत होतों.

थोडीफार मर्यादा सोडून वागावें, तिचा हात हातांत घ्यावा, जमलें तर गालावर हलक्या हातानें थोपटल्यासारखें करावें किंवा तिच्या कपाळावर आलेले केंस सारखे करावे असें मला अनेक वेळां वाटलें होतें. असें

कांहीं करून तिची प्रतिक्रिया अजमावण्यास मी उत्सुक होतों. रेंगाळत राहिलेल्या आमच्या ह्या प्रकरणाचा मलाहि आतां कंटाळा येऊं लागला होता. मी अधीर होत होतों.-'एकदां सोक्षमोक्ष लावून टाक' म्हणून मनाला बजावीत होतों आणि त्याच वेळीं, 'सबूर सबूर! जरा दमादमानें घे. नाहीं तर रंगाचा बेरंग होईल आणि आयुष्यभर हळहळत राहशील.' म्हणून मनाची समजूत घालीत होतों. थोडीफार घाई करून मी अविचारानें वागलों हे दिसतों. पण अशा वेळीं मला तिच्या वडलांची आठवण होई आणि मनांत उमाडलेल्या भावना मनांतल्या मनांत जिरून जात. आमच्या भेटीगांठी आणि आमचें बोलणेंचालणें ही मुलगी आपल्या वडलांना सांगत नव्हती काय!

आमचें एकत्र हिंडणेंफिरणें आतां लोकांच्या डोळ्यांवर येऊं लागलें होतें. आम्हांला एकत्र फिरतांना नेमकें नको त्या क्षुद्र माणसांनीं पाहिलें होतें. मला नीटपणें विचारण्याची कुणाची छाती नसली, तरी लोक आतां कुजबुजूं लागले होते. आमचें लग्न होणार किंवा नाहीं याविषयीं तर्क करूं लागले होते.

आम्ही एकदां कॅफेमधून बाहेर पडतांना माझा एक जुना स्नेही अगदीं अचानक आमच्यासमोर येऊन उभा राहिला. हंसल्यासारखें करून त्यानें पल्लवीच्या गळ्याकडे पाहून घेतलें आणि माझ्या पाठीवर थाप मारून विचारलें, "दोस्त, आतां लाडू केव्हां देणार?"

त्याच्या ह्या प्रश्नानें मी एकाच वेळीं सुखावलों आणि शरमिंधाहि झालों. त्याचें बोलणें तिनें ऐकूं तर गेलें नसेल ना ह्या विचारानें कावराबावरा झालों. तिच्याशीं न बोलतां किंवा तिच्याकडे न पाहतां मी थोडा वेळ तिच्याबरोबर चालत राहिलों. शेवटीं न राहवून तिच्याकडे पाहिले, तेव्हां मला ऐकूं जाईल अशा बेतानें, पण स्वतःशींच ती पुटपुटली, "काय निर्लज्ज आहे मेला!"

ती माझ्या मित्राला उद्देशून बोलत होती. तरीहि मी विचारलें, "तो बोलला त्याला मी काय करूं? माझं कांहीं चुकलं काय?"

"तुम्ही उगीच कां वाईट वाटून घेतां? मी तुम्हांला थोडंच बोललें?"

मला वाईट वाटलें, त्याचें कारण तिला सहजासहजीं थोडंच सांगतां येणार होतं! तरुण स्त्रीपुरुष एकत्र हिंडतात आणि एकमेकांना आवडूं लागतात. त्यावेळीं परस्परांमधील संबंधाचें स्वरूप निश्चित व्हावें अशी त्यांना ओढ लागलेली असते. आपापल्या परीनें जो तो युक्तीप्रयुक्तीनें दुसऱ्याचें मन जाणून घेण्याचा प्रयत्न करीत असतो. पण स्पष्ट असें कांहीं बोलतां येत नाहीं. अशा वेळीं एखाद्या ओळखीच्या माणसानें, खुबीदार बोलून स्नेहसंबंधाला चालना दिली तर तें फायद्याचें ठरतें. त्या दृष्टीनें माझ्या मित्रानें केलेली आमची चेष्टा मला फार आवडली होती. पण त्याच्या बोलण्याचा तिला राग आला होता. जे विचार माझ्या मनांत येत होते, ते विचार तिच्या मनांत येत नव्हते काय?

खरोखर, ही मुलगी फार विचित्र वागत होती. मला भेटत होती. पुन्हा पुन्हा बोलावून घेत होती. माझ्याबरोबर रेस्टोरॉंमध्यें येत होती. चारचौघांच्या देखत माझ्याबरोबर फिरत होती. पण मला हव्या असलेल्या गोष्टी बोलत नव्हती. मर्यादेवर येत होती, पण मर्यादा सोडीत नव्हती. सीमारेषेवर येऊन तिथेंच थबकत होती आणि थबकल्यावर असहाय्यपणें माघारीं फिरत होती. आमचें हिंडणेंफिरणें किंवा बोलणें ती घरीं सांगत नव्हती, तर चतुराईनें ही सीमारेषा मी ओलांडली असती. खुबीदार बोलून तिला बोलती केली असती. पण हा मार्ग तिनेंच बंद करून टाकला होता. आतां कांहीं घडावयाचें असेल, तर त्याची सूचना तिच्याकडूनच मिळणें आवश्यक होतें. पण चतुर असूनहि ती पुढाकार घेत नव्हती. जागच्या जागेवर खोळंबून रहात होती आणि मला पेंचांत टाकीत होती. संस्कारामुळें ती असं वागत होती कीं दुसऱ्या कसल्या भीतीनें, तें माझ्या लक्षांत येत नव्हतें आणि मी व्याकुळ होत होतों. अखेर तिच्या मनांत तरी काय होतें? ओढ लावून, कांहीं कारणानें मला तोडून टाकावयाचें किंवा मन लावून, मन न देतांच हें सारें संपवून टाकावयाचें तर तिच्या मनांत नव्हतें?

• •

खेळवत राहण्याचा आणि खेळवून घेण्याचा मला आतां कंटाळा आला होता. कुठचाही खेळ एका मर्यादेपर्यंतच रंगतो. एकसारखें खेळत राहिलें, तर त्यांतलें स्वारस्य नाहीसें होतें आणि एक प्रकारचा उबग येतो. आमच्या प्रकरणाचेंहि आतां तसेंच होऊं लागलें होतें. तसें कांहीं होऊं नये म्हणून मी तिला एकदां टेलिफोन केला आणि विचारलं, "आज तुला वेळ आहे काय?"

"कशाकरतां?"

"मला तुला भेटायचं आहे."

"पण आपण काल भेटलो होतों."

"तरीही आज भेटायचं आहे. कांहीं महत्त्वाचं बोलायचं आहे."

"असं?" असा आश्चर्योद्गार काढून ती थोडावेळ थांबली आणि विचारूं लागली,

"मग कुठं भेटायचं?" मी खुणेची जागा सांगितली तेव्हां ती म्हणाली, "पपांना सांगतें आणि लगेच निघतें."

"पपाना सांगणार असलीस तर थोडा उशीर होईल म्हणून सांग."

"बेत काय आहे?"

मोठा धीर करून दबल्या आवाजांत मी म्हटलें, "जमलं तर पिक्चरला जाऊं." आणि थांबल्यासारखें करून विचारलें, "येणार काय?"

"येईन कीं—न यायला काय झालं?"

ती भेटल्यावर काय बोलावयाचें तें मी ठरवून ठेवलें होतें. पण ती दिसली आणि आपल्या बोलक्या डोळ्यांनीं माझ्याकडे पाहूं लागली, तेव्हां मी विरघळलों. सिनेमा पाहून तिच्या वृत्ती तरल झाल्या, म्हणजे जें बोलावयाचें तें बोलूं असा विचार करून मी तिला सिनेमाला घेऊन गेलों. पण पिक्चर सुरूं होऊन अर्धा पाऊण तास झाला असेल नसेल, तोंच ती म्हणाली, "आपण बाहेर जाऊं."

"काय झालं?"

"मला बरं वाटत नाहीं."

"मागच्यासारखं होतं काय?"

"थोडंसं तसंच. पण आज कोंडल्यासारखं वाटतं छातींत कळहि येते."

आणि ती एकदम उभी राहून दरवाजाच्या दिशेनें चालूं लागली. बाहेर आल्यावर मी सोडा मागविला, तेव्हां तिनें विचारलें, "तुम्हांला सगळं कसं हो समजतं?"

मला सगळें समजत होतें. पण तिलाच कांहीं कळत नव्हतें, म्हणून तर सगळें रेंगाळत होतें. इतर वेळीं मी कांहींच बोलूनहि दाखवलें असतें. पण तिला बरें वाटत नसतांना असें कांहीं बोलणें ठीक नव्हतें.

दादरच्या रस्त्यानें आमची टॅक्सी धांवूं लागली, तेव्हां मी म्हटलें, "असं वारंवार होणें चांगलं नाहीं."

"मलाहि कळतं. पण मी काय करूं?"

"एखाद्या चांगल्या कन्सल्टन्टला कां दाखवीत नाहीं?"

"आतां दाखवीन. पण तुम्ही उगाच काळजी करूं नका."

"काळजी न करून कसं चालेल?" आणि न बोलतांच ध्यानींमनीं नसतांना आमची नजर एकमेकांत मिसळली. पण माझ्या नजरेंतले भाव ओळखून तिनें माझ्या नजरेंत मिसळलेली आपली नजर सोडवून घेतली. पण तसें करतांना तिला अपार कष्ट झाले हें माझ्या दृष्टीनून सुटलें नाहीं.

तिच्या घरासमोर टॅक्सी उभी राहिली, तेव्हा मी म्हटलें, "चल मी तुला दारापर्यंत पोंचवून येतों."

"नको नको. मला आतां बरें वाटतें. मी एकटी जाईन."

तरीहि मी आग्रह धरला, तेव्हा केविलवाण्या आवाजांत तिनें विचारलें, "माझं एवढंहि ऐकणार नाहीं काय?"

"जशी तुझी मर्जी" माझ्या आवाजांतला रुक्षपणा जाणवून ती एकदम माझ्याबाजूला सरकली आणि कधीं नव्हे तो माझा हात हातांत घेऊन म्हणाली, "असं काय बरं! रागवायचं नाहीं. मी उद्यां टेलिफोन करीन." आणि अगदीं अनपेक्षितपणें माझा हात दाबून तिनें 'गुड नाईट्' केलं.

दुसऱ्या दिवशीं ऑफिसमधें गेल्यापासून मी तिच्या टेलिफोनची वाट पहात राहिलों. पण अकरा वाजले, बारा वाजले, लंच आटपून मी पुन्हां कामाला लागलों, तरी तिचा टेलिफोन आला नाहीं. टेलिफोनची वेल खणखणली, म्हणजे हा तिचा फोन असेल अशा आशेनें मी रिसीव्हर उचलावा आणि विरस व्हावा असें अनेक वेळां झालें. शेवटीं पांच वाजले आणि तरीहि फोन आला नाहीं, तेव्हां मागचा पुढचा विचार न करतां मी तिचा नंबर फिरवला. फोनची घंटा बराच वेळ खणखणत राहिली, तरीहि कुणी फोन उचलला नाहीं. 'आज झालें आहे तरी काय?' असें स्वतःशींच म्हणत मी फोन बंद करणार, तोंच दुसऱ्या बाजूना रिसीव्हर उचलला गेला. 'हॅलो' असा अपरिचित आणि घोगरा आवाज ऐकूं आला. तेव्हां मी घाईघाईंत विचारलें, "पल्लवी आहे का?"

"आपण कोण?"

"मी संदीप रणदिवे. मला पल्लवीशीं बोलायचं आहे."

"तिच्याशीं आतां बोलतां येणार नाहीं."

"म्हणजे?"

"म्हणजे तुम्हांला कांहीं ठाऊक नाहीं असं दिसतं..."

"पल्लवीची प्रकृति कशी आहे?"

"काय सांगूं! पल्लवी वारली...काल रात्रीं."

'पल्लवी वारली' हे शब्द माझ्या कानांत बंदुकीच्या गोळीप्रमाणें घुमले. 'नाहीं. असं होणार नाहीं' असं मी म्हणत असतांनाच माझ्या हातांतून रिसीव्हर गळून पडला. धडपडत मी उभा राहिलों आणि लटपटत तसाच ऑफिसच्या बाहेर पडलों. स्टॅक्सी टॅंडच्या रोखानें धांवूं लागलों.

एखाद्या चोरट्यासारखा मी तिच्या घरांत शिरलों. सर्वत्र स्मशानशांतता पसरली होती. पल्लवीच्या वडलांना भेटायला आलेले लोक त्यांच्याभोंवतीं बसले होते आणि तिचे वडील त्यांना हुंदके देत अडखळत कांहीतरी सांगत होते. काय बोलावें आणि काय विचारावें, मला कांहीं सुचत नव्हतें. अडखळत मी पुढें गेलों आणि सर्वांसांत जाऊन बसलों. पल्लवीचे वडील सांगत होते, "तरी काल संध्याकाळीं मी तिला सांगत होतों कीं तुला बरं वाटत नाहीं, बाहेर जाऊं नको. पण ऐकलं नाहीं तिनं माझं. मैत्रिणीकडे जायचं आहे म्हणून हट्टच धरून बसली."

भान न राहून मी एकदम विचारलें, "कुठें गेली होती म्हणालांत?"

"तिच्या एका मैत्रिणीकडे. हल्लीं वारंवार जात असे ती तिच्याकडे. एवढा काय लळा लागला होता तिला कुणास ठाऊक! माणसं अंतरणार असलीं कीं असाच एकमेकांना लळा लावतात." आणि त्यांना एकदम रडूं कोसळलें.

माझ्या डोळ्यासमोर हजार काजवे चमकले. कांहीं न बोलतां मी उभा राहिलों आणि पाठ फिरवली. येणारें रडूं आवरीत पल्लवीचे वडील सांगत होते, "तरी मी माझं नशीब समजतों कीं आपल्याबरोबर तिनं आणखी कुणाला दुःखांत लोटलं नाहीं. लग्न होऊन असं कांहीं झालं असतं..." पण त्यांचे पुढचे शब्द मला ऐकूं आले नाहींत. मला वाटलं, मागं फिरावं आणि म्हणावं, 'लग्न न होतांच विधुर झालेला हा तुमचा जांवई तुमच्यासमोर उभा असतांना तुम्ही असं कसं बोलता?' पण असं कांहीं न बोलतां मी येणारा हुंदका आवरला आणि तिच्या रिकाम्या खोलीकडे वेड्यासारखा पहात राहिलों.

• • •




*जिकडे ओढ, तिकडची तोड अवगत असावी म्हणूस कसलंहि साहस करायला माझं छंदीफंदी मन उत्सुक होतं. पण या प्रौढेच्या बाबतींत निराळाच अनुभव आला....*

तर मी काय सांगत होतों?

हल्लीं हें असें होतें; सांगायचें असतें एक आणि सांगत सुटतों भलतेंच.

त्या दिवशीं मी रेस कोर्सवर गेलों; इतकेंच नव्हे, जुगार खेळलों.

मी कधीं रेस कोर्सवर जायचा नाहीं, तो त्या दिवशीं गेलों; गेलों तो आपखुषीनें गेलों नाहीं; व्यवहार म्हणून गेलों, जावेंच लागलें. फाटकापासून परततों तरी चाललें असतें. पण तेवढा नेट नव्हता. वाटलें, कधीं नव्हत ते आलों आहोंत, आंतली गंमत तर पाहूं. तेवढ्यांत अंतःप्रवृत्तीला अचानक प्रोत्साहन मिळालें व जोडीदारही मिळाला. सुरुवात केली खेळ म्हणून, विरंगुळा म्हणून आणि खेळतां खेळतां हरल्यामुळें उत्तेजित झाल्यानंतर जुगार म्हणून.

पुढें जें झालें तें अशा नादीं लागल्यामुळें व्हावयाचें तेंच झालें.

पण मी खरेंच जुगार खेळलों का? नाहीं. नीति असें म्हणत असेल, पण कायदा तसें म्हणत नाहीं. रेस कोर्सवरील जुगारीला कायद्याचें संरक्षण व राज्ययंत्राचें प्रोत्साहन कां मिळावें? तत्त्वतः घोड्यांची पैदास सुधारावी म्हणून आणि वस्तुतः हा श्रीमंतांचा व राज्यकर्त्यांचा खेळ आहे म्हणून. सामान्य जुगारीला प्रतिबंध कां करण्यांत आलेला आहे? तत्त्वतः हें व्यसन आहे म्हणून आणि वस्तुतः हा खेळ वाली नसलेल्या गोरगरिबांचा व मर्यादा नसलेल्या मवाल्यांचा आहे म्हणून!

त्या दिवशीं मी रेस कोर्सवर गेलों व जुगार खेळलों. हरलों, हरलों आणि अखेरीस जिंकलों. सारेंच अचानक व अनपेक्षित. पण माझ्या आयुष्यांत असें वारंवार घडलेलें आहे. आपण उघडपणें किंवा मनांतल्या मनांत म्हणत असतों, मीं असें केलें, माझ्या हातून तसें झालें. आपण पुण्याचें किंवा यशाचें श्रेय घेतों आणि पापाची किंवा अपयशाची जबाबदारी

परिस्थितींवर सोंपवतों. हा झाला मनुष्यस्वभाव. पण आपण विसरतों कीं हें असें झालें व तें तसें झालें, कारण हें व तें तसेंच व्हावयाचें होतें.

मग मी तरी माझ्या अपकृत्यांची जबाबदारी माझ्या पूर्वसंचितावर कां सोपवूं नये ?

कायदा नीतीला व्यवहाराची मुरड घालतो आणि व्यवहार अनीतीवर तत्त्वाचा मुलामा चढवतो; मग हा मार्ग मला कां उपलब्ध नसावा ?

तुम्हांला माहीतच आहे, माझा स्वभाव हा असा, छंदी व फंदी. मला वारंवार वाटतें, भल्याबुऱ्या जगाशीं वागणुकीचा हा एक प्रकारचा भिडस्तपणाच आहे.

शास्त्रें, तर्कशास्त्र जीवनाचीं अंगोपांगें फार व अपार; आणि जीवित अत्यल्प. सारें अनुभवानें शिकणें व तें परवडणें अशक्य. म्हणून जिकडे ओढ, तिकडची तोड अवगत असावी या उद्देशानें मी अनेक गुरू केलेले आहेत. माझ्या मनोरचनेच्या बांधणींतले गुणावगुण अजमावून माझ्या एका गुरूंनीं मला बजावलें आहे कीं, बाबा रे, तुझ्या प्रवृत्तींच्या प्रेरणा अनिवार्य आहेत, तुला निवृत्ति परवडणार नाहीं; तूं हवा तो नाद धर, पण ताल सोडूं नको; हवा तो खेळ खेळ, पण जुगार खेळूं नको; मग तो रमीसारखा आरामी असो किंवा शर्यतीसारखा मैदानी; तेजीमन्दीसारखा सुप्रतिष्ठित किंवा गिरदीसारखा अप्रतिष्ठित; जुगार खेळूं नको, कारण त्यामुळें आपल्या व आपल्यावर अवलंबून असणारांच्या आयुष्याचा खेळखंडोबा होतो. हें प्रमेय मला पटलें होतें. म्हणूनच मी व्यसनी-जुगारीपासून शक्य तितका अलिप्त राहिलों होतों.

या मर्यादा मी बुद्ध्या घातल्या आहेत. कारण, जुगार कोण खेळत नाहीं ? वकील वस्तुस्थितीशीं, वैद्य आयुष्याशीं, संशोधक निसर्गाशीं. आमच्यासारख्या ठेकेदारांचें तर विचारूंच नका. नामुष्कीनें चोथा चघळतें आयुष्य जगतो, तोच तेवढा अंतःप्रवृत्तींच्या उद्रेकांपासून अलिप्त राहूं शकतो. व्यक्तिशः मला चाकोरीचा जितका तिटकारा, तितकीच शिकारीची हौस. माझें व्यावसायिक यश तर संधीच्या अनुरोधानें, धोका पत्करून, अखेर साधण्यावर अवलंबून. एकूण काय, तत्त्वतः किंवा शब्दशः नव्हे, व्यवहाराचा एक सामान्य नियम, एवढाच या प्रमेयाचा मी स्वीकार केला होता.

आपण बोलून चालून सामान्य माणसें. तत्त्वें व निष्ठा यांचा आपला संबंधच काय ? श्रीमंतांना त्यांची फिकीर नसते, तरी पुरस्काराच्या लाचारीनें तीं त्यांच्या अंगीं लावण्यांत येतात; गरिबांना त्यांची वर्दी नसते, तरी मानवतेच्या मिषानें तीं त्यांच्यावर लादण्यांत येतात. त्यांची काळजी फक्त पांढरपेशा, वर्गनिष्ठ व स्वसंतुष्ट मध्यम वर्गाला आणि तीही प्रतिष्ठेचें ढोंग सांभाळण्यापुरती. आपण व्यवहारी माणसें. गजबजलेल्या वस्तींत दाटीदाटीनें राहणारीं; अन्नवस्त्र भागविण्यासाठीं काबाडकष्ट करणारीं; आजच्या श्रमांनीं थकलेलीं, उद्यांच्या काळजीनें काळवंडलेलीं; आणि होय, थकला भागला जीव रिझवण्यासाठीं कधींमधीं ढिलाईनें वागणारीं. आम्ही आत्मचिंतन करीत नाहीं अगर आत्मसंयमन करीत नाहीं, प्रवृत्तीचा निषेध करीत नाहीं अथवा निवृत्तीचे गोडवे गात नाहीं, आम्हांला मनू माहीत नाहीं किंवा कालिदास अवगत नाहीं; म्हणून या आत्मनिष्ठ स्वसंतुष्ट उच्चभ्रूंनीं भरल्या पोटीं व उष्ट्या ओठीं आम्हांला क्षुद्र मानणें न्याय्य ठरेल कीं काय ? नाहीं ! आम्ही उद्योग करतों व घाम गाळतों; त्यांवर जीवन चालतें, इतकेंच नव्हे, त्यांवरच तत्त्वज्ञान पोसतें व संस्कृति उमलते; जीवनाला विन्मुख असणारीं शास्त्रें माणुसकीच्या ओलाव्यानें सचेतन होतात. आपण सामान्य व व्यवहारी माणसें. आपल्याला कष्टाचें आयुष्य सुखासमाधानानें जगायचें आहे, बहुजनसमाजांत राहून उपलब्ध सुखें सहेतुकपणें उपभोगायचीं आहेत आणि अपरिहार्य दुःखें अहेतुकपणें भोगायचीं आहेत. म्हणूनच आम्ही मुरड व मुलामा यांच्या सांगडीवर विसंबतों.

तर मी काय सांगणार होतों ?

दुसऱ्या महायुद्धाचे दिवस होते. परदेशी सैन्यांचे व युद्धसामग्रीचे तळ ठिकठिकाणीं पडले होते. त्यांसाठीं इमारती उभारण्याचीं वगैरे कामें जागोजागीं चालू होतीं. त्यांपैकीं कांहीं कामें आमच्या देसाई कंपनीला मिळालीं होतीं. त्यांसाठीं जरूर तो माल दर आठवड्याला ज्या त्या गांवीं रवाना करावा लागे. त्या दिवशीं सकाळीं मी मालखरेदीची व रवानगीची योजना आंखीत बसलों होतों. एकेका ट्रक ड्रायव्हरला एक एक यादी देऊन बाजारांत पाठवीत होतों. तेवढ्यांत मुंबईहून माझ्या भागीदाराचा निरोप घेऊन आमचे दिवाणजी आले. निरोप होता कीं, आमच्या डिव्हिजनचे

लष्करी मुख्य एंजिनियर त्या दिवशीं दुपारीं रेस स्पेशलनें पुण्यास यावयाचे होते, त्यांच्यासाठीं मी स्वतः टूरिंग गाडी घेऊन हजर रहावें आणि त्यांच्या या मुक्कामांत त्यांची हरप्रकारची व्यवस्था ठेवावी.

सरकारी अधिकाऱ्यांच्या सरबराईची संधि ही पुढारूं पाहणारांची पर्वणी. त्यांतून हे अधिकारी लांचखाऊ असले व त्यांच्या स्वारीचा बंदोबस्त ठेवणारे हे ठेकेदार असले, म्हणजे कांहीं विचारूं नका असा थाट उडतो, कल्पनाही होणार नाहीं असा खर्च होतो. आज यायचे होते ते एंजिनियर असेच होते. ठरलेल्या टक्केवारीचा हप्ता त्यांना दरमहा घर-पोंचत होता. शिवाय अधून मधून अशी अडपझडप चालायचीच. त्यांच्या अधिकारक्षेत्रांतल्या आमच्या कामांत अनेक अयव होते. पुष्कळ भानगडी होत्या. कांहीं त्यांना माहीत, कांहीं आम्हांला. हें सारें गुलदस्तांत ठेवून आमचीं बिलें मंजूर करणें हें या साहेबांच्या मर्जीवर अवलंबून होतें. म्हणून त्यांच्या मागण्या आगाऊ अपेक्षून त्या भागवणें हें भागीदार या नात्यानें मला भाग होतें.

बारा वाजण्याचे सुमारास मी आमची गाडी काढली व कँपांत गेलों. साहेबांच्यासाठीं उंची विलायती मद्याच्या बाटल्या खरेदी केल्या आणि एका भारी हॉटेलांत दुपारच्या जेवणासाठीं आडोशाच्या जागीं एक टेबल व रात्रींच्या मुक्कामासाठीं एक प्रशस्त स्वतंत्र खोली राखून ठेवण्याची तजवीज केली. नंतर स्टेशनच्या आवारांत गाडी खडी करून प्लॅटफॉर्मच्या दरवाजालगत साहेबांच्या स्वागतासाठीं उभा राहिलों.

त्या काळांत मुंबईहून पुण्यास येणारी रेस स्पेशल हें मुंबईच्या ऐश्वर्याचें प्रतीक. हिंदुस्थानांतल्या सर्व राजधान्यांना हिणवणारें, सर्व दरबारांना दिपविणारें; बहुरंगी व बहुढंगी जीवनाचें सचेतन प्रदर्शन; जितकें बादशाही तितकेंच लोकशाही. जो तो आपल्या परीनें मोठा; जो तो आपआपल्या परीनें सुंदर. सारीं आपल्याच थाटांत व नादांत. कोणाला कोणाची भीड-मुर्वत? जणूं म्हणूनच जो तो ज्याची त्याची अदब सांभाळणार! सरावलेल्या डोळ्यांना मद्यांच्या जाती बसल्या जागेवरून ओळखतां येतात; कोठवर? तीं शुद्ध आहेत तोंवर. अनेक नवे मिसळलेल्या कॉकटेलचे घटक घोट घेऊनही अजमावतां येत नाहींत; पण एका घोटांत ती मस्तकांत भिनते. रेस स्पेशलचे प्रवासी ही मुंबईच्या लक्ष्मीपतींची संमिश्र कॉकटेल! पाहतां पाहतां चक्कर येते! हे उनाड तरुण आणि या छिनाल तरुणी, आणि जणुं यौवनाचा दुसरा बहर आलेले प्रौढही, एकमेकांना बिलगून, खिदळत खोकाळत दरवाजाकडे लोटत आहेत. काय या भाऊबहिणी असतील? कीं पतिपत्नी? कीं प्रियकर-प्रेयसी? निदान मानलेलीं तरी? छे, यांपैकीं कोणत्याही संबंधाला हीं जोडपीं अगदींच विसंगत दिसतात. जातीनें, दर्जानें व वयानेंही. समानता आहे ती फक्त वेषभूषेच्या भडकपणांत आणि हालचालींच्या उच्छृंखलतेंत! भर चवाट्यावर तुम्ही ही निर्लज्ज लगट करीत आहांत, मनाची सोडा, जनाची तरी लाज आहे कीं नाहीं? पण श्रीमंतीमुळें समाजाला व नादानुळें शिष्टाचाराला दुरावलेल्या या उन्मत्तांना कोण जाब विचारणार? उलट निधर्मी समानतेच्या पुरस्काराबद्दल त्यांचें कौतुकच होणार! आणि हें कौतुक कोण करणार? तुम्ही आम्ही!

पण हे आलेच आमचे साहेब. मी त्यांना लवून नमस्कार केला आणि त्यांच्या हातांतली ॲटॅची केस माझ्या हातीं घेतली. त्यांना जरा कांक्षा

वाटलीसें दिसलें. मी औपचारिक स्मितानें त्यांना आश्वासन दिलें कीं केसमध्यें केवढीही रक्कम असली तरी तिला धोका नाहीं. मी चालूं लागणार तोंच साहेब म्हणाले,

"मिस्टर देसाई, कृपा करून जरा थांबतां का? कोणी जोडीदार मिळाला तर पाहूं."

मी थबकलों. माझी कल्पना होती, कीं साहेबांच्या रिवाजाप्रमाणें धुड-गूस घालण्याकरतां हे एकादें बेवारस विलायती पांखरूं बरोबर आणतील; म्हणूनच तर मी त्यांच्यासाठीं डबल रूम राखून ठेवली होती. पण ते एकटेच आलेले पाहून माझा अपेक्षाभंग झाला होता. गाडींत भेटला नाहीं, तो आतां यांना कोण जोडीदार भेटणार ?

तेवढयांत एक अँग्लोइंडियन युवती उंच टांचांचे बूट टक्क टक्क वाजवीत आली. ती जवळ येतांच आमच्या साहेबांनीं कुशल चिंतून तिला विचारलें,

"आज आपण एकट्याच ?"

"होय, एकटीच आलें. साहेबांना एकाएकीं इगतपुरीला जावें लागलें."

"आपण आपल्या सहवासाचें सौख्य मला देऊं शकाल काय?" साहेबांनीं विचारलें.

"मोठ्या खुषीनें." ती म्हणाली.

साहेबांनीं मला खूण केली. मी गाडीकडे निघालों.

मी मनांतल्या मनांत विचार करूं लागलों. ह्या साहेब-मडमांचीं झंगटें खरोखरीच इतक्या सहजासहजीं जमतात, कीं हें सारें संभाषण नाटकी, मला फसविण्यासाठीं ? माझ्या मार्फत मेमसाहेबांपर्यंत बातमी जाऊं नये म्हणून ? हप्ता पोंचविण्यासाठीं वारंवार घरीं जावें लागत असल्यामुळें त्यांची आमची बरीच जानपछान होती. असेंच. खासच.

माझ्या मागोमाग येऊन हें जोडपें गाडींत बसलें. मागच्या बैठकीवर मांडलेल्या मद्याच्या बाटल्या पाहून साहेब खूष झाले. म्हणाले,

"आज तुम्हीं खूपच तयारी केलेली दिसते."

"आम्ही आपल्या सरबराईसाठीं नेहमींच उत्सुक असतों." मी म्हणालों, "आम्हांला संधि मिळत नाहीं अशीच आमची तक्रार असते."

या सूक्ष्म खुशामतीनें साहेब प्रसन्न झाले. आपण मोठे निःस्पृह आहोंत असें ऐकणें अधिकाऱ्यांना फार आवडतें; विशेषतः लांचखाऊंना; आणि लांच देणारांना तरी दुसरा कोणता मार्ग उपलब्ध असतो ?

मी साहेबांना हॉटेलांत पोंचवलें आणि खाण्यानंतर रेस कोर्सवर. तेथें मी त्यांना विचारलें,

"संध्याकाळीं आपल्याला गाडी लागेलच. तोंवर येथेंच थांबूं कीं सांगाल त्यावेळीं गाडी घेऊन येऊं ?"

"तुम्हीं आमच्यासाठीं फार तसदी घेतलीत." साहेब म्हणाले, "संध्याकाळीं या मेमसाहेबांचे बंधु त्यांना नेण्यासाठीं गाडी घेऊन येणार आहेत. त्यांना घरीं पोंचवून आम्ही रात्रीं हॉटेलांत मुक्काम करूं. व सकाळीं डेक्कन क्वीननें परत जाऊं. तुम्हांलाही कामें असतील, आतां तुम्ही परत गेलांत तरी चालेल."

अरे चोरा ! या तिकीट कलेक्टराच्या बायकोला कुठला आला आहे खाजगी मोटरवाला भाऊ ? बच्चंमजी, तुमचे धंदे आम्हांला कळत नाहींत कीं काय ? पण या मोठ्या लोकांच्या भानगडींशीं आपल्याला काय कर्तव्य ?

मी निरोप घेण्यासाठीं त्यांना नमस्कार केला. तोंच मला थोंपवून ते म्हणाले, "कृपा करून जरा थांबा."

त्यांनीं आपली ॲटॅची केस उघडली. नोटांनीं ठेंचून भरली होती. मोठें घबाड मारलेलें दिसतें ! त्यांनीं भिंडोळ्यांतून एक शंभराची नोट काढली, ती माझ्या हातीं दिली व म्हणाले,

"मिस्टर देसाई, तुम्ही आतां रेस कोर्सवर आलाच आहांत. हें स्वीकारा, आनंद करा आणि माझ्या सुदैवासाठीं परमेश्वराची प्रार्थना करा."

असा प्रसंग आजवर मजवर कधीं आला नव्हता. आम्हीं ज्यांना आज-पर्यंत हजारों रुपये पोंचवले, त्यांनीं मला असा उलट आहेर करावा ? हे मला कोण समजतात ? भेट देण्याजोगा स्नेही कीं बक्षिसी देण्याजोगा खिजमतगार ? ते कांहींही मानीत असले तरी यापुढें मी त्यांना बरोबर नको होतों, हें निश्चित; अणि तेंही बरोबर होतें. तरी मी जरा बावरलों. हें अजमावून साहेब म्हणाले,

"मिस्टर देसाई, तुम्ही अनमान करूं नका. तुमचा अपमान करण्याचा माझा इरादा नाहीं. शर्यतीच्या मैदानावर सर्वांचा दर्जा सारखा असतो. तुम्ही कधीं रेस कोर्सवर येत नाहीं. माझ्या आशीर्वादानें आणि माझ्या खर्चानें आज तुम्ही खेळावें अशी माझी विनंति आहे. शर्यतीच्या मैदानावर पहिलें पाऊल टाकणाराला सुदैव हात देतें असें मी ऐकून आहे. याची तुम्हीच प्रचीति पहा."

एवढें बोलून त्यांनीं माझ्याशीं हस्तांदोलन केलें. माझी पाठ थोपटली आणि नंतर आपल्या मैत्रिणीच्या हातांत हात घालून ते आंत गेले.

कांहीं म्हणा, व्यसन आणि औदार्य यांची सांगड हटकून आढळते.

कांहीं असो, हें अळीमिळीचें वचन होतें, हें खास !

• •

मोटारींत बसून मी विचार करूं लागलों.

काय करावें ? एकदां वाटलें, थोडी बीअर घ्यावी व घरीं जाऊन स्वस्थ पडावें. फुकटांत मिळालेले पैसे वांचवावे किंवा त्यांतून संसारासाठीं कांहीं खरेदी करावी. पण असे पैसे अंगीं लागत नाहींत; मग काय रेसमध्यें मिळालेले अंगीं लागतात ? शिवाय, असें करण्यांत थोडा तरीं विश्वासघात होत नाहीं का ? साहेबांच्या इच्छेप्रमाणें आज आपण खेळावेंच, त्यांच्या सदिच्छा फलद्रूप होणार नाहींत कशावरून ? पण वहावलों तर ? असे वहावण्याला आपण काय लेचेपेचे आहोंत ? खिशांत भागीदारींचे पैसे आहेत, त्यांना हात लावला नाहीं म्हणजे झालें. ठरलें, आज खेळायचेंच. पण आपल्याला या शास्त्रांतली कांहीं माहिती नाहीं. माहितीची जरूरच काय ? आंधळेपणानें खेळायचें. नशिबाची परीक्षा पहायची. प्रयत्नपूर्वक माहिती मिळवतात ते तरी काय दिवे लावतात ?

तेवढ्यांत आमचे जुने दोस्त गजाननराव डुलत डुलत येतांना दिसले. त्यांनीं एक रेस चुकवली नाहीं किंवा एक पैक हुकवला नाहीं. त्यांना चुकवावें कीं हटकावें ? कीं त्यांनाच आज गुरु करावें ? माझा निश्चय होण्यापूर्वींच त्यांनीं मला हेरलें आणि कपाळावरून हात फिरवून विचारलें,

"गृहस्था, आज तूं इकडे कोणीकडे ?"

जणूं त्यांना वाटत होतें कीं आपली आजची संध्या सुरू होण्यापूर्वींच हें काय भलतेंच आपल्याला दिसूं लागलें ?

"तुम्ही भेटलांत, ठीक झालें," मी म्हणालों, "सद्गुरु, तुमच्या आशीर्वादानें आज रेसचा मुहूर्त करायचा विचार आहे."

गाडी पार्क करून मी त्यांच्याबरोबर फर्स्ट एन्क्लोझरमध्यें प्रवेश केला. या गुह्यतम शास्त्राचें तंत्र त्यांनीं मला समजावून सांगितलें. ज्योतिष व शालिहोत्र या शास्त्रांचे तज्ज्ञ आणि घोड्यांचे मालक व स्वार यांजकडून आजच्या शर्यतीबद्दल मिळविलेल्या गुप्त बातम्या त्यांनीं मला सांगितल्या.

नंतर त्यांच्याबरोबर मी मैदानांत हिंडूं लागलों. तेथला जनसंमर्द व कल्लोळ पाहून मी चाट झालों. कसलीं हीं माणसें ? लक्ष्मीपतीपासून लक्ष्मीदासापर्यंत—सारीं आसुसलेलीं, झपाटलेलीं, झिंगलेलीं. बुद्धीच्या किंवा मनगटाच्या सामर्थ्याऐवजीं नभोमंडलांतील ग्रहांच्या किंवा तळहातावरील रेषांच्या बळावर विसंबणारीं. कोणालाही ददात नाहीं; वावटळींत गरगरणाऱ्या कपट्यांसारख्या येथें नोटा उडताहेत. कोणाची कोणाला दाद नाहीं. जो तो आपल्याच नादांत. येथें अब्रू नाहीं, दर्जा नाहीं, देश नाहीं, धर्म नाहीं, नीति नाहीं, पत नाहीं !

हेच पहा ना ? हा रंगराव, आमचा शेजारी. कालच याच्या घरावर जप्ती आली होती. वादीला वसूल व वेलिफाला लांच देऊन त्यानें ती परतवली होती, मोठ्या अजीजीनें. मग आज हा असा कसा शेफारला ? अरे बापरे, हे तर आमचे शास्त्रीबुवा. आज नेहमींप्रमाणें डोक्यावर झिरमिळ्यांची पगडी नाहीं व खांद्यावर जरीकांठी उपरणें नाहीं; आज आचारभ्रष्टतेची निर्भर्त्सना नाहीं किंवा सद्धर्माचें संकीर्तन नाहीं. ही कोण त्यांच्याशीं लाडेंलाडें बोलते आहे ? ही तर व्यंकी, गणिका नव्हे, गायिका नव्हे, नर्तकी नव्हे, सामान्य वेश्या; जोगतीण; तिची ओळख मला पटली. कारण मी तिला कोर्टांत पाहिलें होतें. दुसऱ्या एका कामीं साक्ष होती, म्हणून त्या दिवशीं मी त्या कोर्टांत हजर होतों. तीही तिथें आली होती. एरवीं ती खिडकींत बसणारी व सुक् सुक् करणारी. आतां मारे डोईवर पदर घेऊन राजकन्येसारखी टुमकत आहे ! कसल्या वाटाघाटी चालल्या आहेत ? संकेताच्या कीं शर्यतीच्या ?

माझी नजर तिच्यावर खिळलेली पाहून गजाननराव गरजले,

"माणूस आहेस कीं गिधाड ? त्या मुडदाराकडे कशाला टक लावतोस ?"

"तसें कांहीं नाहीं, तसें कांहीं नाहीं," मी शरमून चांचरत म्हणालों.

"नजर कशी असावी ? ससाण्यासारखी; पाखरूं कसें असावें ? कबुतरासारखें, गिरेबाज; कसें उडवावें ? अलगद !"

त्यांच्या विधानाला मी सस्मित संमति दिली.

चालतां चालतां ते थबकले. त्यांनीं माझें लक्ष एका वृद्धाकडे वेधलें. हा तर मेथाजी, सेवानिवृत्त सरकारी अधिकारी, म्हणून सन्मान्य. मोठा मिजासी. मिशांचे आंकडे तर पहा. सुशिक्षित दिसणाऱ्या एका तरुणीशीं

तो गप्पागोष्टी करीत होता. त्याच्यापासून थोड्या अंतरावर, त्याच्यावर नजर ठेवून, एक धनपति सिगरेट ओढीत उभा होता; धनपतीच, कारण त्यानें सोन्याच्या गुंड्यांचा बावन इंची कोट घातलेला होता.

" बघ, सौदा चालला आहे. हा माल बाजारांत येणार आहे."

" हे प्रकार पांढरपेशांतही चालतात कीं काय?" मी चमकून विचारलें.

" अरे बाबा, समाजाच्या प्रत्येक थरांत; जगाच्या आरंभापासून हें चाललें आहे व अंतापर्यंत चालणार आहे."

तेवढ्यांत लोकांची धांवपळ सुरू झाली. पहिल्या शर्यतीचे घोडे दर्शनासाठीं रंगणांत आलेले दिसले. आम्हीही तिकडे धांवलों. त्यांत एक कुमाईत होता. तो मला फार आवडला. त्याचें तेज आणि चाल व तयारी पाहून मला वाटलें कीं, ही शर्यत हाच जिंकणार. माझें हें मत मी गजाननरावांना सांगितलें. त्यांनाही तो आवडला. पण तो त्यांच्या यादींत नव्हता, त्यांच्या शास्त्रांत बसत नव्हता. म्हणून त्यांनीं दुसऱ्याच घोड्यावर पैसे लावायचें ठरवलें. खिडकीजवळ जाईपर्यंत त्यांना आणखी कांहीं गुप्त बातम्या मिळाल्या. त्यांवर विसंबून त्यांनीं तिसऱ्याच एका घोड्याचें तिकीट काढलें आणि अखेरीस ते हरले. रेसकोर्सवर असें नेहमीं होतें. मनाचा निश्चय ठरत नाहीं व ठरवावें तें घडत नाहीं. ऐन वेळीं चलविचल होते. सारी मौज आहे ती या अनिश्चिततेंतच! पहिल्या घडाक्याला पसंतीच्या घोड्यावर पैसे लावायला मी मात्र कचरलों. मनांतल्या मनांत मात्र ठरवलें, कीं हा जितला तर आपल्याला या शास्त्रांतलें कांहीं तरी उमजतें असें मानायचें आणि पुढल्या शर्यतींत भाग घ्यायचा. कयासाप्रमाणें माझा घोडा जितला व त्याला भावही चांगला पडला. पण उपयोग काय? पैसे लावलेच नव्हते, तर मिळणार तरी कसे? एक मात्र झालें, या निष्फळ यशामुळें मनांत आत्मविश्वास निर्माण झाला. एकादा होरा जमला म्हणजे आपल्याला अंतर्ज्ञान आहे अशी मनुष्य स्वतःची समजूत करून घेत असतो; फसला तरी तो ग्रह ढळत नाहीं.

दुसऱ्याच रेसमध्यें माझें अंतर्ज्ञान अंतर्धान पावलें. मी हरलों व गजाननराव जितले. आतां ते खुषींत होते. तिसऱ्या रेसचे घोडे पहावयास जात असतांना त्यांनीं एका प्रौढेकडे माझें लक्ष वेधलें. ते म्हणाले,

" या सीझनला हें पाखरूं हरेक रेसला येत आहे. मोठं बिलंदर आहे. नजरेला नजर लावतें. पण लगट करूं देत नाहीं. गेल्या मीटिंगला पत्ता काढण्यासाठीं मी तिचा पाठलाग केला, पण तिनें कुठें गुंगारा दिला, कांहीं कळलें नाहीं. आज मात्र आपण हिला गटवणारच. आहे तयारी?"

अपयशानुळें मी जरा सर्द झालों होतों. तरी धीर करून म्हणालों,

" मी तुमच्या बाहेर नाहीं."

तिकिटें काढायला आम्ही खिडकीवर गेलों तेव्हां ती तेथंच होती. तिनें घेतलें म्हणून त्याच घोड्याचें तिकीट मीही घेतलें. आम्ही दोघेंही हरलों; हरलों, पण जोडीनें हरलों, एवढेंच त्यांतल्या त्यांत समाधान! आम्हीच हरलों असें नाहीं. गजाननरावही हरले. या रेसला एक घोडा हमखास येणार, फ्ल्यूक येणार, खूप भाव पडणार, अशा अटकळीवर विसंबून त्यांनीं आपलें सर्वस्व त्यावर पणाला लावलें होतें.

त्यांनीं मला एका बाजूला बोलावून घेतलें व म्हटलें,

" माझे सगळे पैसे संपले, परत जाण्यापुरतेही राहिले नाहींत. या वयांत पायीं परतणें परवडणार नाहीं, म्हणून मागतों. मला एक पंचवीस रुपये उसने दे."

मी रेस कोर्सवर जाणारा सराइत इसम नाहीं, तरी पण मला ऐकून माहीत होतें, कीं येथें कोणी कोणाला पैसे उसने देत नाहींत. हा नियम आठवल्यामुळें मी जरा अडखळलों. माझी शंका ओळखून ते म्हणाले,

" येथलें कर्ज हें प्रतिष्ठेचें कर्ज मानण्यांत येतें. तुला माहीत नसेल म्हणून सांगतों. एखाद्याला नादारींत जायचें असलें तरी हें कर्ज तो बुडवणार नाहीं."

हें ऐकून मी शरमलों. अरे, हा माझा मित्र; हा मला सावकार मानतो आहे कीं काय? अडचण काय कधीं सांगून का येते? अडचण कुणाला येत नाहीं?

निमूटपणें मी खासगी खिशांतून पंचवीस रुपये काढले, त्या नोटा त्यांच्या हवालीं केल्या व म्हणालों,

" मनांत विकल्प आला, कृतींत विलंब झाला. क्षमा करा मला; स्नेहांत अंतर होऊं देऊं नका."

कृतज्ञतेनें माझा हात दाबून ते डुलत डुलत निघून गेले.

*आमचें राज्य!... आमचा राज्यकारभार!... : ३ :*

**ओरिसांतली 'ओढाताण'!**



बिचारे गजाननराव. हजार युद्धांच्या जखमा धारण करणारा हा वीर एकाएकीं असा हताश कसा झाला ?

ते गेले तिकडे मी वळून पाहिलें. आतां ते एकटे नव्हते. बरोबर सोबतीण होती !

विचारे ते नव्हत, विचारा मी !

• •

आतां मैदानावर मी एकटाच राहिलों.

एकटा कसा ? भोंवतीं शेकडों माणसें आहेत तर खरीं; पण तीं सारीं अपरिचित, म्हणून एकटा. एका परीनें हेंही बरें. कोणी आपले चाळे पहायला नकोत आणि ओळख देऊन दटावायला नको. बाकी ही शंका व्यर्थ होती; कारण येथें सारींच सारखीं. कोण कोणाला ओळखणार व दटावणार ? आणि कोणी अशी हिंमत केलीच तर ऐकून कोण घेणार ?

मात्र हें बऱ्यांच उशीरां माझ्या प्रत्ययास आलें. मी मैदानावर प्रथम प्रविष्ट झालों व आजूबाजूला पाहूं लागलों, तेव्हां मला चुकल्या चुकल्या-सारखें झालें; कारण येथें वावरणारीं माणसें, माणसेंच नव्हे, त्यांच्या सामाजिक जीवनाचीं मूल्येंही मला अज्ञात होतीं.

आम्ही सामान्य माणसें. फार फार तर फर्माइशीसाठीं चवल्या पावल्या उडवणारीं. मागाहून वैदा नको म्हणून आगाऊ भाव ठरवणारीं. आणि येथें ? येथें तर वायफळ खुशामतीसाठीं हिरव्या नोटा उडत आहेत! ज्यांच्या व्यावहारिक भेटीसाठीं ज्यांच्या खिजमतगारांची मर्जी लागेपर्यंत आम्ही तिष्ठत उभे असायचे, त्यांना येथें त्यांचे मोतद्दारही दामटीत आहेत !

समाजांत वावरतांना आपण अनेक संकेत मानतों, पाळतों. उत्क्रांत झालेलें असलें तरी मनुष्याचें शरीर मूलतः पशूचें आहे. पशूंना जें हवें असतें तें ते मिळवतातच; कधीं लोचटपणें गोंडा घोळून, तर कधीं प्राणपणानें लढून; पण निःशंकपणें. मनुष्यावर समाजाचें नियंत्रण असतें. मनुष्याच्या मनांत देव आहे, तसाच दानवही आहे. सामान्य मनुष्य कधीं याच्या तंत्रानें चालतों, तर कधीं त्याच्या. कांहीं अपवादात्मक व्यक्ती मात्र एकेकाच्याच आहारीं असतात. सामान्य मनुष्य हाच प्रधान घटक असल्यामुळें व्यावहारिक जीवनांत समाज शक्य तोंवर या आदिशक्तींचा संघर्ष होऊं देत नाहीं; सहजीवनासाठीं उत्क्रांत व दृढबद्धमूल संस्था उध्वस्त होणार नाहींत एवढीच खबरदारी घेतो. समाजांत वावरतांना सामान्य मनुष्य स्त्रियांची इज्जत केवढ्या काळजीनें सांभाळतो. त्यांना सामाजिक प्रतिष्ठेचा मानबिंदू मानतो. एकाद्या शृंगारमंजिरीकडे आकर्षिला गेला, तरी तिच्यावर नुस्ती टक लावण्यापूर्वी आपल्यावर कोणाची नजर नाहीं ना, याची खात्री करून घेतो. पण येथें ? येथें दूरतेची कसोशी नाहीं, सान्निध्याची असोशी मात्र आहे; प्रतिष्ठेचें प्रवर्तन नाहीं, प्रवृत्तींचें आवर्तन मात्र आहे; आपद्धर्म म्हणून नव्हे, आचारक्रम म्हणून; अन्यत्र जो अनाचार, तो येथें शिष्टाचार! येथें सारेंच बटाव, साऱ्याच छवेल्या. जणुं याच संकेतानें स्त्रीपुरुष येथें जमतात आणि येथें ठरणारे संकेत अन्यत्र सिद्धीस नेतात.

मानवी जीवनाला अनेक अंगेंप्रत्यंगें असतात; ज्याचें त्याचें विशिष्ट प्रकर्ष-क्षेत्र असतें. जीवनाचा आनंद उपभोगण्यासाठीं ज्या क्षेत्रांत प्रविष्ट व्हावयाचें, तेथील जीवनक्रमाशीं समरस झालें पाहिजे, तेथील आचार पाळले पाहिजेत. नाहीं तर आपल्याला तें व त्याला आपण असह्य होतों. देवळांत जायचें तर गाभाऱ्याच्या उंबरठ्यावर आणी दुगाणी ठेवली पाहिजे आणि तमाशाला जायचें तर दौलतजादा केला पाहिजे. हा व्यवहार आहे. येथें बहिष्कृतासारखा वावरायला मी काय जीवनाला विटलेला संन्यासी होतों ? कीं धर्मोपदेशक ? कीं संस्कृति-संरक्षक ? नाहीं. अनुपलब्ध संधि अनायासें उपलब्ध झाली आहे, ती वायां दवडायची नाहीं, पुरेपूर आनंद लुटायचा, असें ठरवून मी मनाला ढील दिली. येथील चालचालणूक पाहून आतांपर्यंत मी चांगलाच निर्दावलों होतों; हरलों होतों, हरून हरून कोडगा झालों होतों; आणखी हरण्याला वाव होता; तेवढ्यांत जमलें तर जिंकण्याला उत्सुक होतों !

गजाननराव गेले तेव्हां वाटलें होतें; दिवसभर सांगातीं राहते तर आपल्याला सोयीचें झालें असतें. पण मग वाटलें, गेले तर गेले; आपण त्यांच्या विश्वासावर थोडेच आलों होतों ? हरलों तर हरलों. स्वतःच्या पदराला तर खार लागला नाहीं ? आपण थोडेच जिंकायचा पण मांडून बसलों आहोंत ? आणि जितलों तर नको थोडेंच आहे ?

पुढच्या रेसच्या घोड्यांची तयारी पाहण्यासाठीं मी रिंगणाजवळ जाऊन उभा राहिलों.

आणि पाहतों तों काय आश्चर्य ?

गजाननरावांनीं अंगुलिनिर्देशानें परिचय करून दिलेली ती प्रौढा माझ्या शेजारींच उभी राहिली होती. तिच्यापलीकडे तिच्या मैत्रिणी होत्या. कोठल्या आल्या आहेत मैत्रिणी ? येथल्याच नटमोगऱ्या ! तिच्या-बद्दलचे त्यांचे उद्गार मला आठवले आणि तिच्याकडे पाहतां पाहतां मी उत्तेजित झालों.

दक्षिणी स्त्रिया सामान्यतः बुटक्या असतात. ही मात्र चांगलीच उंच होती. आजकाल पहावें तों स्त्रिया एक तर लुकड्या दिसतात, नाहींतर फोंपशा. ही अशी नव्हती, तशीही नव्हती. बांधेसूद आणि भरदार. तिच्याकडे पाहतांना वाटावें, कीं आपण सुरूचे खांब असलेल्या व :खिड-क्यांना वाळ्याचे ओले पडदे लावलेल्या रंगमहालांतील प्रसन्न वातावरणांत स्वच्छ चादर घातलेल्या मऊ मऊ गादीवर, झालरी लावलेल्या गुबगुबीत लोडाला टेकून आरामांत बसलों आहोंत ! वयानें असेल पस्तिशीच्या अंदाजांत. वस्तुतः हीच उमर खऱ्या उमेदीची, अनुभविक अभिमानाची; पण लपवाछपवीला सुरुवात येथूनच होते; आविर्भाव व प्रसाधनें यांच्या आश्रयानें. तसे कांहीं प्रयोग येथें झालेले दिसत नव्हते. कानशिलावरल्या काळ्याभोर कुरळ्या बटांतून धवलतेच्या छटा स्पष्ट दिसत होत्या. प्रयागाला गंगायमुना-संगमावर मिसळत्या धवल-श्यामल पाण्यांतून बोटें फिरवीत बसलों होतों, त्या प्रकाराची पुनरावृत्ति करावी असें सारखें वाटत होतें. काळानें किंवा काळजीनें तिच्या कपाळावर किंवा कपोलांवर अद्याप ओर-खडे ओढले नव्हते. एखादी सुरकुती असलीच तर ती जातिवंत व परिपक्व हापूसच्या केशरी व गुटगुटीत शरीरावर असते तशी; माधुर्य व स्वाद यांच्या परिसीमेची द्योतक !

ती अगदीं माझ्या शेजारीं उभी होती. मी तिच्याकडे रोखून पहात होतों. हें तिच्या निदर्शनास यावें अशी इच्छा होती. तिची याबाबतची प्रतिक्रिया पहावयास मी उत्सुक होतों; अस्वस्थही होतों.

अस्वस्थ आणि उत्सुक. कारण या पांढरपेशा समाजांत, उच्च आणि वरिष्ठ मध्यम समाजांत प्रचलित असलेले अस्पष्ट व अस्फुट संकेत मला अवगत नव्हते. काय चाललें आहे, कोणीकडे चाललें आहे, हें माहीत असलें तरी संमति सशब्द करावयाची नाहीं; कारण शब्दानें मंत्रमुग्धता नष्ट होते ! जें अपेक्षित तें अकल्पित असें भासवायचें व मानायचें. आवाहनच वर्ज्य, मग व्यवहाराची भाषा नाहींच नाहीं !

हा शेजारी आपल्याकडे पहात आहे, रोखून पहात आहे, हें तिच्या ध्यानांत आलें असावें. ज्यांना आपल्या आकर्षतेची जाणीव असते त्यांना हें आवडतें; अतिप्रसंग नको असतो, इतकेंच. जणुं माझ्या सोयीसाठीं ती वेळोवेळीं आसन बदलूं लागली.

एकदां तर मला वाटलें कीं तिनें काण्या डोळ्यानें माझ्याकडे पाहून स्मित केलें. प्रोत्साहनाचें कीं निर्भर्त्सनेचें ?

जणुं घोड्यांची चाल पाहण्यांत आपण गर्क आहोंत असें भासवीत मी जरासा तिच्याकडे सरकलों. अंगाला अंग लागलें. पण ती चमकली नाहीं कीं हटली नाहीं. माझा धीर चेपला.

मी जणुं स्वतःशींच म्हणालों,

"वा ! या मॅजेस्टिकची चाल सर्वांत झकास दिसते."

त्याच आविर्भावांत ती पुटपुटली,

"ही रेस मॅजेस्टिकच जिंकणार!"

आम्हीं क्षणभर परस्परांकडे पाहिलें. क्षणांत वेत ठरवून मी म्हणालों,

"चला, त्याचींच तिकिटें घेऊं या."

ती निमूटपणें माझ्याबरोबर निघाली. रांगेंत मात्र ती माझ्या पुढें राहिली. मुद्दाम कीं सहज? कोण जाणे. रांग हळू हळू सरकत होती. पुढच्यांच्या सुस्तीमुळें तिला पावलोपावलीं थबकावें लागत होतें. मागच्या गर्दीची मस्ती मला सारखी रेटीत होती. यामुळें जें व्हायचें तें होत होतें. जें हवें होतें तेंच होत होतें. हवें होतें म्हणून मात्र नव्हे, जणु टाळतां येत नव्हतें म्हणूनच! मला मात्र सारखी धास्ती वाटत होती कीं या धकाधकीमुळें ती रुष्ट होते कीं काय?

तिच्या मागोमाग मीं तिकीट काढलें. आम्ही शर्यतीच्या रंगणाकडे धांवलों. पण दुर्दैव. आमचा घोडा हरला. शारीरिक सौष्ठव हें चापल्याचें किंवा सामर्थ्याचें, यशाचें किंवा सुदैवाचें द्योतक असतेंच असें नाहीं.

आतां आकाशांत ढग जमूं लागले. वारा पडला व विलक्षण उकाडा होऊं लागला. यामुळें, कीं औत्सुक्याच्या आवेगामुळें, कीं श्रमामुळें, कोण जाणे, माझ्या घशाला कोरड पडली. तृषापरिहारार्थ आम्ही संगनमतानें बारमध्यें गेलों. उन्हांतून तहानून सांवलींत गारव्याला आलें म्हणजे अंगावरला घाम सुकूं लागतो. तरी तो वारंवार पुसावा लागतो. कपाळावरून, कानशिलांवरून, कानाच्या पाळ्यांवरून, गालांवरून, मानेवरून. या हालचाली किती मोहक! नेसतें वस्त्र घामामुळें कमरेला करकचतें, त्यांमधून बोट फिरवावें लागतें. किती मादक! सारखे सीत्कार, किती विविध; ओष्ठ्य आणि तालव्य! किती दाहक! तिचा तो तोकडा रुमाल चिंब झाला, तेव्हां मी माझा पुढें केला. नशीब, त्या दिवशीं भारींतला रुमाल खिशांत घेण्याचें सुचलें होतें; नाहीं तर आमचा आपला टॉवेलच असायचा! दिला तो तिच्या स्पर्शानें धन्य होऊन परत आला.

"बीयर घेणार ना?" मी चांचरत विचारलें.

"घेईन कीं!" ती हंसून म्हणाली.

अरे, जमत चाललें कीं!

बीयरचा पहिला ग्लास संपवून तिनें विचारलें,

"गेले का तुमचे मित्र?"

"कोणते? गजाननराव होय?"

"नांव नाहीं माहीत. बरेच वेळां पाहिले आहेत."

"हरले व कटले. मोठा झक माणूस आहे, नाहीं?"



"मला नाहीं आवडले."

"कां हो?"

"क्रूर वाटतात, ससाण्यासारखे. वाटतें, चावाच घेतील."

"नाहीं हो," त्यांची तरफदारी करण्यासाठीं मी म्हणालों. पण मी हें भलतेंच काय करीत आहे? जराशा खुशामतीच्या स्वरांत मी विचारलें,

"माझ्याबद्दल नाहीं ना तसें कांहीं वाटत?"

"नाहीं हो," ती मान वेळावून म्हणाली, "नाहीं तर तुमच्या बरोबर आलें असतें का?"

या आश्वासनानें मी जरा सुखावलों. आणखी बीयर मागवली. विचारलें,

"आज जिंकलांत किती वेळां?"

"सारखी हरतें आहे. तुम्ही?"

"मीही सारखा हरतों आहे."

तिनें हंसून कपाळाला हात लावला, म्हणाली,

"बरं ग बाई!"

"शेवटच्या रेसला खेळणार का?"

"कशी खेळणार? आतां फक्त दहा रुपये शिल्लक राहिले आहेत."

"काय योगायोग आहे पहा, माझ्यापाशींही तितकेच आहेत. पण मला वाटतें, खेळावेंच."

"तुमचें ठीक आहे. उद्यां मला मुंबईला परतायचें आहे. तरी बरें, हॉटेलचें बिल दिलें आहे आणि परतीचें तिकीटही काढलें आहे."

"अच्छा. हॉटेलांत उतरलांत वाटतें? कोणत्या?"

"इंटरनॅशनल."

"खरें का? मोठें चांगलें आहे हॉटेल."

"मला नाहीं आवडलें. चांगलें म्हणजे काय?"

"चांगलें म्हणजे सोईस्कर. कोणी कोणाची फाजील चौकशी करीत नाहीं."

हें ऐकून ती असें हंसली कां काय सांगूं? माझ्या बोलण्याचा रोख तिनें ओळखला. विषय बदलण्यासाठीं मी विचारलें,

"मुंबईस असतां वाटतें?"

"हो."

"नोकरी नव्हे ना?"

"नाहीं, सुखवस्तु."

"मला वाटलेंच होतें."

"कांहीं तरीच. कशावरून हो?"

"नोकरी करणाऱ्या स्त्रिया कशा फिकट, आकसलेल्या दिसतात."

"बरीच बारीक नजर दिसते तुमची."

"आम्हां ठेकेदारांना बारीक नजर ठेवावीच लागते."

"अच्छा, एकूण तुम्ही ठेकेदार आहांत. पुण्याचेच वाटतें?"

"हो,"

"राहतां कुठें?"

"सदाशिव पेठेंत."

"मग इकडे कसे?"

"कां बरें? येऊं नये कीं काय?"

"तसें नाहीं हो. मी तर ऐकून आहे कीं सदाशिव पेठेंतले लोक सकाळीं मंडई, दुपारीं ऑफिस आणि संध्याकाळीं तुळशीबाग किंवा ओंकारेश्वर, यांशिवाय कोठें फिरकत नाहींत."



अनुक्रमणिका

मी खदखदून हंसलों व म्हणालों,

"तसेंच नाहीं कांहीं. आम्ही सगळीकडे जातों. चोरून, एवढेंच."

"कां? चोरून कां?"

"एकमेकांच्या धास्तीनें!"

बीयर संपली. संभाषण मंदावलें. मी पुन्हां पूर्वींचा विषय काढला. विचारलें,

"शेवटल्या रेसला खेळूं कां? तुमचें नशीब आज मंद आहे आणि माझेंही. आतां आपण जोडीनें खेळूं या. पांच तुमचे, पांच माझे."

"परत जाईपर्यंत मला पांच रुपये कसे पुरतील?"

"माझ्या मोटारींतून मी पोंचवीन तुम्हांला तुमच्या मुक्कामावर. शिवाय संध्याकाळच्या जेवणापुरते पैसे आहेत माझ्यापाशीं. आमच्या एंजिनियर साहेबांच्यासाठीं आणले होते; पण त्यांना लागले नाहींत."

"तुम्ही ठेकेदार मोठे दूरदर्शी—"

"तें राहूं द्या. खेळणार ना?"

"खरें सांगूं? मी अगदीं थकलें आहे, अगदीं निराश झालें आहे. पैसे आहेत म्हणून नव्हे, गेले म्हणून नव्हे; यश नाहीं म्हणून."

"माझी स्थिति अशीच आहे. आपणां दोघांचें दुर्दैव एकत्र करून तरी सुदैव प्रसन्न होतें कीं काय हें पहावें, अखेरचा यत्न करावा व तो जोडीनें करावा असा माझा आग्रह आहे."

मघांशीं उकडत होतें तेव्हां रुमालानें वारा घेतां घेतां तिनें आपल्या पोलक्याची वरची गुंडी उघडलीच होती. त्या सांदींतून तिनें हातरुमालाची घडी काढली. तिच्यांत पांचाच्या दोन नोटा होत्या. त्यांपैकीं एक तिनें मला दिली.

ओलसर होती, गरम होती. स्पर्शीली व हुंगली; सुगंधीही होती. मी ती माझ्या शर्टच्या ओलसर झालेल्या खिशांत ठेवली!

माझ्या या हालचाली पाहून ती लाजरें हंसली.

कोटाच्या खिशांतून मी दहाची नोट काढली व ती तिच्या हातीं दिली. शर्यतीसाठीं आशीर्वादपूर्वक मिळालेल्या रकमेंतली ही अखेरची नोट. आतां तिकिट घेण्याला आम्ही एकटे एकटे जाणार नव्हतों, जोडीनें. आतां रांगेंत मी अंग चोरणार नव्हतों. संकोच करणार नव्हतों. या जगांतल्या चालरीतीप्रमाणें वागणार होतों. कां, कोण जाणे, वाटत होतें, ही अखेरची रेस आम्ही जिंकणार! आणि हरलों तर हरलों. येथें हरलों तर तेथें जिंकणार!

आम्ही खिडकीकडे निघालों. हातांत हात मिळवून, एकमेकांना बिलगून.

त्या अखेरच्या शर्यतीच्या धांदलींत कोण कोणाकडे पाहणार?

आम्ही दोघें रांगेंत सामील झालों, पूर्वींच्याच अनुक्रमानें. अधीर रेटारेटी शिगेला पोंचली होती. आम्हां दोघांचेंही भान हरपलें होतें. हें प्रत्युयास केव्हां आलें?

तिनें विचारलें,

"तुम्हीं सांगितलें नाहीं, मी विचारलें नाहीं; सुचलेंच नाहीं. घोडा कोणता?"

मी केव्हांपासून ठरवलें होतें; मघांपासून मनाशीं घोकीत होतों; ब्लॅक ब्यूटी—काळी राणी—ब्लॅक ब्यूटी—श्यामा. जणुं कांहीं रहस्य अचानक समजलें होतें; रहस्य यशाचें, सुखसर्वस्वाचें. उत्साहाच्या भरांत सांगायचें राहून गेलें होतें. मी तिच्या कानाशीं लागलों व पुटपुटलों,

"ब्लॅक ब्यूटी!"

ती प्रसन्न हंसली; जलतरंगावरल्या गतीसारखी. लाडिकपणें म्हणाली,

"वयांत आलें तेव्हांपासून ऐकतें आहे. तुम्हांला कोणीं सांगितलें?"

तिच्या गुबगुबीत दंडांवर हात ठेवून मी म्हणालों,

"हें कांहीं कुणी कुणाला सांगावें लागत नाहीं!" मघांपासून खुटखुटत होतें, उगाच खडा टाकून पहावा, म्हणून मी पुटपुटलों. "श्यामाबाई."

ती चमकली, थबकली, लालावली, म्हणाली,

"हें मात्र नक्की कुणी तरी तुम्हांला सांगितलें आहे. सांगा, तुमच्या त्या मित्रानेंच ना? सांगा ना!"

"त्यानें नाहीं, तुम्हींच सांगितलें."

"कधीं?"

"तुम्ही मघांशीं तुमचा खास हातरुमाल काढला होतात, त्यावर 'श्यामा' हीं अक्षरें रेशमांत विणलेलीं दिसलीं."

ती पुन्हां एकदां मनापासून हंसली. माझ्या बारीक नजरेला आणखी एक प्रशस्तिपत्र! तोंवर आमची प्रगति खिडकीपर्यंत झाली होती. नंबर पाहून ब्लॅक ब्यूटीचें तिकीट घेतलें व रांगेंतून सुटतांच शर्यतीच्या रिंगणाकडे धांवलों.

घोडे सुटले, तेव्हांपासून कंठाला शोष पडेपर्यंत दोघेंही ओरडत राहिलों,

"ब्लॅक ब्यूटी—ब्लॅक ब्यूटी."

आमच्या शेजारीं एक संमिश्र टोळकें उभें होतें. त्यांचा ओरडा चालला होता,

"फ्लाइंग क्वीन्—फ्लाइंग क्वीन्."

हाही मला अधिक्षेपासारखा वाटला! जणुं यांच्याच प्रोत्साहनानें ही उडती राणी आमच्या काळ्या राणीला पराभूत करणार होती!

शर्यत सुटते न सुटते तोंच संपते. इकडे रक्त उकळतें! शर्यत संपल्या क्षणीं आरोळी उठली,

"ब्लॅक ब्यूटी! ब्लॅक ब्यूटी!"

आमची काळी राणी जितली; अहो, आमची कृष्णसुंदरी जितली. ही वार्ता कानीं पडतांच माझ्या काळ्या राणीनें मला आपखुषीनें मिठी मारली. तिच्या नेत्रांतून आनंदाश्रू ओघळूं लागले आणि ते मी टिपून घेऊं लागलों. तिच्या ओठांतून अस्फुट उद्गार स्रवूं लागले आणि ते मी टिपून घेऊं लागलों. दोघेंही बेभान! आणखी जे कोणी जितले होते, त्यांनीं एकामेकांना मिठ्या मारल्या. जे कोणी हरले होते, त्यांनीं जे जितले होते त्यांना मिठ्या मारल्या.

कारण ब्लॅक ब्यूटीचा विजय अनेकांना अनपेक्षित होता. लोकप्रिय होण्याइतकी ती खेळाडूंत रुळली नव्हती.

भाव पाहण्याकरतां बोर्डाकडे गर्दी लोटली. आम्हीही धांवलों.

काय भाव पडला माहीत आहे?

आठशें बेचाळीस!

दक्षिणेंतल्या एका पराभूत राजकन्येच्या तरुण व सुंदर सहचरींचा थवा बोर्डाजवळ उभा होता. कोणी नऊवारी बनारसी शालू नेसल्या होत्या आणि कोणी चंदेरी जरी पातळें; सर्वांनीं डोईवरून पदर घेतले होते. बोर्डावरील इंग्रजी अक्षरें एकीलाच वाचतां येत होतीं. आंकडा पाहून ती उद्गारली,

"आठशें बेचाळीस! काय भाव पल्डा!"

एक हौशी जवान गळ्यांत कॅमेरा अडकवून मैदानांत हिंडत होता. त्यानें तेवढ्यांत तिची छबी उतरली. हें लक्ष्यांत आलें तेव्हां ती म्हणते कशी?

"घेतलान् ग बाई मेल्यानं फोटो."

हा प्रकार त्यांच्या त्या संस्थानांत घडता तर, काय सांगूं, या कारट्यांनीं त्या बिचाऱ्याला भर चौकांत हंटरनें फोडून काढला असता. उगीच नाहीं सांगत. झाल्या आहेत अशा गोष्टी.

भाव पाहून एक किरिस्तांव उद्गारला,

"माय गॉड!"

आम्हांला किती आनंद झाला म्हणून सांगूं? एकामेकांना मिठ्या मारून आम्ही अक्षरशः नाचलोंसुद्धां! आमच्याभोंवतीं कितीकांनीं रिंगण धरलें; त्याचीही आम्हांला शुद्ध नाहीं. बेभान, बेभान!

विजयोन्मादाची पहिली उसळी ओसरली. आम्ही पुन्हां माणसांत आलों. मग वाटलें, आम्ही किती वेड्यासारखे वागलों. काय कधीं आठशें बेचाळीस रुपये पाहिले नव्हते? होय, पाहिले होते; ते घामाचे होते आणि हे हौसेचे. प्रश्न पैशाचा नव्हता, यशाचा होता!

मला आमच्या साहेबांची आठवण झाली. माझा आतांचा अवतार व माझे प्रताप पाहते तर ते म्हणते,

"वेल् डन्. माय् फ्रेंड, गो अहेड!"

मनोविकार सांवरून मी माझ्या सोबतिणीला म्हणालों,

"चला, आणखी थोडी बीयर घेऊं या."

"आणखी? नको ग बाई. मघांशी घेतली, पुरे नाहीं का झाली?"

"ही नुस्ती बतावणी आहे. मला हवी आहे, तुम्हालाही हवी आहे. मघां घेतली ती निश्चय ठरवण्यासाठीं; आतां घेणार ती जीत साजरी करण्यासाठी!"

मी तिला मनगटाला धरून बारकडे नेलें. आम्ही जिंकलों आहोंत हें पुष्कळांना समजलें होतें. आमच्यावर अभिनंदनांचा वर्षाव झाला. ड्रिंक्सच्या फैरी झडल्या. कोणी हिशोब केला? आज आम्हांला काय कमी होतें.

एक मात्र पाहिलें, आम्ही कोण, आमचा परस्परांशीं संबंध काय, याची कोणीही चौकशी केली नाहीं! हें जीवनच असें; खेळणारे द्विपाद, पळणारे चतुष्पाद!

आमच्या शेजारच्या टेबलावर एक दुक्कल बसली होती. त्यांपैकीं एक होता एक भुक्कड वयस्क सरदार. त्याची कीर्ति मी ऐकून होतों. बिचारा रोज सकाळीं फुकटांत चहा उकळण्यासाठीं लोकांच्या घरोंघरीं हिंडायचा; सामान्य लोकांना वाटे, आपल्या गरीब घरीं सरदार आला, सत्कार केला पाहिजे. खुद्दांच्या घरीं मात्र कधीं कुणाचे ओठही ओले झाले

नाहींत! नुकत्याच वयांत आलेल्या एका पोरक्या लक्ष्मीपुत्राबरोबर तो येथें आला होता व बीयर ढोंशीत होता. तो आपल्या यजमानाला सांगत होता,

"तरी मी सांगत होतों, आज ब्लॅक ब्यूटी जिंकणारच. पण घोड्याच्या तयारीपेक्षां त्याच्या आंकड्यावर तुझा विश्वास."

जराशा चिडखोरपणें, एका दमांत बीयरचा ग्लास साफ करून, लक्ष्मीपुत्र म्हणाला,

"वेड्या, बुडालों मी अन् कुथतो आहेस तूं! तुझी एवढी खात्री होती तर तूं कां खेळला नाहींस?"

"आपण तर शपथ घेतली आहे बाबा, जुगार खेळणें नाहीं."

"मग इथें आलास कशाला? माझ्या खर्चानें बीयर प्यायला? खेळतोस तरी काय? झब्बू? अरे, तुझी तशीच माझी, बापकमाई."

त्याचें लक्ष माझ्या सहचरीवर एकाग्र झालेलें पाहून मी भानावर आलों. येथें असेच बसलों तर एवढ्यावरच भागवावें लागेल किंवा कांहीं भानगड होईल? म्हणून म्हणालों.

"निघायचें ना?"

ती लगोलग उठली. उठतां उठतां तिची खुर्ची कलंडली. मी हिला सांवरलें व वेटरनें तिला. बिल दिलें. बक्षिसी दिली. आज आम्हांला काय कमी होतें?

हें काय? हिच्या सारख्या झोकांड्या जात आहेत. खरें कीं खोटें? मी तिच्या कमरेभोंवतीं हात घातला व सांवरीत तिला मोटारपाशीं आणलें. दोघें स्थानापन्न झालों. लगेच नोटा मोजून मी चारशें एकवीस रुपये तिच्या हातीं दिले. हो, व्यवहार म्हणजे व्यवहार.

त्या नोटांकडे शून्य दृष्टीनें पहात ती म्हणाली,

"झाल्या खर्चांतला निमा वांटा तुम्हीं घेतला पाहिजे. निमेनिम् म्हणजे निमेनिम्."

"तें होणार नाहीं." मी थोड्या आढ्यतेनें म्हणालों, "सारा खर्च माझा. मी आज प्रथमच रेस कोर्सवर आलों आणि यापुढें केव्हांही येणार नाहीं—म्हणून."

हताशपणें तिनें नोटांची घडी त्या सुदैवी रुमालांत गुंडाळून त्या लाडक्या जागीं ठेवली. बैठकीवर रेलून ती म्हणाली,

"मुक्कामावर जाण्यापूर्वीं जरा हिंडून येऊं या का? डोकें कसें सारखें गरगरतें आहे."

"खुषीनें." मी म्हणालों. वाटलें, या सुखवस्तूंच्या तंत्रांत असाच कांहीं संकेत असेल!

मला जें हवें होतें तेंच होत आहे; कीं पंचपक्वान्नांच्या भोजनाऐवजीं केवळ फराळावरच भागणार आहे?

मी जी गाडी काढली ती घेतली थेट गोळीबार मैदानावर. गाडी असली कीं एकांताला काय तोटा? शिवाय आम्ही मैदानावर पोंचलों तेव्हां गडद अंधार झाला होता.

गोळीबार मैदान हें पुण्याच्या प्रणयी जनांचें आवडतें संकेतस्थान. रावांचें व रंकांचें; शहराचें, तसेंच लष्कराचें. वैशिष्ट्य हें कीं जो तो आपापल्या फंदांत दंग असतो. कोणी कोणाला व्यत्यय आणीत नाहीं. आनंद करा, आनंद करूं द्या. ओळख भेटली तरी तेरी चूप, मेरी चूप. सारे सारखे. फरक काढायचाच झाला तर म्हणतां येईल, कीं कोणी मैदानांत बसतात आणि कोणी मोटारींत; कोणी हौशी असतांत तर कोणी जोड-धंदेवाईक!

आज मात्र येथें विशेष वर्दळ नव्हती. पावसाच्या भास्तीनें कीं काय, कोण जाणे.

आम्ही मैदानावर आलों तेव्हां थंड व मंद वारा वहात होता. पर्वतीच्या पलीकडे कोठें तरी पाऊस पडत होता.

मीं सिगारेट पेटवली. विचारलें,

"त्रास नाहीं ना होत?"

"नाहीं बाई, उलट मला हा वास फार आवडतो."

मघांची गोष्ट वेगळी, आतांची वेगळी. तेथें उन्माद होता, सबब होती; आतां विषय कसा काढायचा?

काय होईल तें होवो.

मी तिला जवळ ओढली, तिचे हात गळ्यांत घेतले व चुंबन घेतलें; उडतें, ओझरतें.

ती माझ्या मानेवरून, माझ्या केंसांतून बोटें फिरवूं लागली; आणि मी तिच्या कुरळ्या केंसांवरून, उघड्या कमरेवरून.

थरथरत्या ओंठांनीं, गद्गद स्वरांत ती लाडिकपणें म्हणाली,

"असें नको, कावळ्यानें दाणे टिपल्यासारखें."

"मग कसें आवडेल?"

"शहाळें प्यावें तसें, तोंडभर, पोटभर; मुका नको, मुक्का हवा!"

अंतरींच्या प्रेरणेनें होणारा प्रीतीचा आविष्कार अकल्पित असतो!



अनुक्रमणिका

मी तिला आणखी जवळ ओढली व तिची मागणी पुरी केली; एकदां नव्हे, अनेकदां.

माझ्या आवेशामुळें तिचा पदर ओघळला. तो सांवरून ती म्हणाली, "आतां येथें आणखी नको. खोलीवर जाऊं या!"

या पांढरपेशा स्त्रिया ऐनवेळीं अनेक अडचणी उपस्थित करतात, म्हणे सांगतात, असें मी ऐकून होतों. माझ्या मनाची चलबिचल झाली. तिच्याबरोबर आपण तिच्या खोलीवर गेलों आणि तेथें तिचा कोणी जोडीदार असला तर? व्यत्यय आला तर? धोका आहे म्हणून मोका सोडावचा कीं काय?

तेवढयांत मोटारीच्या टपावर पावसाचे टपोरे थेंब शिडकले आणि गुलटेकडीकडे निघालेलें मवाल्यांचें एक टोळकें छक्कड गात गात गाडीशेजारीं आलें. विठ्ठलवाडीच्या निर्जन रानांत दिवसाढवळ्या घडलेल्या त्या भयंकर अत्याचाराची मला आठवण झाली. होय, तिचें म्हणणें खरें होतें. येथें आणखी नको. नकोच. मीं लगेच गाडी सुरू केली. साडेआठच्या सुमारास आम्ही तिच्या मुक्कामावर दाखल झालों.

इंटरनॅशनल हॉटेलच्या मुख्य इमल्याच्या पिछाडीच्या एका स्वतंत्र बंगलींत तिचा मुक्काम होता. गाडी येऊन उभी राहतांच, तंग सुरवार, जोधपूर कोट आणि केशरी साफा बांधलेला एक नोकर अदबीनें पुढें झाला. कुलूप खोलून त्यानें खोली उघडली व दिवे लावले. खोली कसली, चांगला प्रशस्त ब्लॉक होता.

"तुम्हांला वॉश घ्यायचा आहे ना? ही इकडे बाथरूम आहे."

मनुष्याला अनेक शारीरिक गरजा असतात. त्या भागवणें भाग असतें. तरी त्यांवर शिष्टाचारांचीं बंधनें असतात. विशेष संकोच वाटतो स्त्रियांना. तरी संकोच सांवरून सोयही त्याच करतात!

बाथरूममधून ताजातवाना होऊन मी बाहेर आलों. तोंवर नोकरानें सिगारेटस्‌चा डबा आणून टेबलावर ठेवला होता. तिकडे अंगुलिनिर्देश करून ती म्हणाली,

"आपलें दोघांचें जेवण आतां येथें येईल. बीयर येत आहे. रात्रीं विश्रांति येथेंच घ्यायची. जरा आराम करा. तोंवर मी अंग धुवून येतें, घामामुळें भारी चिकचिक वाटते आहे. स्नानामुळें जरा मोकळेंही वाटेल."

ती बाथरूममध्यें गेली. शॉवरचे फवारे व तिचे सुस्कारे, साबणाचा सुगंध व बांगडयांची किणकिण!

ती बाहेर आली तेव्हां तिनें वस्त्रें बदललीं होतीं. पांढरें स्वच्छ पातळ, मलमलीची तंग चोळी, कुरळे मोकळे केंस!

उत्तेजित होऊन मी तिला गाढ आलिंगन दिलें!

तेवढ्यांत दरवाजाजवळ वेल वाजली. वस्त्रें सांवरून तिनें दार उघडलें. वेटरनें आमचें जेवण आणलें होतें. त्यानें ताटें तयार केलीं व वाढण्यासाठीं शेजारीं उभा राहिला.

जेवण श्रीमंती होतें; खाशांच्याच पंक्तीला लाभेल असें; मिश्र मांसाहारी व शाकाहारी: चिकन करी व गरम पुरी; बदामाच्या पाकळ्यांनीं सजलेला मोतीचूर; बेदाण्यांनीं नटलेली, केशरी साखरभाताची मूद. सडकून भूक लागली होती. मी कांटे चमचे बाजूला ठेवले आणि अस्तन्या वर करून आधाशासारखा त्या पक्वान्नांवर ताव मारला. ती मात्र सारें जेवण कांट्या चमच्यानेंच जेवली.

जेवण झाल्यानंतर वेटरनें ताटें उचलून नेलीं.

"कॉफी घेणार का?" तिनें विचारलें.

मी होकार दिला.

"गरम कीं थंड?"

"थंड," मी अगोदरच गरम झालों होतों, थंडाईच हवी होती!

व्हरांड्यांत नोकर उभा होता. त्याला कॉफी आणावयास सांगून ती अंतर्गृहांत गेली.

हा सारा थाट पाहिला आणि मला विचार पडला. हें काय चाललें आहे? हिची काय अपेक्षा असेल? माझ्या कोटाच्या खिशांत आणखी बरेंच द्रव्य आहे हें मी सहज बोलून गेलों होतों. त्यावर तर हिची नजर

नसेल? शक्य नाहीं. ही तशी दिसत नाहीं. शक्य नाहीं. प्राप्त झालेल्या व होऊं घातलेल्या सुखास्वादांचा कांहीं मोबदला द्यावा काय? दिलाच पाहिजे. काय द्यावा? मला कांहीं सुचेना. विचारावें तरी पंचाईत, न विचारावें तरी पंचाईत. हें सारें मुकाट्यानें विनामूल्य स्वीकारण्याइतका मी कोडगा नव्हतों किंवा मुरलेला श्रीमंत नव्हतों. ठरलें. एक हिरवी नोट द्यावी. कशी द्यावयाची? याचीही पंचाईत! तोंच सुचलें. एकांत आहे तोंवर उरकलें पाहिजे. टेबलावर जाळीचा रुमाल पसरला होता. कोटाच्या खिशांतून एक हिरवी नोट काढली, ती त्या रुमालाखालीं ठेवली आणि शांतपणें सिगारेट ओढीत बसून राहिलों.

तेवढ्यांत ती बाहेर आली व पलंगावर पाय हेलावीत बसून राहिली.

माझी अधीर चुळबूळ चाललीच होती. हें पाहून ती कलत्या मानेनें म्हणाली, "कॉफी होऊं द्या. रात्र आपलीच आहे!"

थोडक्याच वेळांत वेटर कॉफी घेऊन आला. सारा सरंजाम टेबलावर मांडून तो बाहेर गेला.

कॉफी घेण्यासाठीं तिनें टेबलावरला ग्लास उचलला. रुमालाखालीं कांहीं तरी आहे असें तिला दिसलें. हातांतला ग्लास खाली ठेवून तिनें रुमाल उचलला. ती शंभराची नोट तिला दिसली.

पाहतां पाहतां ती लाल झाली. थरथरूं लागली.

"ही नोट इथें कुणी ठेवली?"

मी अपराध्यासारखा हात जोडून उभा राहिलों. तोंडांतून शब्द फुटेना. मोठ्या प्रयासानें म्हणालों, "मी ठेवली. आपल्या सेवेसाठीं!"

भिंतीलगतच्या कोचावर बसून ती म्हणाली,

"अच्छा, तुम्ही मला वेश्या समजलांत! पैशासाठीं शरीरविक्रय करणारी सामान्य वेश्या समजलांत!"

पाणावलेल्या डोळ्यांनीं, रुद्ध स्वरांत ती म्हणाली,

"माझेंच चुकलें. मी अगोदरच ओळखायला हवें होतें. तुम्ही ठेकेदार. अधिकाऱ्याला लांच व कामकऱ्याला लाथ—एवढाच तुमचा व्यापार!"

मी अजीजीनें म्हणालों, "माफ करा, माझी चूक झाली."

"मी इतकी स्वस्त आहे असें तुम्हांला वाटलें? तुम्ही पुरुष—सारे सारखे; देण्याघेण्याशिवाय तुम्हांला कांहीं कळतच नाहीं. कोणत्याही मोबदल्यानें मिळणार नाहींत अशा कांहीं गोष्टी जीवनांत असतात याची तुम्हां पुरुषांना जाणीवच नसते.

"कसूर माफ करा. तुमचा अपमान करण्याचा माझा हेतु नव्हता. गैरसमज करून घेऊं नका."

"गैरसमजाला जागाच नाहीं."

तिनें घंटा वाजवली. व्हरांड्यांत उभा असलेला नोकर आंत आला.

तिनें ड्रेसिंग टेबलाचा कप्पा उघडला. मी तिला दिली होती ती नोटांची चवड रुमालांतून काढली, टेबलावरली हिरवी नोट भरीला घातली व तें पुडकें माझ्या हातीं दिलें. शेजारीं नोकर उभा होता. आतां आणखी कांहीं बोलणेंही शक्य नव्हतें.

नंतर नोकराला उद्देशून ती म्हणाली,

"साहेब आज येथें राहणार होते, पण त्यांना सवड नाहीं. मोटार बाहेर काढण्यासाठीं त्यांना फाटक उघडून द्या."

नोकरानें बाईसाहेबांना सलाम केला.

त्याच्यामागोमाग मी बाहेर पडलों आणि मोटार अशा वेगांत सोडली कीं त्या रात्रीं मी कोणास ठार केलें कीं नाहीं याचीही मला आठवण नाहीं!

मी किती दिवसापासून पाहतों आहें, शनिवार हा माझा वातवारच!

• • •



दिवाळी
दिव्यांचा सण!
सबंध वर्षातून हजारोंच्या संख्येनें प्रवास करणाऱ्या आमच्या सर्व श्रीमंत आणि गरीब, वयस्क आणि तरुण आश्रयदात्यांना ही दिवाळी सुखासमाधानाची जावो.
चैनीखातर आणि उद्योगधंद्यानिमित्त होणारा प्रवास स्वस्त, कमी वेळांत आणि आरामशीर करण्याचा भारतीय रेल्वे आटोकाट प्रयत्न करीत आहेत.
अधिक चांगली सेवा करण्याकरितां, डबे आणि प्लॅटफॉर्म्स अधिक स्वच्छ ठेवण्याकरितां मदत करण्याची विनंती आमच्या आश्रयदात्यांना आम्हीं ह्या आनंदोत्सवीं करीत आहोंत.
अवजड सामान डब्यांत न ठेवतां तें ब्रेक-व्हॅनमध्यें ठेवा.
मध्य आणि पश्चिम रेल्वेंतर्फे प्रकाशित!

# एक अपूर्व संध्या



★

न. वि. गाडगीळ

*तें सौंदर्य, सौंदर्य होतें हें तर खरेंच ! पण तें पहातां पहातां मला एका निराळ्याच प्रसंगाची आठवण झाली. आणि मग ती संध्याकाळ नेहमींची संध्याकाळ उरली नाहीं !....*

साध्या गोष्टीसुद्धां प्रसंगानें आणि परिस्थितीनें असाधारण आणि असामान्य होतात. मानवी जीवनांतच हें होतें असें नाहीं, तर सृष्टीमध्येंहि हें घडत असतें. दोन नद्या एकत्र आल्या, संगम झाला, ही अगदीं साधी गोष्ट. पण यांतच एक असाधारण भावना उत्पन्न होते. मानवी मनांत त्याचें प्रतिबिंब उतरतें. संगम म्हणजे क्षेत्र ही समाजाची धारणा होते. मग तो संगम समोरासमोर झाला कीं, मनुष्य त्या गोष्टीला अधिक महत्त्व देतो. त्या संगमाचें महत्त्व अधिक मानतो. नद्या अनेक आहेत; पण प्रत्येकीला मनुष्य कांहीं पुण्यसलीला मानीत नाहीं. वास्तविक प्रत्येक नदी, प्रत्येक नाला यांचें कुळ एकच. आकाशांतून पडलेलें पाणी समुद्राप्रत जातें; आणि या प्रवासांत ज्या प्रमाणांत त्या नदीचा व्याप व विस्तार वाढतो, त्या प्रमाणांत ती पवित्र मानली जाते, 'तीरींच्या पादपांचें' वर्धन करीत जाते, तीरावरल्या भूमिभागाला समृद्ध करीत जाते, कांठांवर वसलेल्या मानवांच्या जीवनांत आनंद पसरीत जाते; आणि मग अशा विशाल नदीच्या तीरावरील प्रदेशांतून अज्ञात काळांत कुणीतरी तप केल्याच्या कथा प्रसृत होतात. पुराणें मग इतिहास बनतात. आणि सामान्य गोष्टीसुद्धां प्रेरक आणि उत्साह देणाऱ्या ठरतात.

वास्तविक सृष्टि हें एक महाकाव्य आहे. या काव्याला अंत नाहीं. त्यांत किती खंड आहेत हें कुणी सांगूं शकत नाहीं. पर्वत आणि नद्या, लहानमोठीं सरोवरें, सागर आणि महासागर हीं सर्व त्या महाकाव्याचीं पर्वें आहेत.

मोहेरे गिरीनाम् सङ्गमे नदीनाम्  
ध्येय पुंसाम् प्रजायन्ते

असें म्हटलें आहे. पर्वतांच्या गुंफांत आणि नद्यांच्या संगमाचे सान्निध्यांत मानवाची बुद्धि सृजनशील होते. अथांग रत्नाकराकडे, विशाल महासागराकडे पाहून तीच गोष्ट अनुभवाला येते. प्राचीन ऋषिमुनींनीं आपले धर्मग्रंथ याच वातावरणांत निर्माण केलेले आहेत. या व असल्या सृष्टीच्या मनोहर सान्निध्यांत काव्य सुचलें नाहीं असा मनुष्य विरळाच! मधुर संगीतानें, सुभाषितानें आणि 'युवतीनां च लीलया' ज्याचें चित्त द्रवत नाहीं, अशा माणसाची यथायोग्य संभावना सुभाषितकारांनीं केलेली आहेच! पण या सुभाषितांत सृष्टींतील सौंदर्यस्थळांचीहि भर घालावयास पाहिजे असें मला वाटतें. अशाच एका सौंदर्यस्थळाच्या सान्निध्यांत प्रस्तुत लेखाची प्रेरणा आहे.

पाणी योजना कमेटीच्या संदर्भांत, दक्षिणेंतील राज्यांत तातडतोब काय करतां येईल याची चौकशी करून, त्यासंबंधीं शिफारसी करण्याचें काम भारत सरकारनें एका समितीवर सोंपवलेलें आहे. त्या समितीचा प्रमुख या नात्यानें अलिकडेच मी केरळ राज्यांत गेलों होतों. केरळ प्रदेशाची सौंदर्यविषयक कीर्ति मी लहानपणा-पासूनच ऐकत होतों. 'केरळ-कोकिळ' या नांवाचें एक मासिक अगदीं लहानपणीं, म्हणजे सुमारें ५० वर्षांपूर्वीं अवलोकनांत येत असे; आणि त्यांतील लेखक 'महाराष्ट्रभाषाचित्तमयूर' यांचें लिखाण पण वाचनांत येत असे. तरुणपणीं राजा रविवर्म्याचीं चित्रें—कांहीं अस्सल आणि कांहीं छापील अशीं—पाहण्याचा योग आला होता; आणि केरळांतील हा कलावंत माझ्या आदराचें एक स्थान झाला होता. ज्या भूमींत जें सृजन होतें, तें त्या भूमींतील गुणद्रव्यांचें थोड्याबहुत प्रमाणांत प्रतिबिंब असतें. परिस्थितीनें पुरुष बनतो. म्हणजे त्याचें जीवन-दर्शन, त्याचा वर्तनक्रम, ही कमीजास्त प्रमाणांत परिस्थितीची निर्मिति असते. आणि या दृष्टीनें या कलावंताच्या रचनात्मक स्थितींत—ज्या स्थितींत त्याचे आदर्श आकार घेऊं लागले त्या स्थितींत—केरळांतील सृष्टिसौंदर्यानें खास मोठा परिणाम केला असला पाहिजे असें माझें मत होतें व आहे.

केरळांतील स्त्रीपुरुष स्वच्छ, टापटिपीचे, नीटस आणि देखणे असतात असें त्यांचें वर्णन महात्माजींनीं केलेलें आहे. आद्य शंकराचार्य हेहि केरळ भूमीचे सुपुत्र. त्यांची जन्मभूमि पाहावी ही फार दिवसांची इच्छा होती. मंत्रि-मंडळांत असतांना कामानिमित्त तिकडे जाण्याची संधि अनेक वेळां आली होती. पण तें घडलें नाहीं. तसेंच कै. वल्लभभाईंनीं केरळला भेट

दिली हाती, तेव्हां त्यांनींहि आग्रह केला होता. परंतु त्याहि वेळेस जाणें घडलें नाहीं. तात्पर्य, लहानपणापासून इच्छा असूनहि साठी उलटल्यानंतर ही घटना घडायची हा ईश्वरी संकेतच असला पाहिजे!

त्यामुळें सांगण्यांत आलेलें काम तावडतोब स्वीकारून पहिल्याप्रथम केरळ राज्याला भेट देण्याचें ठरवलें. कार्यक्रम निश्चित झाला. पाटबंधाऱ्यांसंबंधींच्या ज्या योजना चालू होत्या त्यांची पाहाणी करावयाची हें मुख्य काम. पण माजी मंत्रि आणि विद्यमान समिति-प्रमुख या नात्यानें भेट होणार असल्यामुळें, स्वागताचे अनेक समारंभहि त्या कार्यक्रमांत प्रविष्ट करण्यांत आले होते. तथापि दैव मला सर्वस्वीं अनुकूल होतें. मी त्या ठिकाणीं पोंहोचण्याच्या आधींच ७–८ दिवस विषबाधित अन्नाच्या प्रकरणांत कांहीं माणसें दगावलीं! त्यामुळें बहुतेक समारंभ छाटले गेले. आणि कांहीं २–३ समारंभ घडून आले, त्यामध्यें कुठेंहि साखरेचा अगर गव्हाचा पदार्थ नव्हता. काकवीमिश्रित चहा पिण्याचें अपूर्व भाग्य लाभलें; आणि जेवण म्हणजे यथार्थतया भातुकलीच होती! पण इच्छा व्यापक होती. इष्ट मर्यादित ठेवणें आवश्यक होतें.

ता. १५ मे रोजीं अगदीं ब्राह्म मुहूर्तावर मुंबईतील सांताक्रूझ विमानतळाहून 'अथ विमानमार्गेण' निघालों. गेल्या १४ महिन्यांत माझ्याइतका विमानाचा प्रवास विमानहांके सोडून दिल्यास कुणीहि केला नसेल! त्यामुळें या प्रवासाच्या बाबतींत मी इतका निगरगट्ट झालों होतों कीं, विमान मला लागायच्या ऐवजीं मीच विमानाला लागणें अधिक संभवनीय होतें! मला वाटत होतें, वैशाख महिना असल्यामुळें दक्षिण दिशेला जातांना डाव्या बाजूनें अखंड प्रवास करणारा सूर्यमा माझ्यासारख्या महान् व्यक्तीला मुजरा करण्यास येईल; आणि त्याच्या प्रकाशांत पश्चिम किनाऱ्यावरील कोंकण प्रांतांतील सृष्टिसौंदर्य, जलदुर्ग पहात पहात मी जाईन. तथापि सूर्या-ऐवजीं सह्याद्रीच्या घाटमाथ्यावरून धुकें आणि ढग आमच्या मार्गावर जणुं सत्याग्रह करतांना दिसूं लागले! विमान डाकोटा असल्यामुळें तें फार उंचावर जाऊं शकत नव्हतें. नाहीं तर व्हायकौंट प्रमाणें २० हजार फुटांवरून प्रवास केला असता; आणि वामनानें पददलित केलेल्या पृथ्वीला, वराहानें तुच्छ लेखलेल्या पृथ्वीला मीहि तुच्छ लेखलें असतें. तथापि मला ही संधि मिळायची नव्हती. म्हणूनच कीं काय, पहिला तासभर प्रवास अत्यंत त्रासदायक झाला. खुर्चीचे पट्टे बांधा आणि सोडा हीच कवायत करीत बसावें लागलें!

सुमारें १॥–१॥। तासानें परिचित भू-भाग दिसूं लागला; आणि थोडयाच वेळांत बेळगांवच्या विमानतळावर उतरलों. सीमेच्या वादांत हा भाग परिचित होता; कारण म्हैसूर आणि मुंबई यांतील सीमा म्हणजे हा विमानतळ अशी सूचना करण्यांत आली होती. विमानतळावर उपाहारगृहहि नव्हतें आणि बसावयास प्रशस्त जागाहि नव्हती. तथापि वातावरण प्रसन्न होतें आणि आकाशहि निरभ्र होतें. १५ मिनिटांत पुनः विमान सुरू झालें आणि तासाचें आंत मंगलोरच्या घाटमाथ्यावरील विमानतळावर आम्ही उतरलों. हा विमानतळ म्हणजे एक अपूर्व गोष्ट आहे. अन्य विमानतळ सामान्य भूमीवर आहेत; हा मात्र डोंगरपठारावर आहे. या विमानतळावर येण्यापूर्वीं गोव्याची भूमि दुरून दिसत होती. गोव्याच्या भूमीवरून जावें अशीहि इच्छा

होती. पण तें मना आहे असें पायलटनें सांगितलें! त्यामुळें डोकेंदुखीचा प्रश्न झालेला गोवा उजव्या बाजूला ठेवून, क्षणभर त्याला उजवी घालून आम्ही मंगलोरला आलों. तेथून कोचीनच्या विमानतळावर येतांना सर्वत्र पाण्याचे प्रवाह, नारळाचीं झाडें आणि त्याच्या कुशींत लपलेलीं लहान लहान कौलारू घरें असा देखावा वरून दिसत होता. वरून पाहतांना सर्वत्र पाणीच पाणी दिसत होतें. विमानतळ कुठें आहे आणि तो कसा आहे हें पाहण्याची उत्सुकता वाटत होती. पण तो नीटसा दिसेना. मग मात्र भीति वाटूं लागली. या सगळ्या जलप्रवाहाशीं पाठशिवणीचा खेळ खेळतांना विमान एकाद्वेळीं पाण्यांत तर नाहीं ना उतरणार? आणि तसें झालें तर काय करायचें याची योजना, योजनाप्रिय हिंदुस्थानचा एक नागरिक या नात्यानें मी लागलीच तयार केली. चष्मा आणि घड्याळ यांचें रक्षण केलेंच पाहिजे हा निश्चय झाला. पण पेनविषयीं निश्चित मत होईना. कटिवस्त्र ठेवून अंगावरील बाकीचे कपडे सोडायचे हाहि निर्णय घेतांना अडचण पडली नाहीं! तथापि असें कांहीं घडायचें नव्हतें; आणि अगदीं अरसिक रीतीनें आमचें विमान कोचीन विमानतळावर उतरलें. तिथें औपचारिक स्वागत झालें; आणि १५ मिनिटांत आम्ही त्रिवेंद्रमच्या विमानांत बसलों; १ वाजतां मुक्कामावर पोहोंचलों. 'सरकारी पाहुणा' या नात्यानें सर्व व्यवस्था होतीच. अर्थात् अनुभव चिमणरावांपेक्षां निराळा आला!

"कन्याकुमारीला भेट द्यायची आहे का?" असें त्रिवेंद्रमच्या इंजिनियरनें विचारलें आणि मी तत्काळ होकार दिला. नेमलेल्या कामाबाहेर कांहींतरी केलेंच पाहिजे हें मंत्र्याचें धोरण स्वीकारलें! त्यामुळें ता. १६ रोजीं सकाळीं मुख्य मंत्री श्री. नंबुद्रीपाद यांचें स्वागत स्वीकारून आम्हां मोटारीनें कन्याकुमारीला जायचें ठरवलें.

या जवळजवळ १०० मैलांच्या प्रवासांत आपण जणुं एकाद्या शहरांतून जात आहोंत असा भास होत होता. एक वस्ती संपली कीं लागलीच दुसरी सुरू. दुतर्फा घरें. वाक्यांत स्वल्पविराम असावा तशीं उपाहारगृहें; अर्धविरामाप्रमाणें शाळागृहें; आणि पूर्णविरामाप्रमाणें एकादा कालवा, असें होत होतें. एकाद्या महापुरुषाच्या दर्शनार्थ लोकांनीं गर्दी करावी, तशी नारळीच्या झाडांनीं दुतर्फा गर्दी केलेली होती. एकाद्या नट्व्या स्त्रीनें गळ्यांत जडजड मण्यांची माळ घालावी आणि लोकांना ती दिसावी म्हणून पदर किंचित् बाजूला सारावा, त्याप्रमाणें या वृक्षांची स्थिति झालेली दिसत होती. वृक्षांना नारळच नारळ लागलेले दिसत होते. रस्त्यांतील उपाहारगृहांजवळ जणुं कांहीं तसेंच दृश्य दिसत होतें. माणसांचीं टोळकींच्या टोळकीं एकत्र येऊन, हातांत वर्तमानपत्र घेऊन चर्चा करीत होतीं. स्त्रीपुरुष स्वच्छ, नीटनेटके आणि व्यक्तिमत्त्व असलेले दिसत होते. सहज चौकशी करतां असें समजलें कीं, देवीकोलम् मतदारसंघांतील मतदानाचा तो दिवस होता. केरळांतील ८० टक्के जनता साक्षर आहे. हिंदु, मुसल्मान, हरिजन आणि ख्रिश्चन या चार जमातींचा संगम तिथें झालेला आहे तिथल्या ख्रिश्चन जनतेनें दुसऱ्या शतकापासून तो धर्म स्वीकारला; कांहींच्या मतें तर जीझसच्या मृत्यूनंतर ५-१० वर्षांतच ती ख्रिश्चन झालेली आहे. आजच्या जमान्यांतसुद्धां धर्मच तिथें प्रभावीहि दिसत होता आणि अर्थशून्यहि दिसत होता! जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन आतां आर्थिक होऊं लागलेला आहे असें अनेकांनीं मला सांगितलें. सकाळीं भेटलेल्या वृत्तपत्र प्रतिनिधींनींहि तेंच सांगितलें होतें. मोठ्या पुढाऱ्याला भेटणें हें वृत्तपत्रकारांचें काम असतें. पण ते आपण होऊन न आल्यास त्यांना बोलावून आणणें हें लोकशाहींतील पुढाऱ्याचें कर्तव्य असतें! त्यामुळें ते मला भेटायला आले नसते, तर मीच त्यांना बोलावलें असतें हें निश्चित! त्यांनींच मला या निवडणुकीबद्दलची कल्पना दिली होती. म्हणूनच या शांत आणि सुंदर वातावरणांतून प्रवास करीत असतांना मी जागजागीं गाडी थांबवीत असे; आणि चहाचा शोध करून मिळवलेल्या कॉफींत संतोष मानीत, तिथें जमलेल्या मंडळींशीं थोडीबहुत चर्चाहि करीत असे. निदान ७-८ ठिकाणीं असें केलें असेल. 'व्यक्ति तितक्या प्रकृति' या न्यायानें विविध दृष्टिकोन नजरेस आले; पण एक गोष्ट मात्र निर्विवादपणें आढळून आली. ती म्हणजे विद्यमान मंत्रिमंडळांतील सदस्यांच्या वैयक्तिक चारित्र्याबद्दल लोकांना वाटत असलेला नितांत आदर! तात्पर्य, या प्रवासांत सृष्टीचें सौंदर्यनिरीक्षण आणि मानवी संघर्षाचा विचार करीत मी पुढें पुढें चाललों होतों. योजना अशी होती कीं, संध्याकाळ होण्यापूर्वीं निदान अर्धा तास

*आमचें राज्य!.... आमचा राज्यकारभार!.... :४:*

**केरळांतलें 'कडबोळें!'**



तरी कन्याकुमारीस पोंचायचें आणि सूर्यास्त झाल्यानंतर तेथून परत निघायचें. कारण मार्गदर्शक इंजिनियरनें सांगितलें होतें कीं, कन्याकुमारींतली संध्याकाळ म्हणजे एक अलौकिक सृष्टिसौंदर्याचा नमुना असतो.

सुमारें ५ वाजतां आम्ही कन्याकुमारीला पोंचलों. तिन्ही बाजूंला समुद्र होता. हिंदुस्थानच्या नकाशांत दाखवल्याप्रमाणें भूप्रदेश निमुळता होत गेला होता आणि शेवटला बिंदू तर अवघा फर्लांग दोन फर्लांगांइतका दिसत होता. मोटार समुद्रापासून १०० यार्डांवर ठेवून आम्ही दक्षिणाभिमुख चाललों होतों. डाव्या बाजूला बंगालचा उपसागर जणूं कांहीं भारतभूची पूजा करण्यासाठीं तरंगरूपी पुष्पांजलि वहात होता. किनाऱ्यापासून ३०० यार्डांवर एक लहानसें बेट दिसलें. तिथें स्वामी विवेकानंदांनीं कांहीं दिवस तप केलें होतें अशी आख्यायिका सांगण्यांत आली. जिथें जमिनीचा शेवटला बिंदू होता, त्या ठिकाणीं एक लहानसा घाट आणि त्याच्या अलिकडे कन्याकुमारीचें देऊळ होतें. प्राचीनकाळीं हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत राज्य करणारा भरत नामक एक राजा होता. त्याच्या मुलीचें नांव कुमारी होतें. राजानें आपलें राज्य मुलांत आणि मुलींत वांटलें होतें. (तेव्हां या दृष्टीनें विचार करतां हिंदु कोडांतील मागणी किती यथार्थ आहे हें सहज ध्यानांत येईल!) या भागांत तिचें राज्य असतांना त्याला 'कुमारीनाडू' म्हणजे कुमारीचें वसतिस्थान असें नामाभिधान प्राप्त झालें. अशीहि आख्यायिका सांगतात कीं, विश्वांतील पराशक्ति कुमारीच्या रूपानें येथें तप करीत होती.




आसपास अनेक तीर्थें आहेत. गायत्री, सावित्री, सरस्वती, मण्डन अशीं अनेक तीर्थें तिथें आहेत. त्यांतलें एक स्थाणु तीर्थहि आहे. त्या संबंधींची आख्यायिका मोठी सुरस आढळली. बाणासुर राक्षसाचा वध करून देशावरलें संकट निवारावें, म्हणून एक यज्ञ करण्यांत आला होता. या यज्ञांतून पराशक्ति कुमारी म्हणून बाहेर आली. तिचा विवाह झाला तर बाणासुराचा वध होण्यासारखा नव्हता. म्हणून भानगडी करण्याबद्दल प्रसिद्ध असलेल्या नारदमुनींनीं एक क्लृप्ति शोधून काढली. "डोळे नसलेला नारळ, पेरें नसलेला ऊंस आणि शिरा नसलेलें विड्याचें पान जो आणील, त्याच्याशीं तूं विवाह कर!" असा कानमंत्र त्यानें तिला दिला. पण इतकें करूनहि एका राजपुत्रानें तें सारें कांहीं आणलें! त्यामुळें नारदानें आणखी कांहीं युक्त्याप्रयुक्त्या लढवल्या आणि अखेरीस तो राजपुत्र त्याठिकाणीं स्थाणु राहिला. त्याचेंच आज तीर्थ झालें आहे. सौंदर्यस्थळांच्या अनुरोधानें अशा आख्यायिका नेहमींच निर्माण होत असतात. त्याचा प्रत्यय इथेंहि आला!

अशा ठिकाणीं बहुतेक यात्रेकरू भक्तिभावानें येतात. आम्ही मात्र भक्तिभावानें आलों नव्हतों. सौंदर्योपासक म्हणून आलों होतों. सत्य, शिव आणि सौंदर्य यांपैकीं सौंदर्याची प्रेरणा निदान माझ्या मनांत तरी प्रभावी होती. सूर्योदय आणि सूर्यास्त कोणत्याहि स्थळीं मानवी मनाला सदैव आनंद देतात. पण ह्या स्थळीं मनांत कांहीं विशेष भाव उत्पन्न होतात. पूर्वेस बंगालच्या समुद्रांतून वर येणारा सूर्य बारा तास आपली कामगिरी करून पश्चिम महासागरांत विलीन होतो. हे दोन्ही कालबिंदू इथें अत्यंत प्रेक्षणीय असतात. दोन्ही दृश्यें मनोहारी. अपूर्व प्रभात आणि अपूर्व संध्या!

आम्ही पोंचेपर्यंत सहस्ररश्मी पश्चिम सागराच्या वर १०–२० हात कललेला होता. असें सांगतात


अनुक्रमणिका

कीं, चैत्र शुद्ध पौर्णिमेला पूर्व समुद्रांतून चंद्राचा उदय आणि पश्चिम समुद्रांत सूर्याचा अस्त एकाच वेळीं होतांना दिसतो. एकाच वेळीं अस्त आणि उदय हें सौंदर्य, सौंदर्य तर खरेंच. पण त्याच-बरोबर तें एक नैतिक सुविचार प्रकट करणारेंहि आहे. लोकशाही युगामध्यें हा देखावा चैत्र पौर्णिमेला दिसत नसेल. पण निवडणुकीचा निकाल लागल्यानंतर एका मंत्रिमंडळाचा अस्त आणि दुसऱ्याचा उदय या स्वरूपांत तो दिसून येतो! जगाच्या रहाटगाडग्यांतील रिकामे पोहोरे भरुन वर येतात आणि भरलेले रिकामे होतात हें आपण नेहमींच पहात असतों.

अशाप्रकारचे विचार डोक्यांत चालू होते. तेवढ्यांत आमच्या वाटाड्यानें सांगितलें कीं, पलिकडचा वाळूचा ढिगारा जलदगतीनें ओलांडून गेलें पाहिजे; म्हणजे सूर्यास्ताचा देखावा स्पष्टपणें पाहतां येईल! आमच्या समितींतील बहुतेक लोक साठी उलटलेले होते. लालसिंग तगडे खरे. पण हृदयाच्या विकारामुळें ते सुद्धां जलद चालण्यास नाखूष होते. त्यांनीं वाळूंतच बैठक मारली. म्हैसूरचे नरसिंहैय्या म्हणजे लहानशी मूर्ति. पण सर्वांत तेच जलद-गति ठरले. आणि त्यांच्या पाठोपाठ हा मर्द मराठा कुठेंहि न थांबतां जात होता! रेताडांतून झपाट्यानें पावलें उचलीत जाणें मोठें जिकिरीचें असतें. पण मानवी मन असेंच आहे कीं, कुणाच्या उत्कर्षापेक्षां अवनतीकडेच त्याचें लक्ष अधिक वेधतें! त्यामुळें सूर्याचा अस्त पाहण्यासाठीं आम्ही अधीर झालों होतों. आमच्या पायांना क्षणभर हरणांची गति प्राप्त झाली होती. शंख आणि शिंपले ओलांडीत, तुडवीत आम्ही भराभर पुढें जात होतों. समुद्रापासून ५-१० पावलांवर पोंचेपर्यंत आम्ही अगदीं थकून गेलों होतों.

आकाश निरभ्र होतें. सूर्यबिंब लाल झालें होतें. पण ती पराक्रमाची लाली वाटत नव्हती. श्रेष्ठ व महान् पुरुष आपत्काळींसुद्धां विलक्षण धैर्यानें वागतो; त्यावेळीं त्याच्या मुखावर जी एक अपूर्व शोभा झळकत असते, तशीच ही शोभा वाटत होती. क्षणभरसुद्धां विसांवा न घेतां, कसल्याहि फळाची आकांक्षा न धरतां, जगाची एवढी सेवा करणारा हा कर्मवीर जगां-तील कृतघ्नतेच्या जाणिवेमुळें जणुं कांहीं कष्टी झालेला आहे असें वाटत होतें. जगाचा कोनाकोपरा आपल्या प्रकाशानें उजळणारा, अनंत जिवांना प्रेरणा—नव्हे, जीवनतत्त्वें देणारा हा प्रवासी एक मुक्काम पुरा करुन दुसऱ्या मुक्कामाकडे जायला निघाला होता. एखादा वर्तमानपत्राचा बातमीदार बातम्या देण्यासाठीं घाईघाईनें आपल्या कार्यालयाकडे धांवपळ करीत जातांना दिसतो, त्याप्रमाणें जगांतील सर्व घडामोडींचा हा साक्षीदार जगाचें इतिवृत्त विश्वनिर्मात्याकडे रुजू करण्यासाठीं जात असावा. त्यानें काय पाहिलें असेल, काय ऐकलें असेल, याची संपूर्ण कल्पना कुणालाहि येऊं शकत नाहीं. मनुष्य जें जें कांहीं करीत असतो, त्याचे साक्षी-दार सृष्टींतील प्रभावी द्रव्यें असतात. चंद्र, सूर्य आणि ही भूमि या सर्वांना, मनुष्य शरीरानें जें करतो आणि मनानें जें चिंतितो, तें सारें अवगत असतें असें धर्मशास्त्र सांगतें. हें खरें असेल का? आणि तसें असेल, तर माझ्या मनांतले विचार हा सूर्यनारायण खास जाणत असला पाहिजे.

आणि त्याचक्षणीं एकाएकीं आठवण झाली. याच स्थळीं, अशाच एका सूर्यास्ताचे वेळीं पूज्य विनोबाजींनीं जाहीर प्रतिज्ञा केली होती : "जीविताचा उरलेला प्रत्येक क्षण या भारतभूच्या द्वारें सर्व जगाच्या सेवेसाठीं खर्च करीन!"

त्या प्रतिज्ञेची आठवण होतांच एक निराळेंच वातावरण उत्पन्न झालें. ती संध्या मग मामुली संध्या उरली नाहीं. मनांत निराळेच भाव निर्माण होऊं लागले. क्षणभर पार्थिव अस्तित्व विसरुन गेलों. क्षणभर निराळ्याच एका सृष्टींत वावरूं लागलों. सूर्य कलेकलेनें समुद्राच्या पाण्याखालीं अदृश्य होत आहे हें पार्थिव डोळ्यांना दिसत होतें. पण मनांत निराळाच प्रकाश उमटत होता; कधींहि कमी न होणारा, क्षणोक्षणीं वाढत जाणारा प्रकाश मनांत उमटत होता.

तेवढ्यांत कुणीतरी 'परतण्याची वेळ झाली' असें म्हटलें; आणि पार्थिव सृष्टीशीं तुटलेला संबंध पुनः एकदां जोडला गेला!

बुडत्यास हात द्यावा ही नेहमींची जनरीत आठवली आणि धांवत जाऊन सूर्याला घट्ट पकडावें, बुडण्यापासून वांचवावें अशी पोरकट कल्पना मनांत आली. प्रस्तुत संदर्भात ती पोरकट खचितच नव्हती! पण मी तसें केलें नाहीं. झालेंहि नसतें याची जाणीवहि तत्काळ झाली. पण हाच भाव जीवनाचा प्रधान हेतु असावा हेंच त्या अपूर्व संध्येंतील अध्यात्म बरोबर घेऊन मी परत फिरलों.

• • •



## रं ग बा व री

खुरटीं झुडुपें हुंगत चाखत
उभ्या पहाडावरती बकरी;
चकित उभी निज न्यालुन बघते
धनिण तिची तर रंगबावरी;

जर्द किनारी लाल लहंगा
उघड्या पांचावर घुटमळतो
माथ्यावरचा रुमाल पिवळा
काळ्या कुडत्यावर फडफडतो;

वटावटांच्या असंख्य वेण्या
दो बाजूनीं भाळावरती,
लवल्या कानांमधुन, रुपेरी
झुमरू खांद्यावरती झुलती;

पिवळ्या काळ्या खडे मण्यांची
अरास रचली उंच गळाभर
मुद्या अंगठ्या झिळमिळ गुंफण
हात कटीवर अन् डोळ्यावर;

नभसन्मुख हिम-उजळ चेहरा
हिमगंगेचा जोष तयावर
डोळ्यामध्यें झुकलेलें अन्
देवदार-बन गहन गूढतर!

—इंदिरा


वंय वाढतें आहे
परंतु केंस मात्र
पांढरे होत नाहीत
Loma
REGD.
केसांना नैसर्गिकरीत्या काळेभोर करण्यासाठीं जगभर मान्यता पावलेले.
कोणत्याही अवस्थेंतील डोक्यावरील केंस कितीही पांढरे झालेले असोत लोमा ते खात्रीनें काळे केल्याशिवाय.राहणार नाहीं।
लोमा कलप नव्हे परंतु तें नैसर्गिकपणें केस काळे कळणारें असून त्याचबरोबर केसांची वाढ करणारीं नैसर्गिक द्रव्यें त्यांत असलेलें तें एक केशवर्धक टॉनिक आहे. ...त्याला अत्यंत आल्हाददायक सुवास असतो.
एजंटस् :
सी. नरोत्तम ॲन्ड कंपनी
मंगलदास रोड, मुंबई २ फोन : ३०५७५
साल एजंटस् :
एम. एम. खंभातवाला, अहमदाबाद १.
MPS-MAR.

मधुसूदन अकलूजकर



# गूत.. गूत..

*चांगल्या मुरब्बी माणसानेंहि वावचळून जावें असें होतें तिचें लावण्य. तिचा लाट साधतां यावा म्हणून मार्गातला जिवलग मित्राचा कांटासुद्धां केवढ्या हिमतीनें दूर केला. पण....*

ना मा भोळे ह्या इसमाला देवानं तसं कांहीं कमी केलं नव्हतं. रानांत एक लहानसा पिकाऊ शेततुकडा दिला होता. गांवांत दहावीस खण इमला ठेवला होता. गडी अगदीं एकला. भाऊबंदकीचं, नात्यागोत्याचं कुणी नव्हतं. असामी जवळ चार पैसे बाळगून होता, तरी स्वभावानं साधा, सरळ होता. पाचपेंच त्याला माहिती नव्हते, येतहि नव्हते. आणि तरी ह्या इरसाल व्यवहारी जगांत त्याचं कधीं अडलं नव्हतं.

घरांत बाईमाणूस कुणी नव्हतं, एवढं मात्र न्यून होतं. कांहीं माणसांचीं लग्नं व्हायचीं विनाकारणच राहून जातात. त्यांपैकींच नामाहि होता. उमर चाळिशीपर्यंत आली, तरी अजून अंगाला हळद लागली नव्हती.

पण नामा भोळ्याला याचं कधीं वाईट वाटलं नाहीं. आपलं लग्न आतां होत नाहीं हें त्यानं गृहितच धरून टाकल्यामुळं त्याला रुखरुख नव्हती. दिवसांकाठीं एकदां चार भाकरी बडवून आणि कसलें तरी तोंडी-लावणं शिजवून ठेवलं, म्हणजे त्याची खादगी भागून जाई. जेवणाखाण्याची अशी आबदा नसल्यानं बाईमाणसाची त्याला फार गरजहि वाटत नव्हती.

आतां असं असलं तरी, आपलं लग्न होऊंच नये असं मात्र नामाला वाटत नव्हतं. या वयांतहि एखादी मुलगी सांगून येत असेल, तर त्याची बोहल्यावर उभं रहायची तयारी होती. पण लग्न होत नाहीं म्हणून झुरत बसायला मात्र तो तयार नव्हता.

गांवांतल्या उचापतींत तो कधीं पडत नसे. जगू कासाराखेरीज दुसरी-कडं त्याचं जाणंयेणंहि नसे. हा कासार मात्र त्याचा बरेच वर्षांपासून मित्र जुळलेला होता. वेळ मिळाला किंवा करमेना झालं, तर नामा त्याच्या

दुकानीं जाऊन बसे. सतरा शिक्यांवरच्या लोण्याचा वास घेणारा हा कासार चांगला गप्पिष्ट होता. त्याच्याजवळ अनेक विषय, नाना भानगडी यांचा साठा असे. दोन घटका करमणूक म्हणून नामा त्या ऐकून घेई. आणि 'बरा गेला वरं का येळ आज' असं म्हणून आपली वेळ झाली, कीं उठून आपल्या उद्योगाला निघून जाई.

जगू कासाराच्या दुकानांत आज नामा भोळे येऊन बसला, तेव्हां तो मोठ्या खुषींत दिसत होता. नामाच्या अंगावरचे कपडे नेहमींचेच होते. पण ते अधिक धुवट, चुरचुरीत दिसत होते.

"काय नामाजी, कुठं दडी मारली होती चारसहा दिवस?" जगूनं विचारलं.

"कुठं नाही बा. हितंच हुतो कीं."

"मग फिरकला नाहीं अजाबात आपल्या दुकानाकडं?"

"येणार हुतो. पर येळच झाला नाहीं."

"कां? एवढ्या कसल्या कामांत गुतला हुता?"

जगूच्या ह्या प्रश्नाचं उत्तर न देतां नामा नुसता हंसला. जगूला त्याचा नूर आज कांहीं वेगळाच दिसत होता. खुषींत झुलल्यासारखा नामा उगीच झुलत होता. हंसतमुख दिसत होता.

कांहीं वेळानं त्यानं नादांतच विचारलं,

"नव्या डिझायनचीं काकणं हायती का झकास?"

कासार चकितच झाला. त्यानं आश्चर्यानं आ वासला!

"ऑं? काय राव? काय आहे तरी काय भानगड?"

"भानगड कशाची—"

कासार डोळे मिचकावीत म्हणाला,

"कुणासाठीं पाहिजेत काकणं?"

नामा लाजून म्हणाला, "आमच्या घरींच पायजेत."

"तुमच्या घरीं! कुणी पावणीरावळी आलीया का काय? का आणलीया एखादी?"

जगूनं मग जरा वेळ त्याची चेष्टा केली. नामाला ती फार गोड लागली. चेष्टामस्करीनं त्याला गुदगुल्या झाल्या. गड्यानं कुठंतरी सूत जुळवलेलं दिसतंय ह्याविषयीं मग जगूची खात्री पटली. तो मनांत म्हणाला,

"तरी मी म्हणलंच, हा गडी कधातरी घाईला येणार आन् कुठंतरी खातं टाकणार! विनबाईचं जल्मभर रहाणं म्हणजे काय चेष्टा आहे?"

चेंगट स्वभावाच्या जगूला गडबड करीत नामा म्हणूं लागला, "आवरा कीं राव लौकर. द्या कीं चांगलीं काकणं काढून, निवडक."

"काकणं काढतो निवडक डिझायनचीं. पर तुम्हीच नेताय काय?"

"व्हय. न्हाईतर मग कोन?"

"शहाणंच दिसताय! अहो, बांगड्या भरायचा धंदा तुमचा का आमचा?"

"तुमचा!" त्यानं सरळपणानं उत्तर दिलं.

"भले! आतां कसं बोललांत! आन् हाताचं वेढ तरी आणलंय कां?"

"न्हाई बा."

"माप चुकलं तर सगळ्या बांगड्या तडातड् वाढतील कीं. आन् मग याल पुन्हां ओरडत माघारीं..."

बोलतां बोलतां जगू उठला. एका लहानशा पत्र्याच्या पेटींत निराळ्या बांगड्या ठेवल्या होत्या. त्यांतल्या निवडून घेतांघेतां तो म्हणाला,



अनुक्रमणिका

"बांगडी कशी हलक्या हातानं, अटकलीनं चढवावी लागती न्हाईतर, बायांचीं मनगटं अन् हात दुखावतात. त्यांचं हात फार नाजुक असत्यात. तिथं तुमचा शेतकींतला रानदांडगावा काय कामाचा?"

"आतां मला अडाण्याला काय म्हाइत ही इकती? ती म्हणली काकणं आणा जावा, म्हणलं आणतों." नामानं खुलासा केला. दुकानाचीं दारं बंद करीत जगू म्हणाला, "बरं चला आतां. वाटेनं बोलूं. न्हाईतर हितंच बोलण्यांत वेळ जायचा."

जगू कासार नामाबरोबर त्याच्या घराकडं निघाला. चालतां चालतां त्यानं मनांतला प्रश्न विचारला,

"नामाजी, आपण निघालों खरं. पर ह्या काकणांची धनीण कोण हें अजून तुम्ही आमाला काय सांगितलं न्हाई बरं कां. तुम्ही काय पत्त्या लागूं देत न्हाई."

"आतां एवढं ओळखूं यीना का? तुमी तर अनभाविक मानूस."

नामानं आपल्या कपाळावर बोट लावून कुंकवाची खूण केली.

"आँ? म्हणजे? लगीन ठोकलंत का काय आमच्या परस्पऱ्या? भले शाबास—"

"केलं न्हाई अजून. पर करण्याचा मानस हाय!"

"असं का? कुणाशीं?"

"बाईशीं!"

"तें तर टरल्यालंच आहे. पर बाई कोण?"

"हाय आमच्या जातीचीच."

"कुठं रहाती?"

"सध्यांला हाय माझ्याकडंच."

"म्हणजे? लगीन होस्तोंवर तशीच ठिवून घेणार का काय तिला?"

"हां! महीना का काय हुतंय त्याला?"

सगळं सीध्या नामाची ही तवारी ऐकून जगू अगदर थक्क झाला. नामानं ही बाई कुठनं आणली असंल, कोण आणली असंल ह्या शंका जगूला स्वस्थ राहूं देईनात. त्यानं नामाला बाईची हकीकत विचारली. चारदोनदां प्रश्न विचारून चौकशी चालवली. तेव्हां अखेरीस नामानं उत्तर दिलं,

"जगभाऊ, समदं सांगीन तुमाला, सवडीनं म्यावतरी. पर आतां हितं रस्त्यांत उगी बोभाटा नगं."

"होय, तें पर खरंच." असं म्हणून तात्पुरता तो पुन्हां गप्प झाला. पण त्याचं आश्चर्य कायम होतं. नामाच्या तोंडाकडं पहात मनांतल्या मनांत तो कांहींतरी अंदाज बांधून पहात होता. ही बाई कोण असंल, कशी असंल, ह्याचा विचार करीत चालत होता.

नामाच्या घरीं दोघं आले, तेव्हां त्याचं घर चांगलं उजळलेलं जगू कासाराला दिसून आलं. कर्त्या बाईचा हात फिरला म्हणजे घरानं रंगरूप जसं पालटतं, तसं तें घर पालटलेलं दिसलं.

नामानं भुईला घोंगडं अंथरलं आणि जगूला तो म्हणाला, "बसा, आंत सांगतों."

मग त्यानं हांक मारली, "अवं, भायेर या वरं जराशीक. हे जगभाऊ कासार आल्यात. तुमाला काकणं पायजेत न्हवं?"

लुगड्याची सळसळ झाली आणि मधल्या दाराच्या चौकटींत, एखादं चित्र उभं रहावं, तशी एक बाई येऊन उभी राहिली. त्या बाईकडं जगूनं पाहिलं आणि तो गार होऊन गेला. अशी सुरेख बाई त्यानं जन्मांत पाहिली नव्हती.

बाई तशीच दारांत उभी राहिली, तेव्हां नामा म्हणाला,

"अवं, अशा पुढं येऊन बसा कीं. लाजाया कारं झालंय? हे जगभाऊ आमचं मैतरच हायती. का वं जगभाऊ!"

"तर तर! माझ्यापुढं लाजण्याचं कारण न्हाई. आन् अशी उभ्यानं काकणं कशी भरणार मी? कासारापुढं बसाय हे पायजेच."

जगू आणि नाना दोघेहि हंसले. बाईहि खुदकन् हंसली आणि एक तिरपा कटाक्ष टाकून तिथं येऊन बसली. तिच्या अंगाचा आणि अंगावरच्या नव्या लुगड्याचा मादक वास आला. आणि जगू बावरून गेला. बाई इतक्या जवळ येऊन बसली, तशी तिला जवळून न्याहाळण्याची संधि त्याला मिळाली.

ह्या बाईला बाई म्हणणं बरोबर नव्हतं. बाई म्हणण्याइतकी ती अजून झालेली नव्हती. वयानं बरी तरुण दिसत होती. बांधा उफाड्याचा होता. रंग गोरापान. अवयव कसे टंच. जिथल्यातिथं. केसांचा भरगच्च अंबाडा मानेवर रुळत होता. अंगावर दागिना कांहीं नव्हता आणि तरीहि रूपाचा टसकाच एवढा होता कीं, चांगल्या मुरवण माणसानंहि बावचळून जावं. तिच्या डोळ्याची झांक हिरवी होती आणि ते असे चमचमत होते कीं नजरेला नजर भिडत नव्हती.

लग्नाचं वय फार झालं म्हणजे एखादं हेंदरं ध्यान पत्करावं लागतं. मिळेल तसला वाण चालवून घ्यावा लागतो. रंगरूपाबद्दल खिटखिट करतां येत नाहीं. पण इतकं वय वाढूनहि नामा भोळ्याला अशी निवडक बाई लाभावी ह्याबद्दल जगूला आश्चर्य वाटलं. त्याच्याबद्दल मनांत थोडी असूया उत्पन्न झाली. नामाच्या नशिबाचा हा योग त्याला चमत्कारिकहि वाटला.

जगूनं त्या बाईचा हात हातांत घेतला आणि त्या लुसलुशीत स्पर्शानं त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. हात गार लागत होते. त्यानं मग चांगलीं चार काकणं चढवलीं. तशी बाई खूष झाली.

"तुमचा हात फारच हलका हाय बरं का."

जगू हंसत हंसत म्हणाला, "मग? आसपासच्या दहा गांवांत जगू कासार म्हणून आमचं नांव आहे तें उगीच वाटतं?"

"अवं, ही पर एक इद्याच हाय काकणं भरण्याची." नामा मान डोलवीत बोलला.

भरलेलीं काकणं पुढं मागं सारीत, कौतुक करीत ती बाई बसली होती. मग जगू लाडिकपणें म्हणाला,

"काय राव, आम्हांला काय च्यापानी तरी वैनीच्या हातचं?"

"वैनी? अजून ही माझी बायकु व्हायची हाय. तंवर झाली का ही तुमाला वैनी?" नामाहि गंमतीला आला.

"बायको झाल्यागतच हाय कीं!"

जगूच्या ह्या किंचित् फाजील बोलण्यावर बाई लाजून म्हणाली,

"इश्श!"

आणि ती उठली. तसं नामानं म्हटलं, "च्या करताय न्हवं?"

"व्हय्. त्यासाठींच तर आंत चालल्येय."

मग इकडचं तिकडचं थोडं बोलून आणि चहा पिऊन जगू बाहेर पडला.

• •

नंतर दोन दिवस गेले. ह्या दोन दिवसांत जगू कासाराला दुकानाच्या कामामुळं बाहेर कुठं जाता आलं नाहीं. नामा भोळेहि त्याच्याकडं फिरकला नाहीं. मग तिसरे दिवशीं संध्याकाळचा असा नामा दुकानीं आला. जगू दिवाबत्ती लावीत होता. तिन्हीसांज झाल्यानं आतां गिऱ्हाईकांची वर्दळ अजिबात नव्हती. जगूखेरीज दुकानांत दुसरं कुणी नव्हतं. दिवाबत्ती टांगल्या सळईला अडकवली आणि जगू नामाजवळ येऊन बसला. पानाची चंची त्याच्यापुढं टाकीत म्हणाला,

"हं, काय राव, कसा काय बेत? कधी घालताया आतां पोळ्या आम्हाला?"

"पोळ्या? कशाच्या?" नामानं चंचींतलं पान काढीत विचारलं.

"कशाच्या? अवं तुमच्या लग्नाच्या."

"लग्नाच्या पोळ्या व्हय्? घालूं कीं. बाई हाय, मी हाय, मग आतां लगीन झाल्याशिवाय राहतंय काय?"

"तें खरं. पर कधीं?"

"आणखी महिना, पंधरा दिसानं."

सुपारी फोडून तोंडांत टाकत जगूनं विचारलं,

"कां? इतकं कशाला लांबणीवर टाकताय आणखी?"

"लांबणीवर आम्ही न्हाई टाकीत. पर जगभाऊ, असं बगा, लगीन करायचं म्हंजे म्हुरुत नगं?"

"असतील कीं पंचांगांत!"

पान खात नामा म्हणाला,

"पंचांगांत न्हाईती म्हनू तर गाडी अडलीया."

"म्हणजे? असं कसं? पंचांगांत म्हुरुतच न्हाइत म्हणजे काय गोष्ट आहे?"

"तसं न्हवं. म्हुरुत हायती पंचांगांत—पर पुढल्या महिन्यांत. आन्

वामण पर म्हनला कीं या महिन्यांत लगीन करीत नसत्यात."

"मग ?"

"आणखी पंधराईस दिसांनीं म्हुरत सुरु होत्यात म्हनं. पग पयल्या म्हुरतावर टोका म्हनला लगीन."

"असं हाय न्हाई का ?" समजुतीनं जगू म्हणाला, "मग काय करतां राव, इतकी वर्सं ध्याकंवर राह्यला तसं आणखी पंधराईस दिवस काढा झालं कसं तरी...कळ सोसा जरा. काय करणार ?"

त्याच्या ह्या चावरट बोलण्यावर, न हंसणारा नामाहि हंसला. त्याला आंतल्या आंत गुदगुल्या झाल्या.

मग तासभर गप्पा चांगल्याच रंगल्या. बोलण्याच्या रंगांत जगूनं त्याला मनचं विचारलं,

"तें सगळं खरं. पर नामाजी, तुम्ही अजून आम्हांला कांहींच पत्त्या लागूं दिला न्हाई..."

"कशाचा ?" जगूच्या प्रश्नाचा रोख न कळून नामा म्हणाला.

"कशाचा म्हणून काय सांगायचं ?...अवं, तुम्ही आपले साधं सरळ शेतकरी माणूस. कधीं कसली भानगड न्हाई कीं उचापत न्हाई. पर ही बाई कशी काय नादी लावून आणली तुम्ही ?"

नामा आडवी मान हलवीत म्हणाला,

"मी नादी न्हाई लावून आनली बरं का. तीच आपसूक आली."

"ऑं ?" जगू विस्फारुन उद्गारला. अशा फक्कड बाईनं ह्या रांगड्या गड्याच्या नादी लागावं एवढं ह्याच्यांत काय आहे असं त्याला वाटलं.

"म्हंजे कसं ? इकती कशानं ती तुम्हांवर नादावली ?"

"त्यों समदा परकारच निराळा हाय. चित्तरकथाच हाय म्हणाना का ती एक."

जगूची उत्सुकता चाळवली. नामाच्या आणखी जवळ सरकून त्यानं म्हटलं, "काय राव, काय केली तरी काय अशी मज्जा ? ही बाई कोण, कुठली, तुमाकडं कशी आली ?......सगळी सगळी कथा डिटेलवार सांगाशीक."

बाहेर रस्त्यावर सामसूम झाली होती. लोकांची वर्दळ फारशी नव्हती. बत्तीचा सूं सूं एवढाच बारीक आवाज दुकानांत येत होता.

नामा उकिडवा बसला आणि चित्तरकथा सांगूं लागला...

"आठदहा दिवस झाले असतील. तालुक्याला गेलों होतों. मामदार कचेरींत काम होतं. निघस्तोंवर फार अंधार झाला. झपाझपा निघालों चालत, एकटाच. काळ्या ओढ्यापत्तोर आलों. आपलं हें गांव असं कोस दीडकोस राह्यलं. ओढ्यांत किर्र अंधार. आजूबाजूला गच्च झाडी. सगळं गचपान माजलेलं. आणि मधीं खोलांत ओढ्याचं पाणी खळखळा चाललेलं.

ओढ्याच्या पाण्यांतनं चालत असा अलिकडल्या अंगाला आलो का, एवढ्यांत कुणातरी बाईचं रडणं ऐकूं आलं. म्हणलं, कोण बाई असंल बरं अशा आडरानांत ? आणि अशा वेळेला ? कुणी का असंना, वेळवखत आहे. आपण बाप्यामाणसानं तसंच कानाआड टाकून पुढं जाणं बरं नाहीं. एखादी म्हातारीहि चुकली असंल.

अशा ध्यानं मी थांबलो. आणि ओरडून विचारलं,

"आरं कोण रडतंया रं ? का झालंया ?"

त्यावर रडणं आणखीच मोठ्यानं आलं. रस्त्याच्या एका कडेला, दगडावर, अंधारांत एक बाई बसलेली अंधुक मला दिसली. तीच रडत होती. मी जवळ जाऊन चोकशी केली. म्हणलं,

"बाई, कोण तुमी ? का रडताय ? वाट चुकलाय काय ?" तशी ती आणखीच, बांध फुटल्यागत रडूं लागली. मी धीर दिला,

"घाबरूं नगा. मी हाय मदतीला. कुटं पोंचतं करूं सांगा ? नीट खुशाल, सोबतीनं नेऊन सोडतों तुमाला."

तिनं जरा वेळानं रडणं आवरलं. आणि फुंदत फुंदत आपली हकीकत सांगितली. ती म्हणाली,

"मी पार लांबच्या गांवची. सावत्र आईशिवाय मला कुणी न्हाई. पैशाच्या लोभानं तिनं माझी सोयरीक एका म्हाताऱ्याशीं ठरवली. आईचा माझ्याशीं पहिल्यापासनं दुष्टावा. मग म्हाटंच पळालें घरातनं बाहेर. जें पळत सुटलें तें, दीसभर सारखी पळतीच राह्यलें. पाठलागाची भीति हुती. येड्यावाकड्या रस्त्यानं पळत हितपर्यंत आलें आन् अशी दमून बसलें. तंवर अंधार झाला. मग मला लई भ्या वाटूं लागली. आन् रडूं आलं. हितं अशी कवाधरनं रडत बसलें आन् मग तुमी आला."

तिची ही कहाणी ऐकून मला वाईट वाटलं.

"अऱ्याअऱ्या, काय ग बाई हा वनवास तुझ्यामागं !"

मग मी तिला सांगितलं,

"हें बग, जवळ माझं गांव हाय. आतां रातीपुरतीं चल म्हा तथंच. सकाळीं दीन तुला तुझ्या गांवाकडं पोंचती करून. चल उठ."

तशी ती पुन्हां मोठ्यानं रडूं लागली. हातपाय आपटीत त्राग्यानं म्हणूं लागली, "मी न्हाई माघारीं जानार मराक्ला. हितंच अशी मरीन. खाऊं द्या कोल्ह्याकुत्र्यांनीं मला."

तिचं डोकं आईविरुद्ध फार तापलेलं दिसलं. मनांत म्हणलं, तुर्तास हिच्या कलानं घ्यावं. सकाळीं रागाची वाफ होईल आपसूक कमी. आणि



अनुक्रमणिका

मग देऊं तिलाँ तिच्या गांवीं रवाना करून.

आम्ही दोघं गांवांत येईपर्यंत पार रात्र झालेली. चिकडंतिकडं सामसूम, निजानीज झालेली. आतां आम्ही का पंचाईत? एकला गडी मी माझ्या घरांत. शेजारपाजार नाहीं. दुसरं कुणी बाईमाणूस नाहीं. मी तिला सरळ हा तिडा सांगितला. म्हणलं,

"बये, असं असं हाय. मी सरळ मानूस हाय. घट कासोट्याचा हाय. तुला कांहीं भ्याचं कारण न्हाई. पर उद्यां लोक काय म्हनत्याल तुला?"

ती म्हणली,

"तुमी इश्वासू दिसताव. तुमच्यावर माझा भरोसा हाय. लोकान्ला न्हाई मी भीत. आन् उद्यांचं उद्यां! आतां अदुगर मला तानभूक लागलीया...चला, कुलुप काढा घराचं आन् दिवा लावा."

कुलुप काढलं, आंत गेलों. काडी ओढून दिवा लावला, उजेड केला. आणि म्हणलं, "ये बाई आंत."

ती दमलीभागली बाई आंत आली. इतक्या वेळ दाट अंधारामुळं नजरेला नीट दिसली नव्हती, ती आतां नीट सबंध दिसली. एखाद्या देवळांत फुल् उभी देवी दिसावी तशी दिसली. काय तिचं रूप! अहाहा...काय सांगूं राव, तिला पाहिली आणि माझी इतकी वर्षे एकदम पाण्यांत गेली!

सकाळीं मी जागा होऊन बघतों तर ही बया अगोदरच उठलेली. सडा, सारवण करून घर चकचकीत. चहा तैय्यार!

आणि मग कशाचं काय राव, आमचा आणि आमच्या घराचा कबजाच तिनं घेतला. दुसरं काय?..."

...नामाची ही सगळी हकीकत सांगून झाली. जगू आणि तो क्षणभर दोघेहि तसेच बसून राहिले. मग नामानं बाहेर पाहिलं. आणि गडबडीनं उठत तो म्हणाला, "जगभाऊ, द्या आतां परवानगी. लई उशीर झाला. मानसं वाट बघत असत्याल." असं म्हणत त्यानं पायताणं घातलीं आणि दुकानाच्या फळीवरुन उतरून तो भराभरा घराकडं निघून गेला.

दोनतीन दिवसांनंतर नामा भोळे उभाउभी जगू कासाराकडं आला. जगूला त्यानं जेवायचं आवंतण दिलं. सुरुवातीला जगूनं उगीच वरकरणीं आढेवेढे घेतले. आतां मधींच जेवणाचं हें काय काढलं म्हणून म्हटलं. आणि अखेरीस नामाच्या आवंतणाला मान दिला. येतो म्हणून कबूल केलं.

जेवतांना जगू फार खुष होऊन गेला. नामानं आणि त्या बाईनं त्याला प्रेमानं खूप आग्रह केला. पोटतडणी येईतों खाऊं घातलं. जगू त्या बाईला वारंवार नांवाजीत होता. अशी सुग्रण बायको मिळाल्याबद्दल नामाचंहि तोंड भरून कौतुक करीत होता. बाई स्वभावानं फार मोकळी दिसली. जगूशींहि ती दिलखुलास वागली, बोलली.

जेवणंखाणं उरकल्यावर, बोलतां बोलतां जगू कासारानं सूचना दिली,

"आतां लग्नाच्या सामानाची तयारी सुरु केली पायजे बरं का, नामाजी. दिवस थोडं राह्यलं."

नामानं मान डोलवून संमति दिली आणि तो म्हणाला,

"भले! मग तुमासारखं मैतर कशाला जोडल्यात तर आमी? तुमीच कर्तेपणानं समदी जिम्मेदारी घेतली पायजे."

"घेऊं की."

"आरसं! आतां कसं बोलला?...मला ह्या लग्नाच्या कामांत कांहींच म्हाइती न्हाई बगा. आन् ह्ये चारआठ दीस तर मला फार येळ पर मिळनार न्हाई. रानांतल्या कामाचं याड माझ्यामागं हाय. अदुगरच पेरणी मागास झालीया. ह्रिच्या नादांत येळ गेला इकते दीस..."

त्यावर ती बाई हंसली.

"तुमाला कोन म्हनतंय येळ घालवा म्हणून? तुमी आपला धंदा लौकर उरकून ध्यायचं बगा. भावजी करत्याल मला समदी मदत."

"जगभाऊ, तुमी लागाच तर उद्यांपासनं ह्या लगीनसामानाच्या उद्योगाला. तंवर मी पर चारआठ दिसांत पेरणींतून मोकळा हुतो आन् मग फुडल्या आठ दिसांत मी हायेच तुमच्या जोडीला."

जगू गमतीनं मधेंच बोलला,

"आम्ही आन् बामणानं हाक मारली म्हणजे वेळेवर बोहल्यावर येऊन उभा रहा म्हणजे झालं. न्हाईतर म्हणाल, थांबा माझी एवढी एकरभर पेरणी उरकूं द्या. काय?......"

तिघेहि हंसले.

मग तो नामाच्या घरांतनं निघतां निघतां म्हणाला,

"उद्यांपासनं कामाला कंबर बांधाय पायजे बरं का वैनी, तुमीआम्ही. लग्नाची तयारी म्हणजे सोपी नसती. कामाखालीं भुस्कट पडतं..."

नामा भल्या पहांटे उठून कोस दीडकोसावरच्या आपल्या शेतांत जाई. तो दिवेलागणीलाच परत येई. जगू सगळी तयारी करून घेईल याबद्दल त्याला खात्री होती. त्याच्या दृष्टीनें जगू हा तसा चांगला अनुभवी इसम होता.

हा अनुभवी इसम मग केव्हां सकाळीं तर एकदोनदां दुपारीं असा नामाच्या घरीं कामानिमित्त खेपा घालून गेला. ह्या त्याच्या कामासू मित्रानं लग्नाच्या तयारीचं एकंदरींत फारच मनावर घेतलेलं दिसलं. त्यामुळं नामाच्या घरीं त्याचं वारंवार काम निघूं लागलं. वैनीच्या विचारमसलतीची गरज पडूं लागली. मिष्टास तोंडाचा हा भुरळ्या इसम मग तिच्याशीं घटका घटका बोलत बसूं लागला. तिच्याशीं सूत्र जुळवतां येईल कीं काय ह्याचा विचार करूं लागला. बोलण्या, वागण्यांतून अंदाज घेऊं लागला.

एखादी बाई जरा मोकळीचाकळी वागते एवढ्यावर फार पुढं जाणं बरं नाहीं. एखादे वेळीं अंदाज चुकतो, धोका होतो, अशा सावधगिरीच्या विचारानं त्याचा सगळा व्यवहार चालला होता. पण दोन चार खेपांतच त्याच्या अनुभवी दृष्टीला काय तें जाणवलं. तो मनाशीं म्हणाला,





अनुक्रमणिका

"तरी मला हिचा वास पहिल्याच खेपेला आला होता. ही बया अशांतली असावी हें मी तेव्हांच ओळखलं होतं. पण आतां खात्रीच पटली. ही रंगीच निघाली!"

जगू आल्यावर कुणी परका आल्यागत ती बाई वागेना झाली होती. पडला पदर तसाच राहूं देऊं लागली होती. त्यानं चहा घेतांना एकदां तिच्या हाताला स्पर्श केला होता, तरी तिनं कांहीं केलं नव्हतं. त्याच्याकडं पाहून ती अधूनमधून उगीचच हंसत होती. त्याच्याकडं टक लावून बघत बसत होती.

आणि मग हें सगळं ध्यानांत घेऊन जगू कासारानं ओळखलं कीं हें काम होण्यांतलं आहे. अशी दुर्मिळ बाई हातची सोडणं बरं नाहीं, आपल्यासारख्या इसमास तें शोभतहि नाहीं. आतां कांहीं तरी डाव करून ह्या भोळ्या नामाचा अडसर काढून बाजूला केला पाहिजे. म्हणजे मग घोर नाहीं. मग खरी मजा!

जगू कासारानं चांगलं दोन दिवस दोन रात्री आपलं सुपीक डोकं पिकवलं आणि काय डाव काढावा ह्याचा बराच विचार केला. सगळ्या गोष्टींचा चोखाळा घेतला आणि मग त्याला एकाएकीं एक झकास युक्ति सुचली. तसा तो स्वतःवरच खूष होऊन गेला. आनंदानं उड्या मारूं लागला. आपल्या हुषारीचं मनांतल्या मनांत आपणच कौतुक करूं लागला.

आणि मग त्यानं एकदोन दिवसांतच बाईचा हा लाट साधायचं ठरवलं.

● ●

पहांटेची वेळ. अजून माणसाला माणूस नीट दिसत नव्हतं. अशा वेळीं जगू कासार गांवाबाहेरच्या वाटेवर नामाची वाट पहात उभा होता. नेहमींप्रमाणं झपाझपा चालत नामा ह्या वाटेनं शेताकडं निघाला होता. एवढ्यांत झाडाआडून एकदम पुढं होऊन जगू त्याला घाबऱ्याघुबऱ्या म्हणाला, "नामाजी, बरं झालं. देव पावला. तुम्ही भेटला नेमके."

"आं? कोण जगभाऊ? का बं, काय झालं?"

आपल्या थरथरत्या हातांत त्याचा हात जगूनं पकडला.

"देवच तुमचा पाठीराखा म्हणून बचावला तुम्ही."

नामा गोंधळांत पडला. जगूचं हें बावरं वागणं बघून त्यानं धास्तावून म्हटलं,

"तुमी हें असं भरमाटल्यागत काय बोलतांय? काय, हाय तरी काय परकार?"

इकडे तिकडे पाहिल्यासारखं करून जगू हळूं, कांपऱ्या आवाजात म्हणाला,

"हितं उघड्यावर न्हाई सांगतां येत. आपल्या दुकानीं चला. मग सांगतों सगळं." कासाराच्या ह्या गूढ बोलण्यानं नामा मनांतून सरडला. त्यालाहि आतां थोडीफार भीति वाटूं लागली.

दोघे गुपचुप दुकानाशीं आले. कासारानं दुकानाची एकच फळी उघडून नामाला आंत घेतलं आणि पुन्हा फळी बंद करून घेतली. आंत अंधार होता म्हणून एक बारकी मिणमिणी लावली. त्या अपुऱ्या उजेडांत जगूची आकृति नामाला दांडगी वाटूं लागली. त्या विचित्र शांत वेळीं आपल्या काळजाचे ठोके त्याचे त्यालाच मोठ्यानं ऐकूं येऊं लागले.

जगू काय विलक्षण सांगतो याकडं त्याचं चित्त लागलं होतं. पण कांहीं वेळ जगू तसाच घाबरट चेहरा करून चितागती बघून राहिला. मग तो हलक्या आवाजांत म्हणाला,

"नामाजी, तुम्ही अदुगर राम, राम असं पांच येळा म्हणा बरं."

"कां बरं ? काय गोंधळ हाय ?"

"अहो, फार मोठं संकट आल्यां. पर तुमी अदुगर रामाचं नांव घ्या बगूं."

"रामाचं नांव घेतों. पर कशापायीं हें तर अदुगर सांगा."

"अदुगर मी सांगितलं तसं झटपट करा बरं."

गोंधळून गेलेल्या नामानं पांच वेळां रामाचं नांव घेतलं. मग एक मोठा सुस्कारा सोडून जगू म्हणाला,

"अस्सं. आतां काय घोर न्हाई फार."

जगूनं आणखी जवळ सरकून त्याच्या मांडीवर हात ठेवला.

"नामाजी, आतां मी जी गोष्ट सांगणार आहें ती नीट शांतपणें ऐकून घ्यायची. काळीज घट् करून ऐकायची." नामानं मान हलवली. त्याचं काळीज मात्मुट् होऊं लागलं.

"मनावर परिणाम करून घ्यायाचा न्हाई. काय ?"

"न्हाई."

तरी जगू पुन्हां गंभीर चेहऱ्यानं गप्पच राहिला. नामानं अस्वस्थ होऊन विचारलं,

"बोला कीं, काय हाय तें सांगा तरी की."

"काय सांगूं आन् कसं सांगूं ?...माझी तर काय जीभच रेटत न्हाई."

तो काय सांगतो याकडं नामाचा जीव गोळा झाला. जगूनं खांकरून अवसान आणल्यागत केलं आणि म्हटलं,

"तुमची ती बाई—"

"तिचं काय !"

"तुमच्या काय ध्यानांत आलंय का ?"

"काय ?"

"आपल्या माणसांतली न्हाई ती."

"कशी असंल ? अवं परकीच हाय की ती."

"तसं न्हाई. ती बाई—बाई न्हाईच !"

"म्हंजे ?"

"तुमी तिच्याशीं लगीन करनार, ती कोण आहे म्हाइती आहे का ?"

नामानं धडधडत्या छातीवर हात ठेवून विचारलं,

"कोन हाय ?"

"ह...ड...ळ"

"ऑं ?" नामाचं काळीज लकूदिशीं हललंच.

त्याच्या हातापायाला घाम फुटला. कांहीं सुचेना झालं. तोंडाची भीतीनं बोबडी वळली.

क्षणभरानं जगू म्हणाला,

"तुमचं नशीब दांडगं म्हणून येळेवर कळून चुकली ही गोष्ट. न्हाईंतर एकदां का तिच्याशीं लगीन झालं असतं तुमचं, कीं मग कांहीं तुम्ही तिच्या तावडीतनं सुटला नसता. जलमभर हडळीशीं संसार करावा लागला असता. उद्यां चारदोन पोरंबाळंहि झालीं असतीं. अन् मग कायम तुम्ही हडळीच्या वंशाचं धनी होऊन राहिला असता."

नामा बधिर झाल्यागत पहात राहिला. मग थोड्या वेळानं, खोल गेलेल्या आवाजांत त्यानं विचारलं,

"अवं, इकती चांगली बाई आन् हडळ निघाली तरी कशी ?"

आणि मग जगूनं त्याला सगळी हकीकत नीट सांगितली..."काल तिन्हीसांचेला तुमच्या घरीं कामानिमित्त गेलों होतों. ही बाई आणि मी बोलत होतों. एवढ्यांत माझा एक लांबचा पाव्हणा मला तिथं नेमका बोलवायला आला. पाव्हणा चांगला मांत्रिक आहे. तो आंत आला, तशी ही बाई कावरीबावरी झाली आणि झटक्यांत उठून आंत पळाली. दार लावून दडून बसली. माझ्या पाव्हण्यानं तिला पाहिली आणि मला एकाएकीं उठवीत म्हणाला,

"उठ उठ जगभाऊ, आधीं भायेर नीघ."

मी म्हटलं, "अरं पर एवढी गडबड कां ?"

"तूं अदुगर नीघ इथनं. मग भायेर सांगतो. चल उठ."

माझ्या दंडाला धरून त्यानं भराभरा मला बाहेर लांब आणलं आणि सांगितलं, "गड्या, पुन्हां त्या घराकडं फिरकूं नगंस. घरांत पाऊलसुदीक टाकूं नगंस. ती बाई न्हाई. हडळ आहे हडळ !"

माझ्या अंगावर सरसरून कांटाच आला. त्यानं नेमकी तिला ओळखली होती आणि त्या मांत्रिकाला बघून ती हडळ घाबरून आंत पळाली होती बघा.

मग मी त्याला म्हणलं,

"अरं हिनं तर आमच्या मैतरालाच धरलंय. तूं हिचा बंदोबस्त केला पायजेस आन् आमच्या नामाला सोडवला पायजेस."

पाव्हणा सच्चा स्वभावानं. तो सरळ म्हणला, "ही हडळ फार बनेल आन् चांगली जुनी दिसतीय. हिच्यावर माझा मंत्र चालणार न्हाई. आन्

मी भुताखेतांचा मांत्रिक, हडळीचा न्हाई."

"मग आतां रं? कसं करायचं?" मी विचारलं.

तसं त्यानं उत्तर दिलं,

"घाबरूं नगा. तुमच्या त्या नामाला म्हणावं, गांवांतलं घर तावडतोब सोड. हडळीनं भारलंय. चारदोन महिनं घराकडं अजाबात फिरकूंच नगंस. शेतांतल्या वस्तीवरच जाऊन रहा. तोंवर मी करतों हिचा बंदोबस्त. मोठा मांत्रिक आहे माझा गुरू. त्याला पाठवतो आणि दावतो हिला चांगला हिसका."

पाव्हणा गेला आन् रातभार माझ्या डोळ्याला डोळा न्हाई लागला राव तुमच्या काळजीनं. रातींच तुमाला गांठून हें सांगावं म्हनलं तर तंवर तुमी रानातनं परत येऊन घरांत गेलेलं. म्हणलं, जावं घरांत आन् काढावं तुम्हांला भायेर. मग वाटलं अशानं दोघंहि जाऊं दानाला. तसं नगं. म्हणून आतां वाटेवर उभं राहून गाठलं तुमाला..."

नामा कंबरडं मोडल्यागत बसला होता. त्याच्या मनांत फार खळबळ माजली होती. शून्य नजरेनं पहात तो पुटपुटला,

"इकती वर्सं बिनबायकोचा राह्यलों. कांहीं झालं न्हाई. ही बया भेटली. लगीन करूं म्हनली...वाटलं, इकतं थांबल्यासारखं फळ चांगलं मिळालं...पर असा काय चुथडा हुईल...माझ्या सपनांत सुद्धां न्हाई."

जगूनं त्याच्या पाठीवर हात ठेवला, त्याला जरा शांत केला. आणि तो आपलं मत सांगूं लागला,

"बाईनं हुषारी केली आन् तुम्ही नेमकं तिच्या जाळ्यांत अडकला बघा, नामाजी. संसार करण्याची वासना राह्यलेली कुणी तरी बाई ही हडळ होऊन राह्यली. आन् तुमी मोकळं बघून तिनं नेमकं तुमाला धरलं...बाईला आणली त्या रातीं अमुशाच होती न्हाई का?"

नामानं आठवून पाहिलं. पण त्याला आठवण येईना.

"माझ्या कांहीं ध्यानांत न्हाई. असंल कदाचित् अमुशाच."

"अमुशाच होती. माझ्या ध्यानांत सगळा परकार आलाय."

मग जगूनं शंका मांडल्या. आडरानांत तशा वेळेला चांगली धारिष्टवान् बाई तरी जाईल का? बाई दिवसभर वेडीवाकडी, रानारस्त्यानं पळत होती, तर बरीं आगल्यावर तिचा अवतार दिसला कां? अंगावर धुळा, केंस, कपडे विस्कटलेले दिसले कां? आणि मुख्य म्हणजे इतके दिवस ही अशी घोडनवरी राहील कशी?

त्याच्या खुलासेवार बोलण्यानं तर आतां नामाची पुरीच खात्री झाली. आपल्याला हडळीनं इतके दिवस धरलं होतं, ह्या जाणिवेनं तर तो फार घाबरून गेला.

त्याची घाबरट अवस्था बघून जगू आणखी म्हणाली,

"काळा ओढ्याचा तो ठिकाणा—दर अमुशाला हडळी निघतात. तरी बरं तुम्ही मध्यानरातीच्या अदुगर आलांत ओढ्यातनं. बाराच्या पुढं तर तिथं हडळींचा धिंगाणा चालतो म्हणं नुसता."

नामाला फेंसकूट यायचंच तेवढं बाकी राहिलं.

त्याचं तोंड पार सुकलं. गडी थोड्या वेळांतच पार उतरून गेला होता. "जगभाऊ, आतां कसं करूं? माझ्या बोकांडीं बसलेली ही हडळ कशी निघायची?"

"असं हातपाय गाळून कसं भागंल? मांत्रिक आणून मी करतों सगळी खटपट. तुम्ही आतां असं करा—"

"कसं करूं?"

"आतां हितनं निघा आन् येट तावशी–मारापूर हें गांव गांठा. तिथल्या देवीच्या देवळांत जायाचं. पायावर डोकं ठिवायचं. देवीचा अंगारा कपाळाला लावायचा. जावला एकदीड दिवस, परत यावला एकदीड दिवस. कुठं काय बोलायचं न्हाई. गपचिप जायाचं, गपचिप यायचं."

"अंगाऱ्यानं उपेग हुईल का?" नामानं गरीबागत विचारलं.

"तर वं! अंगारा फार गुणकारी आहे. त्यानं हडळीची बाधा जाती. मग हडळ न्हाई हडळीची सासू आली तरी काय अपकार होणार न्हाई. ...माझ्यासाठीं पर थोडा अंगारा आणा."

जगूच्या ह्या समजावणीनं नामाला थोडा धीर आला. दोघंहि मोटरतळावर आले. नामाला मोटारींत बसवून जगूनं त्याची पाठवणी केली. आणि आपला डाव नीटनेटका जमल्याचा आनंद त्याला झाला.

*आमचें राज्य!.... आमचा राज्यकारभार!.... :५:*

**बंगालचें 'गौडबंगाल!'**



दीपावलीनिमित्त आमच्या रजतरम्यप्रसंगीं असंख्य ग्राहकांचें आणि हितचिंतकांचें शुभचिंतन!




फो. नं. २८३५७

गेलीं २५ वर्षें

सातत्यानें, सचोटीनें आणि निरलसपणानें

वृत्तपत्रें, मासिकें, पुस्तक-प्रकाशन आणि प्रसिद्धि-वितरण संस्था इ.

अनेकविध व्यावसायिकांची सेवा करणारी अग्रगण्य संस्था!

**शंकर आणि कंपनी**

**प्रभात प्रोसेस स्टूडिओ**

धोबीवाडी, ठाकुरद्वार, मुंबई २

मोटार लांब जाऊन दिसेनाशी होईतों तो तिथंच उभा राहिला. आणि नंतर अधांतरीं चालल्यागत खुषींत दुकानाकडं परत गेला. दुपारपर्यंत त्यानं कसंतरी काम उरकलं आणि लाट साधण्यापूर्वी जरा अंदाज घ्यावा म्हणून तो त्या बाईकडं आला.

बाईनं त्याचं हंसून आगत केलं. त्याला तो शकुन वाटला. मग तो तिथं थोडा वेळ रेंगाळला. गप्पा मारल्या आणि अखेरीस तो खाजगींत म्हणाला,

"आज बहुतेक तुमच्या मालकांचा मुक्काम रानांतच होणार वरं का रातीं."

"असं का ? निरोप आलाय काय ?"

"ते शेतांत जातांनाच सकाळीं माझी गांठ पडली. त्यावेळीं मला सांगून गेलेत कीं, शेतांत कामाचा रगाडा फार आहे. फार रात झाली तर गावांत येणार न्हाई. तरी तूं वैनींच्या सोबतीला जा. वाड्यांत शेजार-पाजार कुणी न्हाई."

यावर बाई काय म्हणते यासाठीं तो उत्सुकतेनं पाहूं लागला.

"बरं झालं बाई. न्हाईतर मला एकटीला फार भ्या वाटली असती. दुसरं कुणी माणूस ना काणूस हितं. भावजी, न इसरतां या बरं का माझ्या सोबतीला. न्हाईतर एकली मरीन मी भीतीनं."

"यीन की. इसरतो कसा ?"

असं म्हणून जगू निघाला. खुषींत शीळ घालीत जाऊं लागला. त्यानं खडा टाकून पाहिला होता आणि 'या' असं उत्तर आलं होतं. त्या बाई-बद्दलचे त्याचे ठोकताळे आतांपर्यंत नेमके जमले होते.

—आतां बाईचा लाट साधणं मुळींच अवघड नव्हतं. अर्थात् ती वेळहि लांब नव्हती.

जगू कासारानं रात्रीं दारावर थाप दिली, तेव्हां त्या बाईनं कडी काढली. दाराला पुन्हां आंतून कडी लावून दोघंहि घरांत आलीं. जगूनं आज फारच थाट केला होता. चांगलेचुंगले कपडे तो ल्यायला होता. अत्तराचा घम-घमाट सुटला होता. बाईसाठीं आणलेली फुलांची वेणी तो हातीं खेळवीत होता.

बाईचं जेवणखाण होईतों त्यानं समोर भिंतीला बसून गप्पा मारल्या. जेवण उरकून तिनं आवरासावर केली. जगूला पाणी प्यायला दिलं. पानाचा विडाहि करून दिला. त्यानं दिलेली वेणी खूष होऊन घेतली आणि अंबाड्यावर माळली. तशी ती आणखीच देखणी दिसूं लागली. जगूला वेडं करूं लागली.

रात्र होऊन गांव झोपीं गेलं. जगू जांभई काढीत म्हणाला,

"आतां काय नामाजी यायचं चिन्ह दिसत न्हाई बरं का."

"इकल्या उशीरा ते कुठलं येत्यात ?"

"चला, झोपावं आतां. फार रात झाली. कसं ?"

बाई हंसली आणि म्हणाली, "झोपूंया कीं."

मग तिनं अंथरुणं झटकून नीट घातली. उशीवाकळ नीट ठेवली. जगू अंथरुणावर पडला. उजेडाचा दिवा जवळ होता, तो तिनं उचलला आणि लांबच्या कोनाड्यांत नेऊन ठेवला. सगळ्या खोलीभर मंद उजेड पसरला.

ती हुश्श करुन आपल्या अंथरुणावर येऊन बसली आणि म्हणाली,

"दमले ग बया."

बोलतां बोलतां ती अंथरुणावर आडवी झाली. जगूनं तिच्या अंगावर हात टाकला. तिला किंचित् जवळ ओढली आणि तिच्याशीं तो गुलुगुलु बोलूं लागला. तिला कुरवाळूं लागला.

बाई खुषींत हंसली. तीहि त्याच्याशीं लाडेलाडे बोलूं लागली.

मग दूर कोनाड्यांत ठेवलेल्या दिव्याकडं पहात, बोगन्या आवाजांत तो म्हणाला,

"तेवढा तो दिवा विझव कीं."

यावर ती मोहक बाई पुन्हां मजेशीर हंसली आणि म्हणाली,

"दिवा विझवायचा ?...बरं. विझवते."

...जगू कासारानं तिच्या अंगावरचा हात काढला. आणि ती दिवा विझवून अंधार केव्हां करते यासाठीं अधाशासारखा तिच्या हालचाली-कडं पाहूं लागला. मग पडल्यापडल्याच त्या सुंदर बाईनं आपला हात दिव्याकडं केला आणि पसरला.

एवढा पसरला कीं बघतां बघतां तो हात दहापट लांब झाला. थेट दिव्यापर्यंत जाऊन पोंचला.

मग एका क्षणांतच गुडुप अंधार झाला आणि त्या अंधारांतून जगू कासाराच्या किंकाळ्या आणि त्या सुंदर बाईचं हंसणं यांचा एकच धिंगाणा ऐकूं येत राहिला.

• • •


Dipawali
या शुभ प्रसंगी
अल्प बचत योजनेची आठवण ठेवा
आणि
आपल्या कुटुंबाच्या उज्ज्वल भविष्याबद्दल
निःश्चिंत रहा.
आपल्या भेटीच्या वस्तूंत समावेश करा—
POST OFFICE
GIFT COUPON
FIVE RUPEES
५ रु., १० रु., ५० रु., १०० रु. व १००० रुपये
किंमतीची पोस्ट ऑफिस भेट कुपनें मिळूं शकतात. अधिक
माहितीसाठी नजिकच्या पोस्ट ऑफिसांत चौकशी करा.
DIRECPUB



# वेणू

**विभावरी शिरूरकर**

*कुठलें हें ध्यान घरांत आणलें असें मला झालें होतें. पण त्या अजागळ चेहऱ्याखालीं असं कांहीं धगधगत असेल याची मुळींच कल्पना मला आली नाहीं !....*

एक पिशवी हातांत घेऊन वेणू रात्रीं नऊ वाजतां अचानक माझ्याकडे पहिल्यांदा आली.

"एवढंच सामान ?" मी विचारलं.

"हो." म्हणून ती भिंतीशीं टेकून माझ्याकडे पहात उभी राहिली.

"जेवण व्हायचंय ना तुझं ?"

"नाहीं. उपास आहे मला." वेणू हळू आवाजांत म्हणाली. कातरपणें उगीचच ती हंसत होती.

वेणूला पाहून ती माझ्या घरांत कितपत सामावेल याचा मी अंदाज घेत होतें. तिला घरांत नेऊन तिची निजायची खोली मी तिला दाखवली. मनाची मळमळ काढीत मी तिला म्हटलं, "तुला जाडसं अंथरायला नि पांघरायला आण म्हणून निरोप कळला होता ना माझा ?"

"हो. पण मला संवय आहे सतरंजीवर निजायची. पांघरायलासुद्धां मला फारसं लागत नाहीं." ती संकोचलेल्या आवाजांत म्हणाली.

"मातीच्या जमिनीवर भागतं नुसत्या सतरंजीनं. पण फरशीवर अंग धरतं म्हणून मुद्दाम मी कळवलं होतं."

वेणू नुसती हंसली. मी कांहीशा बेदरकारपणें म्हटलं, "बरं. इथें नीज. उद्यां सांगेन काय करायचं तें."

मी उगीचच इकडून तिकडे हिंडत राहिलें. ज्या येतात त्या अशा अर्ध्या फाटक्याच कशा येतात ? माझ्या मनांत विचार आला. अंथरायला सतरंजी. पांघरायला एक लुगडं, नाहीं तर घोंगडी. एक लुगडं नि चोळी कीं झाली तयारी दुसरीकडे जायची. मग फरशीवर अंग धरेल म्हणून आपणच एकादी पातळशी गादी द्यायची. गादी म्हटली कीं तिच्यावर





अनुक्रमणिका

अंथरायली जुनेर द्यायचं. मग कडाक्याची थंडी पडली म्हणजे खोकला पडसं होतंच. पोलक्यानें थंडी निभत नाहीं. म्हणून जुना गरम स्वेटर द्यायचा. हा आज कितीक वर्षांचा क्रम झाला आहे. आतां पुनः हिची तयारी! या विचारानें मी तिच्या लुगड्याकडे पाहिलं. तेंही पांढऱ्या दोऱ्याच्या दोन टचाचलेल्या शिवणींनीं आपलं आयुष्य संपत आल्याचं सांगत होतं.

मी माझ्या अंथरुणावर येऊन पडलें. नवी मोलकरीण मिळायची, ती आपल्या सरावाची व्हायची, नवी स्वयंपाकाची बाई मिळायची, ती आपल्या सरावाची व्हायची म्हणजे आधीं नि नंतर किती तरी दिवस मनाला ग्रहण लागलेलं असतं. पडल्या पडल्या वेणूबद्दलचा माझा पहिला ग्रह मी उजळून पहात होतें. मनांत अनेक निश्चय करीत होतें. नियम नंबर एक : वेणूच्या घरची कोणतीही चवकशी करायची नाहीं. नियम नंबर दोन : वेणूशीं अगदीं कामापुरतंच बोलायचं. नियम नंबर तीन : वेणूला विनाकारण माझ्याशीं बोलायला उत्तेजन द्यायचं नाहीं. मागील चुका लक्षांत घेऊन मी अनेक निश्चय मनाशीं केले. नोकर व आपण यांत पुरेसं अंतर राखतां न आल्यानें नोकर नेहमींच माझ्या डोक्यावर बसत. सगळ्याच बाबतींत बरोबरीनं वागायला लागत. जें माणूस कामाला येई त्याची परिस्थिति वाईट म्हणूनच येई. त्या परिस्थितीनें माझं मन विरघळलं कीं माझ्या वागण्याचा तोल जाई आणि नोकर नोकरी करण्यापेक्षां स्वारस्याकडेच जास्त बघायला लागत.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठतांच सारे निश्चय घोकीत मी वेणूला घरांतील कोणती वस्तु कोठें आहे, तिनें काय काम करायचं आहे, स्वयंपाक कसा लागतो, स्वच्छता कशी हवी, इत्यादि अनेक गोष्टी अधिकारवाणीनें एकाच वेळीं सांगून टाकल्या. वेणू कामाला लागली. मी मधून मधून बघत होतें.

वेणू प्रत्येक वस्तूकडे अशी पाही कीं त्या वस्तूसारखी वस्तु तिनें पूर्वी कधींच पाहिली नसावी. रिकामा वेळ असला कीं वेणू वस्तू न्याहाळीत बसे. मुंबईच्या रस्त्यावरून हिंडतांना खेडुताची अवस्था होते, तशी वेणूची होत होती. कपबशी, तिच्यावरची नक्षी, जेवणाचं टेबल, त्यावरचं प्लास्टिकचं कापड, फुलदाणी, जेवणाचीं भांडीं, पाणी पिण्याचीं भांडीं, शेगड्या, विजेची शेगडी, स्टोव्ह, माणसांचा सपाता घालून स्वयंपाकघरांतला वावर, माणसांचे कपडे, मुलांचे कपडे—सारंच तिला नव्यानं दिसत असावं. तिचा खेडुतपणा तिच्या नजरेंतही दिसत होता. अशी वेणू घरांतील वस्तूंचा उपयोग करून स्वयंपाक करून वाढणार! या विचारानें माझं मन खचून गेलं होतं.

माझे शब्दसुद्धां वेणूला पूर्वी कधीं न ऐकल्यासारखे वाटत असावे! मी बोलायला लागलें कीं अर्धवट उघडल्या तोंडानें वेणू उभी राहून ऐकूं लागे. गाणं ऐकतांना जाणकार नकळत ताल देत रहातो, तसा दुसऱ्याचं बोलणं ऐकतांना वेणू मानेनें ताल धरी. एखाद्याचं भाषण पसंत पडल्यावर किंवा एकरूप होऊन ऐकत असतांना ऐकणाराच्या माना उभ्या आडव्या हलायला लागतात, तसं साधंसुधं बोलणं ऐकतांनाही वेणूचं होई. ती तिच्या पसंतीचीशी मानेची हालचाल पाहून मी तर पहिल्यांदा चकितच झालें. आणि पहातच राहिलें. पुढें मला असंही दिसलं कीं रागानें जरी मी तिला बोललें तरी ती पसंतीच्याच माना हलवीत राही. शहरी शब्द इतके अपरिचित होते, म्हणून तर हें नसेल? तिच्या वेंधळेपणानें मला राग येई.

आठच दिवसांतली गोष्ट. मोठ्या कौतुकानें वेणूला चहा आणायला सांगून मी एका बड्या बाईशीं गप्पा मारायला बसलें. वेणू चहा घेऊन आली. चहा ट्रेमधून आणला होता. मी उभी राहून ट्रे माझ्या हातीं घेत नजर टाकली. कपबशांचा अक्षरशः विजातीय विवाह झाल्यामुळेंच जणुं काय ट्रेभर चहाची रडारड झाली होती. बशीला केस लोंबत होता. माझी अब्रू अक्षरशः केसानें टांगली गेली होती. पाहुण्या बाईनीं "मी चहा घेत नाहीं हो." असं म्हटलं.

धडधडल्या अब्रूनें मी पण म्हटलं, "अगबाई हो का?" आणि वरच्या वरच धरलेला चहाचा ट्रे तसाच वेणूच्या हातांत देऊन तिला परत जायला सांगितलं. ती नव्या बाईच्या जामानिम्याकडे वेंधळेपणानें पहातच होती. 'जा' असं कांहींसं निर्धारानें मी म्हटलं. त्या बाई गेल्या. माझा राग उतूं आला. मी बोलायला लागलें तसतशी वेणूची मान पसंतीचा ताल देत हलूं लागली. मी कपाळावर हात मारला नि ओसरीवर येऊन बसलें. कुठलं ध्यान आणलं मी कुणाला माहीत!

माझ्या मैत्रिणींना वेणूच्या नकलेनें हंसून हंसून लोळायची पाळी आली. "अग पण अशा बावळट बायकाच टिकून राहतात. चलाख बाई दोन महिन्यांत चलाखी दाखवायला लागते. त्यापेक्षां तूं हेंच रत्न संभाळून घे. जरा वेळ लागेल तिला शहरी राहणी कळायला." मैत्रिणींनीं मला सल्ला दिला. पण प्रीतिविवाहांतसुद्धां एकमेकांच्या वागण्यांतल्या खांचाखोचा नव्यानें कळण्यामुळें प्रीतीचं शंभर नंबरी सोनं पहिल्या वर्षी सत्त्याण्णव नंबरी होण्याचा संभव असतो. मग माझ्या मनांत वेणूचा भाव मुळांतच पितळेचा होता, तो खापराचा व्हायला कितीसा वेळ लागणार होता! पण आल्या दिवसापासून माझ्या मुलांकडे ती अशा कांहीं मायेनें ओढली गेली कीं मी चकितच झालें. मुलांनाही वेणूताईवांचून क्षणभर चैन पडेनासं झालं. मुलांत आणि वेणूंत हा जो नाजूक धागा आपोआप उत्पन्न झाला, त्यानें वेणूची किंमत माझ्या लेखीं वाढलीच.

ट्रेमधून चहा कसा द्यावा हें तिला सांगितल्यावर एक दिवस मी तिला "किती वाजले?" म्हणून विचारलं. सकाळचा दहाचा सुमार असावा. तिनें घड्याळांत पाहून येऊन मला म्हटलं, "आठ वाजले." मी बघतच राहिलें. ही माझी थट्टा तर करीत नाहीं? छेः! ती अगदीं गंभीरपणें आठ वाजल्याचं सांगत होती. पण तिचा आवाज कांपत होता. तेव्हां मला पहिल्यांदा कळलं कीं हिला घड्याळसुद्धां कळत नाहीं. वेणूला लिहितांवाचतांही येत नव्हतं. या काळांत, या वयाची नि या जातीची अशी वेंधळी बाई असूं शकते, यावर माझा विश्वास बसेना.

"तुझा नवरा काय करतो?" "तो किती शिकला आहे?" प्रश्न माझ्या ओंठावर तरंगायला लागले. पण मी विचारलं नाहीं. विचारायचं नाहीं असा मी निश्चय केला होता!

वेणूचं म्हणजे गोठ्यांतली गाय दिवाणखान्यांत बांधावी तसं झालं होतं. तिचा दोष नाहीं हें मला उमगत होतं. पण माझ्या मुलांवरच्या तिच्या अकृत्रिम मायेनें वेणू माझ्या घरीं टिकली. ती बोलणीं खाई. बोलणीं ऐकतांना पसंतीनें मानेचा ताल धरी. मला कींव येई. सहानुभूतीचे शब्द बोलायचे नाहींत असं मी ठरवलं होतं, तरी माझा आवाज मृदु होई. वेणू चुके; पण मनापासून सुधारण्याचा प्रयत्न करीत होती. मग दगडाला आकार यायला लागला. महिना झाला. तिचा पगार मी द्यायला लागलें. पंचवीस रुपये पाहून तिला आनंद झाला. ती खुदकन् हंसली.

"मला नको पगार." ती कशी तरी बोलून गेली.

"पगार नको? म्हणजे?" मी आश्चर्यानें विचारलं.

"यांच्या नांवानं पाठवा." ती म्हणाली.

तिच्या नवऱ्याला मनीऑर्डर करायची म्हणून मी तिला त्याचं नांव विचारलं. तें हंसून लाजून तिनें कसंबसं सांगितलं. पण तिला नवऱ्याचा पत्ता कांहीं धड सांगतां येत नव्हता. अखेरीस ज्या बाईच्या मध्यस्थीनें ती माझ्याकडे आली, त्यांच्याकडून पत्ता आणवून मी तिच्या नवऱ्याकडे तिचा पहिला पगार पाठवला.

माझ्या पोस्टाच्या पेटींतून मी पत्रें काढून घेई. तेव्हां वेणू आपल्या तोंडाची पेटी उघडून माझ्याकडे पहात राही. वेणूला कुणाचं पत्र येणार असेल का ? नवऱ्याचं ? तिला घरीं कोण कोण माणसं आहेत ? तिला घरीं कांहीं लिहावंसं वाटत असेल का ? माझ्या मनांत विचार येत. पण तिनें मला कधींच कांहीं विचारलं नाहीं आणि सांगितलंही नाहीं. कांहीं दिवसांनंतर पेटींत पत्रं आलीं कीं काय हें ती स्वतः कांचेंतून उत्कंठेनें हळूच पहात असल्याचं मला आढळलं. रोजच ती पत्राची वाट पहात पेटीकडे नि माझ्या हातांतील पत्राकडे उत्कंठेनें पाहते असं माझ्या लक्षांत आलं.

नवऱ्याला पाठवलेल्या मनीआर्डरची पोंच म्हणून मनीऑर्डरचाच भाग नवऱ्याची सही होऊन आला. ती सही सराईत लिहिणाराची नव्हती. वेणूसारिखाच वेणूचा नवरा असावा, मी तर्क केला.

"ही तुझ्या नवऱ्याकडून पोंच आली आहे" तिच्यापुढें ती पावती टाकीत मी म्हटलं. आणि मधून माझें काम करीत तिच्याकडे अर्धी नजर लावून तिच्या प्रतिक्रिया मी पहात होतें. तिनें कितीदां तरी माझ्याकडे पाहिलं. कितीदां तरी ती पोंच उलटीपालटी करुन पाहिली. तिच्यासाटीं कांहीं मजकूर आहे का ही उत्कंठा पुनः पुनः तिला डिवचीत होती. मोठ्या धीरानें तिनें विचारलं, "काय लिहिलंय त्यांनीं ?" मी बाह्यतः बेदरकारपणें, पण नीट न्याहाळीत तिला म्हटलं, "ती छापील पोंच आहे.



त्यावर पैसे पोहोंचल्याची सही आहे. मजकूर नाहीं कांहीं."

त्या दिवसानंतर दोन तीन दिवस वेणू खूप अस्वस्थ होती. खिन्न होती. रात्रीं बिछान्यांत पडल्या पडल्या तिच्या नाकाचं सूं सूं ही ऐकू येत होतें. मला वाईट वाटलं. पण मी नियमांनीं बांधून घेतलं होतं. जे कित्येक वर्षांत मला जमलं नव्हतं, तें करण्याचा आटापिट करतांना माझ्याच डोळ्यांना पाणी आलं. वेणू ज्या बाईच्या मध्यस्थीनें आली होती त्या मला रस्त्यांत भेटल्या. त्यांनीं वेणूची विचारपूस केली.

मी म्हटलं, "बाई प्रामाणिक आहे. कष्टाळू आहे. मुलांचं भारी मायेनें करते. पण फार अडाणी आहे."

त्यावर बाई म्हणाल्या, "खेड्यांतली आहे, शहरांतली राहणी माहीत नसते. आतां तुम्हीच संभाळून घेतली तर भाकरी तरी खाईल पोटभर. नाहीं तर कोण विचारतंय हो तिला !'

"नवरा काय करतो हो हिचा ?"

"धाड भरली त्या नवऱ्याला. अहो, बाहेरचा नाद असलेला माणूस. त्याच्याशीं लग्न करून दिलं हिचं. तो का हिला संभाळणार आहे? त्यानं लावली आहे मोलकरणीशीं गट्टी. काय सांगायचं बाई. आन् हिला तो टोचून टोचून बाहेर स्वयंपाकाला पाठवतो आन् तिच्या पगारांत तीं दोघं खातात. शेती होती ती विकून टाकली."

"मग ही वेडी त्याला पैसे कशाला पाठवते ?"

"तेंच तर."

महिना पुरा झाल्यावर मी वेणूला म्हटलं, "वेणू, मला सगळं कळलं. जो नवरा दुसऱ्या बाईला घरीं ठेवून तुझ्या पगारावर खात बसतो, त्याला दमडीसुद्धां पाठवूं नको. मी तुझे पैसे पोष्टांत टाकणार आहें. म्हातारपणीं कांहीं हवं का नको जवळ ?"

वेणू खुदकन् हंसली. "बरं" म्हणाली. पण दुसऱ्या दिवशीं हळूच म्हणाली, "त्यांनाच पाठवा पैसे. पोस्टांत नको."

"वेडी आहेस कीं काय तरी."

तिला बोलायचं सुचेना. अखेर ती म्हणाली,

"नाहीं. पण पैशांसाटीं कां होईना मला विचारतात ना कधीं तरी."

"एवढं विचारणं पुरे तुला ?"

"असतात अशीं कांहीं माणसं. त्यांना वाटेलच कधीं तरी माझ्याबद्दल. सगळ्यांनीं हांकललयावर घर तर हवं ना ?"

"पण याच घरानं पहिल्यांदा हांकललंय तुला."

"पण पैसे देऊन कष्ट देऊन कां होईना. आपलं हक्काचं घर तेंच आहे. अशी आपली माझी भावना आहे हो." ती हंसत तुटक तुटक शब्दांत हळूच म्हणाली.

वेणू हंसली. ती वडगळ होती ? कीं तिनें सारं विष पचवून टाकलं होतं ? तिच्या सांगण्यावरुन मी पुनः तिच्या नवऱ्याला पैसे पाठवले.

आणखी कांहीं दिवस गेले. हे म्हणाले, "वेणूचं पुनः पत्र आलंय मुलांबद्दल." यांच्या तोंडचे शब्द ऐकतांच वाढतां वाढतां वेणू तेजाळलेल्या नजरेनें उत्कंठेनें थबकून राहिली. मी म्हटलं, "तुझें पत्र नाहीं. माझ्या जावेचें नांव वेणूच आहे." खजील झाल्यासारखी वेणू पुनः वाढायला लागली. हे पत्र वाचायला लागले. पण वेणू घोटाळत ऐकतच होती :

ती. दादांस,

तुमची बदली पुनः झाल्याचं कळलं. मी आज तुम्हांला एक कल्पना सुचवीत आहें. जाऊबाईंनाही पसंत पडली तर आम्हां उभयतांना आनंद

होईल. माझ्या मोठ्या मुलांत व धाकट्या मुलींत पांच वर्षांचं अंतर असल्यानें दोन मुलं घरांत असून दोघांनाही बरोबरीची सोबत नाहीं. तुमच्याही घरीं तशीच परिस्थिति आहे. माझा व तुमचा मुलगा व दोघांच्या मुली बरोबरीच्या असल्यानें एकमेकांना सोबत चांगली होईल. तरी बदलीच्या गांवीं वारंवार मुलं हालवून पुढेंहि अभ्यासाचं नुकसान होण्यापेक्षां आमच्या घरींच आतांपासून मुलं ठेवलीं तर फार आनंद होईल. यांच्या सांगण्यावरून पत्र लिहिलें आहे. पत्राचें अनुकूल उत्तर लवकर यावें.

तुमची
वेणू

हे मला म्हणाले, "वेणूचा विचार मला एकदम पसंत आहे." मी म्हटलं, "मला नाहीं बाई चैन पडायचं. मुलं जवळ नसलीं तर अगदींच रूक्ष वाटेल. अन् मुलं जर दुसरीकडे ठेवायची तर आईनें काय करायचं?" हे म्हणाले, "आपल्या रूक्षतेकडे पाह्यचं कीं मुलांच्या कल्याणाकडे पाह्यचं?"

शेवटीं जेवणावरच वाटाघाट होऊन तूर्त चारसहा महिने मुलांना पाठवून बघायचं ठरलं. आणि मग दुसरीं बोलणीं निघालीं. जेवणं आटोपल्यावर सहज मी मागच्या दारीं गेलें, तो वेणूचा चेहरा रडून रडून लालबुंद झालेला! मुलं तिला 'रडूं नको' म्हणून केविलवाण्या शब्दांत सांगत होतीं.

"काय झालं वेणू?"

"माई, मुलांना पाठवूं नका." गहिंवरल्या आवाजांत ती म्हणाली.

"कां ग?"

"माझ्या सासूनं असंच माझं मूल नेलं...दोन वर्षांत मला भेटलं नाहीं....मग ओढ ओढ करून भेटायला गेलें तर तें येईचना माझ्याजवळ...माई, दुसऱ्याचीं मुलं तिसरींच संभाळायला नेतात लहानपणीं, तेव्हां मुलं आईबापांपासून तुटतात....आईपासून मुलांची माया तोडणारीं माणसं स्वतःच्या मुलाचं नि स्वतःचं सुख पाहतात. त्या मुलांचं नि त्यांच्याबरोबर त्यांच्या आईचं सुख पहात नाहींत....स्वार्थ आहे सगळीकडे. जन्माच्या कळा दिल्या म्हणून माझं मूल म्हणायचं. एरवीं आई होऊन नि मूल जिवंत असून मला मूल नाहीं, माई. चांगलं नाहीं व्हायचं माझ्यापासून मूल तोडणाराचं."

बांध फुटून पाणी वहात जावं तसे शब्द नि अश्रू वहात होते. त्या अडाणी वेणूकडे मी पहातच राहिलें. त्या दिवसानें मलाही अस्वस्थता आणली. पण लवकरच मीं जावेकडे मुलं पाठवलीं. त्या दिवशीं तर "माई, एवढा ळाही लाभला नाहीं मला." म्हणून वेणूनें अंथरूणच धरलं. ती सारा वेळ रडत होती. माझ्याही अंतःकरणांत विलक्षण कालवाकालव झाली. "अग तीं येतील चार महिन्यांनीं" मी तिची समजूत घातली.

मला वाटलं तेवढ्या दिवशींच संपेल. पण मी जावेकडे मुलं पाठविलीं आणि वेणूच्या वागण्यांत फरक झाला. ती काम न करतां स्वस्थ बसूं लागली. रागरागवूनही काम होईना. तिला कांहीं ऐकूं येतं आहे असंही वाटेना. आणि एक दिवस रात्रीं सगळे काचलेले मायापाश जणुं तिचा गळा दाबीत उठले. आणि किंचाळून वेणू ओरडूं लागली. शिव्या. शिव्या...अभद्र. तिच्या तोंडून कधीं निघण्याची शक्यता नव्हती अशा. वेडाच्या त्या पहिल्या अनावर स्थितींत आम्ही तिला ड्यांनीं इस्पितळांत पोहोंचवून सुस्कारा सोडला. आणि दुसऱ्यांच दिवशीं मीं माझीं मुलं दिराकडून पुनः माघारीं आणलीं.


तुमच्या केसांची अवश्य ती काळजी घेत आहां का ?
केसांना रोज इरॅस्मिक पर्फ्युम्ड् कोकोनट हेअर ऑईल लावून त्यांची नित्य काळजी घेतल्यानें ते भरघोस व चमकदार राहतात. इरॅस्मिक तेल हें शुद्ध खोबरेल तेल असून त्यानें केसांचें पोषण होतें व त्याबरोबरच ते सुव्यवस्थित राखले जातात. गुलाब अथवा चमेली यांपैकी आपल्या आवडीच्या सुगंधाची या तेलाची बाटली आजच वापरून पहा.
इरॅस्मिक
पर्फ्युम्ड् कोकोनट
हेअर आईल
Erasmic
PERFUMED
COCONUT
HAIR OIL
ROSE
शुद्धतेची हमी दिली जाते
अधिक काल ताजें राहतें
ECH. 3-X52 MA



# खलिफा-ए-बगदाद

द. मा. मिरासदार

*प्रजेची काळजी घ्यावी, तिचीं सुखदुःखं जाणून घ्यावी आणि दुःखनिवारणासाठीं प्रयत्न करावा असा विचार खलिफाच्या मनांत आला. पण त्यामुळंच त्याचं सुख हरपलं !....*

एके समयीं बगदाद शहरांत कोणी एक खलिफा राज्य करीत होता. बाप अकालींच मेल्यामुळें हा खलिफा वयानें अगदीं तरुण होता. मिसरूड फुटून त्यास नुकतींच कांहीं वर्षे लोटलीं होतीं. आतां त्याला दाढीहि फुटूं लागली होती आणि ती राखावी किंवा कसें, यासंबंधीं त्याच्या मनांत घालमेल चालू होती. आपल्या पूर्वजांच्या परंपरेस अनुसरून या तरुण खलिफाचा बहुतेक वेळ ख्यालीखुशालींत जात असे. सकाळ-संध्याकाळ शराब प्यावी, तार्तार सुंदरींच्या सहवासांत नाचगाण्यांची बहार उडवून द्यावी आणि गावागिरद्यांवर लोळत धुंद डोळ्यांनीं गप्पा छाटाव्या, असा त्याचा मोठा मौजेंत दिवस जाई. अगदींच कंटाळा आल्यास शिकारीसाठीं जंगलांत जावें, कधीं काझीकडून जुनीं गंमतीगंमतींचीं पुस्तकें वाचून घ्यावींत, तर कधीं गोष्टी ऐकाव्यात, असा हा कार्यक्रम अनेक दिवस बिनबोभाट सुरू होता. खलिफाचा दिनक्रम एकंदरींत मोठ्या सुखानें चालला होता आणि तो पूर्णपणें समाधानी होता.



पण हें सुख एके दिवशीं अकस्मात हरपलें.

एकदां काझीनें त्याला असें वाचून दाखविलें कीं, आपले थोर पूर्वज सद्धर्मपालक हरून अल् रशीद हे फार हुशार गृहस्थ होते. रयतेच्या सुखदुःखांची त्यांस अतोनात काळजी असे. त्यासाठीं ते वेषांतर करून बगदाद शहरांत फेरफटका करीत. आणि आपली रयत सुखी आहे कीं नाहीं याची पाहणी करीत. त्यामुळें लोकांच्या अडीअडचणी त्यांना कळून येऊन त्या निवारण करण्याचे उपायहि सुचत. लोक त्यांना अतिशय दुवा देत. आज त्यांचें नांव लोकांच्या तोंडीं आहे, याचें कारणहि हेंच होय.

काझीनें ग्रंथांतील ही व अशीच इतर हकीकत वाचून दाखविल्या-पासून खलिफाचें डोकें बिघडलें. त्यास अजिबात चैन पडेनासें झालें. आपणहि वेष पालटून हिंडावें आणि रयतेचीं सुखदुःखें पहावींत, असें त्याच्या मनानें घेतलें. त्यायोगें प्रजेचा आपणास सपाटून दुवा मिळेल आणि आपलें नांव दिगंतरास जाईल, अशी त्यास खात्री वाटूं लागली. मनाचा हा निर्धार पक्का होतांच त्यानें आपला खास विश्वासू नौकर गुलाम मश्रूर यास बोलावणें धाडलें. गुलाम मश्रूरनें कालिफ हरुन अल् रशीद यांस बालपणीं ओझरतें पाहिलें असून, या खलिफाचा आजोबा व बाप यांच्या-कडेच तो लहानाचा मोठा झाला होता. आतां तो फार म्हातारा झाला होता. तरी पण तो मोठा विश्वासू असून खलिफाच्या मागें सांवलीप्रमाणें हिंडण्याचें व्रत त्यानें अद्यापिहि चालवलें होतें. म्हणून या बाबतींत त्याचा सल्ला घेणें हें खलिफास अगदीं जरूर वाटलें.

म्हातारा मश्रूर काठी टेंकीत टेंकीत खलिफाच्या महालांत येऊन दाखल झाला, त्यावेळीं खलिफाचें स्नान नुकतेंच आटोपलें होतें. हमामखान्यांतून येऊन त्यानें पोषाख बदलला होता व पलंगावर बसून तो बदाम, पिस्ते, अक्रोड, इत्यादि फळें खात होता. त्याच्या पलंगावर मिसर देशांतली एक सुंदरी हातांत पंखा घेऊन बसली होती आणि त्यानें खलिफाला वारा घालीत होती. मधून मधून मोहक हास्य करुन त्यास घायाळ करीत होती. दुसरी एक सुंदरी मेजावर ठेवलेली जड सुरई उचलून त्यांतील शराब प्याल्यांत ओतीत होती. इतर कांहीं जणी उगीचच लांब उभ्या होत्या. एकदोघी वाद्यांचे स्वर जुळवीत होत्या. पायांत चाळ बांधून तातार सुंदरींचा एक ताफा डोक्यावर तिरक्या टोप्या घालून नाचाच्या तयारींत मग्न झाला होता. किनखापाचे पडदे असलेल्या प्रवेशद्वारापाशीं काळेकुट्ट खोजे हातांत नागव्या तरवारी घेऊन पहारे करीत होते. जाळीदार खिडक्यांतून मंद वाऱ्याच्या झुळकी सर्वत्र पसरत होत्या आणि सुगंधी फुलाअत्तरांचा खुशबू सगळीकडे दरवळला होता.

मश्रूरनें हें सर्व पाहिलें. पण तिकडे लक्ष न देतां तो मऊ रुजाम्यावरून हळूहळू चालत थेट पलंगाजवळ गेला. खलिफाला वांकूनवांकून कुर्निसात करून म्हणाला,

"सद्धर्मपालक, बंदा हाजीर आहे."

शराबाचा पहिला प्याला झोंकून खलिफानें त्यास बसण्याची खूण केली. मग तो म्हणाला,

"मश्रूर, आज आमच्या डोक्यांत एक नवीनच कल्पना आली आहे. कोणती ओळख पाहूं."

मश्रूरनें दोन्ही कान पकडून वर तोंड केलें. अल्लाची करुणा भाकली.

"तोबा तोबा. हुजूर, आपल्याइतकें डोकें मला असतें तर हा बंदा असा क्षुद्र चाकर कां राहता? आपणच सांगावें सरकार."

"नाहीं ओळखतां येत?"

"नाहीं सरकार. बंदा शरण आहे."

"तर मग ऐक—"

असें म्हणून खलिफानें टाळी वाजवली. बाकीच्या सगळ्यांना खुणेनें तेथून जावयास सांगितलें. त्याबरोबर सगळ्याजणी लगबगीनें तेथून निघून गेल्या.

मग खलिफानें मश्रूरला ग्रंथांत वाचलेली हरुन अल् रशीदची रोम-हर्षक हकीकत सांगितली. त्यायोगें मनांत उठलेले विचार सविस्तर वर्णन करून, आपलाहि तसेंच कांहीं तरी करून दाखविण्याचा बेत आहे असें बोलून दाखविलें. तें ऐकून मश्रूरचा चेहरा फार गंभीर झाला.

"का मश्रूर, बोलत नाहींस?"

"त्याचें असें आहे सरकार—"

असें म्हणून मश्रूर गप्पच राहिला. काय बोलावें हें त्याला नीट कळत नाहींसें त्याच्या तोंडावरून दिसलें. मग थावंढा गिळून तो म्हणाला,

"आपले अब्बाजान आणि पापाजान यांनींहि पूर्वी हीच गोष्ट केली होती, सरकार."

खलिफाला तें ऐकून जास्तच हुषारी आली. त्याचे डोळे लकाकले.

"होय का? फार छान! मग तर मी बेशक जाणार."

"पण सरकार—"

"आतां तुझा पण काय आणखी?"

"नाहीं गेलें तर नाहीं का चालणार!"

"कां बरें?"

"म्हणजे तशी आतां कांहीं जरूर राहिली नाहीं त्याची—"

असें म्हणून मश्रूरनें सरतेशेवटीं आपलें म्हणणें खलिफाला सांगितलें. तोंड वांकडें करून त्यानें सांगितलेल्या गोष्टीचें तात्पर्य इतकेंच होतें कीं, राज्याची एकंदर हालहवाल फारच चांगली असून कसलीहि काळजी करण्याचें सध्यां प्रयोजन नाहीं. रयत अगदीं सुखी आणि समाधानी आहे. सर्वत्र कशी चैनचंगळ आहे. खजिन्यांत पैसा बऱ्यापैकीं आहे. शराबचा सांठाहि लागेल तेवढा आहे आणि परचक्राची भीति तूर्त तरी नाहीं. इतकें सगळें असल्यावर वेष पालटून हिंडण्याची खलिफाला गरजच काय उरली? सद्धर्मपालक हरून अल् रशीद यांच्या वेळची गोष्ट वेगळी होती. त्यावेळीं अन्नाची थोडी टंचाई असून प्रजाहि किंचित डामरट व फाजील होती. त्यावेळचे लोकहि भारी खादाड असत. त्यामुळें नेहमीं दुष्काळ पडत. आतां तसें कांहींहि नाहीं. सर्वत्र आबादी-आबाद असून लोक फारच सद्गुणी झाले आहेत. तेव्हां सरकारांनीं आपला अमूल्य वेळ खर्च करून हा खटाटोप करूं नये.

मश्रूरनें परोपरीनें ही गोष्ट खलिफाच्या डोक्यांत भरविण्याचा प्रयत्न केल्यावर खलिफा अंमळ विचारांत पडल्यासारखा दिसला. आपण वेष पालटून राजवाड्याबाहेर पडावें ही गोष्ट मश्रूरला पसंत नाहीं, एवढें त्यानें ताडलें. कां बरें? आपल्याला विनाकारण तसदी पडेल म्हणून? अं हं, तसें नसावें. लोकांचीं सुखदुःखें आपल्या कानावर पडूंच नयेत असा डाव या लबाड मश्रूरचा असावा. आपलें नांव लोकांनीं घ्यावें हें या लुच्च्याला मनांतून आवडत नसावें. दुसरें काय?

आपला हा बेत मश्रूरला न सांगतां सवरतां अंमलांत आणला पाहिजे आणि या लुच्च्याला तसेंच होय होय म्हणून पिटाळलें पाहिजे असा खलिफानें मनाशीं निश्चय केला. मग खलिफानें मोठें गंभीर तोंड केलें. किंचित विचार केल्यासारखें दर्शविलें. आणि मान हलवून तो म्हणाला,

"एकूण असें आहे म्हणतोस मश्रूर!"

मश्रूर हात जोडून नम्रपणें म्हणाला,

"होय सरकार."

"तर मग जाण्यांत मतलब तो काय राहिला?"

"तेंच मी म्हणतों हुजूर."

"लोक एकंदरीत सुखी आहेत ना?"

"बेशक सरकार. लोक भलतेच सुखी आहेत."

"मग आमचें राहिलें बुवा जाणें. आज कांहीं नव्या तातार स्त्रिया आल्या आहेत. त्यांचा आम्हीं नाच पाहतों. तूं कोठ्यास जा. आराम कर."

"सलाम."

पुन्हां पुन्हां कुर्निसात करून मश्रूर उठला आणि काठी टेंकीत टेंकीत आपल्या कोठीकडे गेला. तो गेल्यावर खलिफानें त्याच्याकडे पाहून एक छद्मी हास्य केलें. मग शराबाचा प्याला झोंकून तो विचार करीत राहिला. मनाशीं ठरवीत राहिला.

● ●

वेष पालटून खलिफा मागच्या दारानें महालांतून बाहेर पडला, त्या वेळीं चांगलीच रात्र झाली होती. सर्वत्र निजानिज झालेली असावी. कारण जिकडेतिकडे गाढ शांतता भरून राहिली होती. बराच वेळ जळणारे दिवे आतां विझत आले होते. त्यांचा अंधुक उजेड अंधार वाढवीत होता. दिवसां मोठीं भव्य आणि शानदार दिसणारीं दालनें अंधारांत बुडालीं होतीं. मंद उजेडामुळें सर्वत्र मोठें भयाण वाटत होतें. एरवी क्रूर मुद्रेनें वावरणारे खोजे गुलाम शांतपणें झोपीं गेले होते. कुठेंहि वेडेवांकडे पडले होते. हातांत मद्याचे प्याले घेऊन कुणीकुणी चाकर झिंगून बडबड करीत हिंडत होते. लफकलफक करीत एखादी सुंदरी मध्येंच लगबगीनें अंधारांत गडप होतांना दिसत होती. क्वचित कोठें कुचुकुचु बोलणं कुजबूज ऐकूं येत होती. पण एकंदरींत सगळीकडे शांत होतें.

खलिफानें हीं दृश्यें आजवर कधीं पाहिलीं नव्हतीं. त्यामुळें त्याला मोठी मौज वाटली. हळूहळू पावलें टाकीत तो पुढें निघाला. दालनामागून दालनें ओलांडून पुढें गेला.

*आमचें राज्य!.... आमचा राज्यकारभार!.... :६:*

**'कुमाऊंचे (उत्तर प्रदेश) सुप्रसिद्ध नरभक्षक!'**



एकदम कुणीतरी शुकशुक केल्यासारखें वाटलें, तेव्हां खलिफा थांबला. पाठीमागें वळून पाहूं लागला.

इकडेतिकडे पाहिलें तों एक नौकर भिंतीला टेकून आणि पाय पसरून अगदीं निवांत बसला होता. खलिफानें त्याच्याकडे पाहतांच त्यानें हाताची खूण करून जवळ बोलावलें

"ए, इकडं ये."

कांहीं न बोलतां खलिफाची स्वारी त्याच्याजवळ गेली. मग पुन्हां तो म्हणाला, "जरा अफू आहे का थोडीशी?"

खलिफानें मान हलवली.

"नाहीं बुवा. कां?"

"माझी जरा संपत आली आहे. आज रात्रीच्याला पुरली पाहिजे ना!"

"अस्सं!...माझ्याजवळ पण नाहीं बुवा."

"बरें, नसूं दे."

असें म्हणून त्यानें खलिफाकडे नीट न्याहाळून पाहिलें.

"तूं कोण? नवा दिसतोस?"

खलिफानें मान हलवून नम्रपणें सांगितलें कीं, मी नवा नौकर आहे. राजवाड्यांत नुकताच चिकटलों आहें. अजून इथें आपल्या कुणाशीं फारशा ओळखीपाळखी झालेल्या नाहींत.

"वाहवा! अरे, मग ये बैस. घटकाभर गप्पा मारूं."

इतकें बोलून त्यानें खलिफाला बळेंबळेंच खालीं बसवून घेतलें. खलिफाचीहि फारशी हरकत नव्हतीच. अनायासें या बडबड्या माणसाशीं गप्पागोष्टी होतील. कदाचित् त्याच्या अडीअडचणी कळतील आणि आपल्याला त्याच्यावर कांहीं उपाययोजनाहि करतां येईल, असें त्या धूर्त खलिफाला वाटलें.

खालीं बसल्यावर या गड्यानें अफूचा चुट्टा तयार करून ओढला. मोठा आग्रह करून खलिफासहि ओढावयास दिला. चुट्टा बराच जालीम होता. तो ओढल्याबरोबर खलिफाला जबरदस्त ठसका लागला आणि त्याचा जीव अगदीं घाबरा झाला. तोंड लालभडक होऊन डोळ्यांतून पाणी वाहूं लागलें. लोकांच्या अडीअडचणी जाणून घेण्याइतकें आयुष्य आपल्याला लाभतें कीं नाहीं, याची त्यास शंका वाटूं लागली. खलिफाची ही प्राणांतिक अवस्था पाहून तो नौकर म्हणाला,

"का मित्रा, तुला याची संवय दिसत नाहीं?"

मोठमोठ्यांदा खोकत खलिफा म्हणाला, "होय बुवा."

"मग मूर्खा, तुला ओढायला कुणी सांगितलें होतें?"

त्यानें खसदिशीं तें साहित्य खलिफाच्या हातून ओढून घेतलें. खलिफा अगदीं शरमून गेला.

"बरें, तुला निदान गुडगुडी तरी ओढतां येते कीं नाहीं?"

"नाहीं बुवा."

"शराब?—"

"थोडीशी."

"हूं! थोड्यानें काय होणार? इथें चांगली खूप प्यावी लागते. अन् तरी कसं सरळ चालतां आलें पाहिजे. पाय खालीं, डोकें वर."

"असें का?"

"तर! बरें, तुला निदान अंधारांत तरी नीट दिसतें ना?"

खलिफा गोंधळून म्हणाला, "तें कशाला?"

"वा!" तो खलिफाकडे त्याची कींव केल्यासारखी नजर टाकून बोलला, "इथें राजवाड्यांत अंधारांत बघायची संवय फार उपयोगी पडते. अरे, फार मजा मजा पहायला मिळते. सगळें खरें काम इथें रात्रींच. तुला माहीत नाहीं वाटतें?"

"नाहीं बुवा."

"हॅट मूर्खा! निदान तुला बायकांची तरी थोडीबहुत आवड?—"

खलिफानें मुद्दामच मान हलवली. मग मात्र तो गडी चिडल्यासारखा दिसला.

"शाब्बास! मग तूं राजवाड्यांतला नौकर व्हायला अगदीच नालायक दिसतोस! किती दिवस झाले तुला इथं येऊन?"

"झाले एकदोन महिने. तूं?"

"ऊं! मला झालीं इथं येऊन दहाएक वर्षे."

"अरे! म्हणजे तूं बराच जुना नौकर आहेस तर. मग बरोबर."

खलिफाचें हें बोलणें ऐकून तो हंसला. मग जरा खाजगी आवाज काढून म्हणाला,

"मी जुना आहे ही गोष्ट खरी; पण नौकरबिकर नाहीं. नुसताच आहे आपला."

"म्हणजे?"

खलिफाला मोठें आश्चर्य वाटलें. त्यानें खुलासा विचारला, तेव्हां ही स्वारी डौलानें म्हणाली,

"बोलूं नकोस कुणाला. तुला म्हणून सांगतों. अरे, म्हणजे झाली काय गंमत. सहज एकदा राजवाडा बघायला म्हणून मी आपला आंत घुसलों. म्हणजे गंमतीनें बरें का. एक मोठी शानदार बाई रस्त्यानें

जातांना दिसली. तिच्या पाठीमागून हिंडतां हिंडतां मीहि आंत घुसलों झालें ! अन् मी जी वाट चुकलों म्हणतोस ! हिंड हिंड हिंडलों. पण बाहेर कांहीं पडायचा रस्ता सांपडेना. किती हिंडलों माहीत आहे ?"

"किती ?"

"तीन महिने."

"तीन महीने ?"

"होय बाबा, तीन महिने मी मांजरासारखा हिंडत होतों. इकडून तिकडे. तिकडून इकडे. पण पत्ता नाहीं कशाचा—"

एवढें बोलून त्यानें खलिफाला पुढें फारच मनोरंजक हकीकत सांगितली. त्यावरून खलिफाला समजलें कीं, ही स्वारी ज्या बाईच्या पाठीमागें पाठीमागें आली, ती झटक्यानें कोठें तरी नाहींशी झाली आणि मग हा राजवाड्याच्या चक्रव्यूहांत सांपडला. रोज मुदपाकखान्यांत जाऊन जेवायचें आणि दिवसभर रस्ता शोधायचा असा याचा कार्यक्रम पुढें दोन तीन महिने चालू होता. पण तरीहि त्याला यश आलें नाहीं. बरें, दुसऱ्या कोणाला विचारावें म्हटलें तरी पंचाईत. मग न जाणो, आपण कुणी तरी नवे आहोंत याचा बोभाटा होऊन, न विचारतां आंत घुसल्याबद्दल आपलें डोकेंच उडायचें. शेवटीं तीन महिन्यांच्या खटाटोपानें त्यानें बाहेर पडायचा नादच सोडून दिला. इथेंच मुक्काम केला झालें. आतां या गोष्टीला दहा वर्षें झालीं. राजवाड्यांतले सगळे लोक आतां त्याला नौकरच समजतात. त्याला नियमितपणें पगारहि मिळतो.

शेवटीं कळवळून तो खलिफाला म्हणाला,

"काय सांगूं मित्रा, तशी इथें फार मजामजा केली. सगळा आनंद आहे. पण परवां असें वाईट वाटलें म्हणतोस—"

"कां बुवा ?"

"अरे, ती रस्त्यावरची सुंदरी ? ती परवां मला दिसली बघ अचानक. दहा वर्षांनीं तिला बघितली. पण आतां काय उपयोग ? सगळें खलास. कांहीं राहिलें नव्हतें."

खलिफाला हें सर्व ऐकून फार हंसूं आलें. त्याला फारच गुदगुल्या झाल्या. हंसतहंसत त्यानें विचारलें,

"मग इथें तुझा उद्योग काय चालतो दिवसभर ?"

"वा ! इथें मी दिवसां नसतोंच मुळीं ! बसऱ्याच्या व्यापाऱ्याची एक पेढी आहे ना, तिथें मी दिवसां काम करतों. रात्रीं आपलें मुक्कामाला इथें."

खलिफाच्या तोंडावर आश्चर्य उमटलें.

"एकाच वेळीं दोन ठिकाणीं नौकरी ? हें कसें जमतें बुवा ?"

"ऊं: ! सगळेच लेकाचे असें करतात—"

असें म्हणून त्यानें खलिफाला बरीच नवीन माहिती पुरवली. त्यावरून खलिफाला एवढाच बोध झाला कीं, राजवाड्यांतील सगळीच मंडळी सध्यां असा कारभार करतात. खुद्द वझीरसाहेब हे अक्रोडाचा व्यापार करण्यांत गुंतलेले असून राज्यकारभार हा दुय्यम आणि फावल्या वेळचा धंदा समजतात. सेनापतींनाहि सध्यां विशेष काम नसल्यामुळें ते लष्करांत मलमलचें कापड खपवीत असतात. येऊन जाऊन कोतवाल मात्र थोडासा निराळा माणूस आहे. तो असला धंदाबिंदा कांहीं करीत नाहीं. ती स्वारी चोवीस तास शराब पिऊन पडलेली असते. शुद्धीवर असलाच, तर तो एक जुगार तरी खेळतो किंवा बायकांच्या भानगडींत असतो. बहुधा दर चार भानगडींपैकीं एकींत कुठेंतरी तो सपाटून मार खातो. मग चारदोन महिने तो अंथरुणावर निजूनच असतो. पण एवढी गोष्ट खरी कीं, असल्या उद्योगधंद्यांत त्याचें अंग नसतें. बाकीचे सरदारदरकदार कोठले कोठले बारीक उद्योग करीत असतात. एकंदरीत सगळीच मंडळी तशी मोठी सुखी आहेत.

ही माहिती ऐकून खलिफाला आपलें डोकें बरेंच चढल्यासारखें वाटलें. मोठ्या कष्टानें चेहरा शांत ठेवून त्यानें विचारलें,

"एकूण काय, तूंहि मोठा सुखी आहेस तर मग ?"

हें ऐकल्यावर त्यानें वांकडा चेहरा केला. विव्हळून नाखुषीच्या सुरांत तो म्हणाला, "नाहीं रे गड्या, आणखी थोडेसें जमायला पाहिजे बघ. जरा मुदपाकखान्यांत शिरकाव व्हायला पाहिजे रे. म्हणजे मोठी मजा आहे."

"कसली बुवा ?"

"वा ! अरे, चंगळ असते तिथें. लागेल तेवढा माल पडलेला असतो. उचलायचा अन् पळायचें. हूं... परवांच त्या लेकाच्या भटाऱ्यानें पोतंभर मनुका घरीं पळवल्या. चैन झाली बेट्याची. तेवढें जमायला पाहिजे बघ. असली तुझी ओळख तर पहा."

त्या नौकराचें हें दुःख पाहिल्यावर मग खलिफा तिथें थांबलाच नाहीं. कांहींतरी इकडेतिकडे बोलून थातुरमातूर करून तो उठला आणि निघाला. घाईघाईनें पुढें गेला.

• •

एक दोन दालनें ओलांडल्यावर एक दासी मोठी चिंतातुर चेहरा करून रेंगाळत चाललेली आढळली, तेव्हां तो थबकला. तिची मुद्रा काळजींत पडल्यासारखी दिसत होती. तरी ती चालली होती मात्र टुमकत टुमकत.

खलिफानें तिला बरोबर ओळखलें. अरे, ही तर गुल्नार! परवांपरवांपर्यंत ही आपल्या महालांत पंखा ओढायला होती. आतां खलिकडे इमामखान्यांत तिची हजेरी असते. खात्रीनें तीच ही. असें घोड्यासारखें तोंड असलेली दुसरी दासी कोण असणार? ही इकडे कुणीकडे? अशा रात्रीच्या वेळीं नटूनथटून कुठें चालली आहे! आणि तिच्या तोंडावर असा दुःखाचा आविर्भाव कां आहे?

खलिफाला मोठें कुतूहल निर्माण झालें. भान न राहून पट्दिशीं हांक मारली,

"गुल्नार—"

गुल्नार एकदम थबकली. सुरम्यानें माखलेले आपले डोळे खलिफावर रोखून धरीत संशयाच्या सुरांत म्हणाली, "कोण रे तूं?"

स्वतःला सांवरून घेत खलिफानें अगदीं अदबीच्या सुरांत सांगितलें कीं, मी राजवाड्यांत नुकताच लागलेला एक नोकर आहें.

"तुला माझें नांव काय माहिती?"

"वा! म्हणजे काय हें विचारणें झालें? सुंदर गुलनारला कोण ओळखीत नाहीं!"

हे उद्गार ऐकल्यावर गुल्नारचा चेहरा अंमळ खुलला हें खलिफाला अगदीं स्पष्ट दिसलें. आपली मात्रा बरोबर लागू पडली, हें पाहून त्याला स्वतःच्या हुशारीचा भारीच अभिमान वाटला. मग त्यानें तिची आणखी-नच वाखाणणी चालविली आणि शेवटीं विचारलें,

"एवढ्या चिंतातुर मुद्रेनें तूं कोठें निघाली होतीस?"

गुलनार म्हणाली, "माझा एक दिनारच हरवला बघ वाटेंत. लगबगीनें येत होतें. तेवढ्यांत कुठें पडला खुदा जाणे."

"हात्तिच्या! एवढेंच ना? हा घे दिनार."

खलिफानें कमरेची पिशवी काढून त्यांतील एक दिनार तिच्या हातावर ठेवला. तिनें तो मोठ्या घाईघाईनें घेतला. तो कमरेला खोंवून ती म्हणाली,

"वा! तूं मोठा भला गृहस्थ दिसतोस!"

"आहें आपला गरीब माणूस. तुझा सुंदर चेहेरा फारच कोमेजलेला दिसला म्हणून मला राहवलें नाहीं झालें."

गुल्नारनें यावर एक मुरका मारला. मग लाडिकपणानें ती म्हणाली,

"बघ, तुझ्यासारख्या चाकर माणसाला जी अक्कल आहे ती या खलि-फाला नाहीं पहा."

आपला एकाएकीं उल्लेख झालेला पाहून खलिफा जरा चमकला. तोंडावर आश्चर्य आणून म्हणाला,

"खलिफा! त्याचा काय संबंध बुवा?"

"त्या मेल्यानें तर माझें वाटोळें केलें ना! म्हणून तर अशी ही भीक मागायची पाळी आली!"

"ही काय भानगड आहे? आम्हांला सांगशील तर खरें."

गुल्नारनें प्रथम बरेच आढेवेढे घेतले. मग तिनें अगदीं गंभीरपणें खलिफाला सांगितलें कीं, मी इतकी सुन्दर असल्यामुळेंच मुद्दाम खलि-फाच्या महालांत मला नोकरी मिळाली होती. खरें म्हणजे मीच राणी व्हायची; पण या खलिफाला काडीची अक्कल नाहीं, त्याला काय करावें! त्यानें कधीं ढुंकूनसुद्धां माझ्याकडे पाहिलें नाहीं. मी इतकें त्याच्या पुढें पुढें केलें ना, पण व्यर्थ! शेवटीं कुठलें तरी परदेशांतलें ध्यान धरून आणलें आणि त्याच्याशीं लग्न केलें. ही तर शंखोबाची अक्कल! आतां माणसानें चिडूं नये तर काय करावें?

या प्रजेचें सुखदुःख आपल्याशीं इतकें निगडित झालेलें आहे, याची खलिफाला कल्पना नव्हती. त्यामुळें तो गांगरलाच. जरा चिचकून तो म्हणाला,

"पण राणीसाहेब तर मोठ्या सुंदर आहेत—"

"जळ्ळले मेल्या तोंड तुझं!" गुलनार त्याच्याकडे तुच्छतेनें पहात म्हणाली, "तूं तर गाजरपारखीच दिसतोस. चार दागिने अन् भरजरी पोषाख घातला म्हणजे काय माकडीणसुद्धां सुंदर दिसेल! समजलास?"

"हो, तें खरें म्हणा बाकी—"

"आतां कसें बोललास! धड नाक का डोळे का तोंड? उगी गोरें-गोमटें ध्यान नुसतें काय चाटायचें आहे! अन् खलिफाहि मेला तसलाच म्हणा—"

"का? त्याला काय झालें?"

"उगी पाप्याचें पितर आहे झालें. कपडे काढल्यावर पहावें मेल्याला.

आ हा हा ! नुसता मुडदेफरास दिसतो. फांसळी न् फांसळी मोजून घ्यावी छातीची. हमामखान्यांत मी त्याला रोज पाहतें ना."

"असें."

"सारखा शराब पिऊन तर्रर असतो. अन् तब्बेत ही अशी."

"तशी थोडी खराब आहे खरी."

"थोडी? पट्कन एखाद्या दिवशीं जीव जाणार आहे त्याचा. मी सांगतें कीं. लिहून ठेव अगदीं."

खलिफाला मनांतून असा संताप आला! इथल्या इथें तिचा गळा आवळावा आणि तिचाच जीव घ्यावा असें त्याला वाटलें. मोठ्या प्रयासानें त्यानें आपलें मन आवरलें. वरकरणी गंभीर झाल्याचें दाखवून तो म्हणाला,

"हां हां, जरा बेतानें हो. कुणी ऐकेलबिकेल. खलिफाच्या कानावर असलें कांहीं गेलें तर तो डोकेंच उडवील तुझें."

गुल्नारनें नाक उडवलें. बेफिकिरी व्यक्त केली.

"ऊं:! इथें कोण जातंय त्याला सांगायला? दगडोबा कधीं महालाच्या बाहेर पडेल तर शपथ."

"अग, पण भिंतीलाहि कान असतात."

"तशी कांहीं काळजी नाही. इथें कुणाचा कुणाला पत्ता लागायचा नाहीं. तुला माहिती नाहीं वाटतें?"

खलिफानें मान हलवल्यावर गुल्नारला मोठीच सुरसुरी आली. मग तिनें बऱ्याच गप्पा मारल्या. तिच्या बोलण्यावरून खलिफाला समजलें कीं, राजवाड्यांत सगळा गाढवांचा गोंधळ आहे. एकाचा पायपोस एकाच्या पायांत नाहीं. झनानखान्यांत तर नुसती अनागोंदी माजली आहे. एकूण तिथें बायका आहेत किती, याचा नक्की आंकडा गेल्या दोनतीन पिढ्यांत तरी कुणाला माहीत नाहीं. कुणीहि यावें आणि टिकली मारून जावें. वाटेल तो येतो आणि कुठलीहि बाई आंत ठेवून जातो अगर बाहेर उचलून घेऊन जातो. कांहीं कांहींनीं तर आपलीं बिऱ्हाडेंच आंत केलीं आहेत. जितक्या बायका तितकीच पुरुषमंडळी आहेत. कुणी राजरोस वावरतात, तर कुणी बायकांचा वेष घेऊन राहतात इतकाच फरक. वर्षानुवर्षे हे लोक राहताहेत आणि जेवताहेत. पण त्याची कोठें दाद ना फिर्याद! कांहीं सरदारांनीं तर आपले स्वतःचे झनानेहि इथेंच घुसडून दिले आहेत, खर्च खलिफांचा अन् चंगळ यांची. फुकटांत मजा मारतात सगळे. आतां एखाद्या वेळीं वाचा झनाना चुकून त्याच्याकडे जातो. नाहीं असें नाहीं. पण सगळाच चोरीचा मामला असल्यामुळें कुणी ओरडाओरडा करीत नाहीं. असें कांहीं चाललें आहे...

गुल्नारनें इतकी सगळी माहिती सांगितली आणि मग हळूच त्याला म्हटलें,

"भल्या मागसा, तुला यायचें कां तिकडे? चल, मी नेतें."

खलिफाचें डोकें आतां चांगलेंच भणभणत होतें. नकळत त्याच्या तोंडांतून शब्द बाहेर पडले,

"कुठें?"

"झनानखान्यांत. दुसरीकडे कुठें? पण दहा दिनार देत असशील तर! बघ. तुला खूप गंमत उडवायला मिळेल. येतोस?"

खरें म्हणजे खलिफाला शक्य तितक्या लवकर राजवाड्याबाहेर पडून शहरांत जायचें होतें. पण गुल्नारचें बोलणें ऐकून खलिफानें मनाशीं किंचित विचार केला. मग म्हटलें,

"चल."

"आधी रक्कम—"

खलिफानें पुन्हां कमरेची पिशवी बाहेर काढली. त्यांतील दहा दिनार मोजून तिच्या हातावर ठेवले. त्याबरोबर ती खुदकन हंसली. पुन्हां एक मुरका मारला.

"तरी मी ओळखलेंच होतें. म्हटलें, राजवाड्यांत यावेळीं तुझें दुसरें काय काम असणार? काय, ओळखलें कीं नाहीं?"

"ओळखलें खरें" खलिफा मोठ्या कष्टानें बोलला.

"तेवढ्यासाठीं तर मी दिनार हरवल्याची युक्ति केली. म्हटलें, पहावें कांहीं जवळ आहे का नाहीं? अरे, हल्लीं भिकार लोक फार येतात इकडे."

"असें का?"

"तर काय! दमडी द्यायला नको. नुसती चैन करायला पाहिजे मेल्यांना...चला, या माझ्यामागोमाग."

"पण कोणी पाहिलें तर?"

"ऊं! ठेवायचें एखादें नाणें त्याच्या हातावर. त्यांत आहे काय मोठेसें?"

गुलनार भरभर पावलें टाकीत पुढें निघाली. तिच्या मागोमाग खलिफाहि जड पावलांनीं निघाला. आतां आणखी काय काय पहायला मिळतें या धास्तीनें त्याच्या पोटांत गोळा आला.

झनानखान्याशीं पोंचेतों चांगला अर्धा तास गेला. तोपर्यंत अंधार आणखी वाढला आणि दिवे कमी कमी दिसूं लागले. शेवटीं शेवटीं तर खलिफाला अंधारांतून ठेंचकाळत पुढें जावें लागलें. त्या गडबडींत गुल्नार गडप होऊन गेली. कोठें गेली याचा कांहींच अंदाज लागेना. खलिफा गोंधळला आणि जागेवर उभा राहिला. इकडे तिकडे धडपडत उजेडाच्या दिशेनें वाट फुटेल तिकडे पुढें जाऊं लागला.

तेवढ्यांत समोरून कुणीतरी भराभरा येत असल्यासारखें त्याला वाटलें. कोण येत असावें? गुल्नार तर परत आली नसेल?

पण विचार करायला त्याला वेळच मिळाला नाहीं. जो कुणी गृहस्थ आला, तो इतक्या लगबगीनें आला कीं, खलिफाची आणि त्याची जोरांत टक्करच झाली. दोघेहि एकमेकांना असे धडकले कीं बास्! खलिफाचें टाळकें चांगलेंच शेकलें आणि तो कोलमडून एका बाजूला पडला.

मग मात्र खलिफाला राग आवरला नाहीं.

मोठ्या कष्टानें उभा रहात, अंग झटकत तो संतापानें म्हणाला,



"काय रे ए हरामजाद्या, डोळे फुटले काय तुझे?"

कपाळाला हात लावून तो माणूसहि तसाच उभा होता. बहुधा त्यालाहि सणसणून लागलें असावें. हात बाजूला करून तोहि क्रोधाविष्ट होऊन खलिफाकडे पाहूं लागला.

"मला एक दिसत नव्हतं. पण तुला तर दिसत होतें ना?" तो गुरगुरला, "का तुझेहि डोळे फुटले होते? अन् हरामजादा कुणाला म्हणतोस?"

"मूर्खा! तुलाच." खलिफाचा संताप आणखी वाढला.

"मला? शैतान, प्रत्यक्ष खलिफालाच शिव्या देण्याचें धाडस करतोस?"

धडधडीत आपल्यालाच हा आपण खलिफा असल्याची थाप मारतो आहे, हें पाहून त्याचें धारिष्ट श्रेष्ठ असल्याची खलिफाला खात्री पटली. तो गांगरून गेला. म्हणाला,

"क...कोण? तूं खलिफा?"

"अर्थात् तूं काय समजला आहेस? नालायक अवलाद. चल हो बाजूला नाहींतर डोकें उडवीन."

असें म्हणून त्यानें असा एक जबरदस्त टोला खलिफाच्या छातीवर चढवला कीं, खलिफाची स्वारी पुन्हां एकदां कोलमडून खालीं पडली. पण मोठ्या हिंमतीनें उठून त्यानें दोन्ही हात पसरले. वाट अडवली. आवाज चढवला.

"खरें बोल. तूं खलिफा नव्हेस हें मी खचित सांगतों. मी खलिफाला पाहिलें आहे. बोल, कोण आहेस तूं?"

तो गृहस्थ टक लावून पहात उभा राहिला, तसा खलिफाहि त्याच्याकडे पहात उभा राहिला. स्वारीचा पोषाख तर मोठा झोंकदार होता. मलमलीचा सैलसा अंगरखा. झुळझुळीत तुमान. डोक्याला ऐटबाज शिरपेंच असलेला मंदिल. दोन्ही हातांच्या बोटांत हिरेमाणकांच्या अंगठ्या आणि कपड्यांना चोपडलेलें अत्तर. स्वारी मोठी गुलज़ार दिसली.

खलिफानें पुन्हां एकदा निक्षून विचारलें, तेव्हां तो जरा विचारांत पडल्याचें दिसलें. मग एकाएकीं खलिफाच्या पाठीवर प्रेमळ थाप मारून तो हंसूं लागला. सलगीच्या सुरांत म्हणाला,

"वा, मित्रा, तूं मोठा हुषार आहेस! कसें बरोबर ओळखलेंस. मी खलिफा नव्हे ही गोष्ट खरी."

"मग कोण आहेस?"

"हॅः हॅः! आतां खरें सांगायचें म्हणजे—"

"हां—"

"मी खलिफाचा चुलतभाऊ आहे. सुलेमान. चल, जाऊं दे मला. सोड वाट."

"छट्!" खलिफा दृढ निश्चयानें वाट तशीच अडवून तीव्र स्वरांत म्हणाला, "सुलेमानला देखील मीं पाहिलें आहे. तूं तो मुळीच नव्हेस."

तो गृहस्थ पुन्हां हंसूं लागला. मग तोंडावर आश्चर्य दाखवून म्हणाला,

"अरे वा! मोठाच हुषार दिसतोस. मी सुलेमान नाहीं हें खरें. ती उगीच आपली थट्टा केली तुझी. असो. आतां खरें सांगतों. मी कोतवाल आहे, कोतवाल. इकडे कसा काय बंदोबस्त आहे तें पहायला आलों होतों सहज. हां, चल जाऊं दे मला—"

खलिफा रुक्ष स्वरांत बोलला,

"तूं कोतवालहि नव्हेस. मी कोतवाललाहि ओळखतों. मुकाट्यानें खरें बोल पाहूं."



अनुक्रमणिका

"आतां मात्र कहर झाला बुवा. बरें चल हे घे."

असें म्हणून पटकन कमरेची पिशवी काढून त्यानें हाताला लागतील तेवढे दिनार खलिफाच्या हातांत कोंबले. पाठीवर पुन्हां सलगीची थाप मारली. डोळे मिचकावले.

"का, आतां खूष ना?"

खलिफानें मनाशीं थोडा विचार केला. जरा ह्याच्या कलानें घेतलें, तर आणखी कांहीं महत्त्वाची माहिती मिळेल असें त्याला वाटलें. मग त्यानें बळेंच तोंडावर हास्य आणलें. लवून सलाम केला. इकडचें तिकडचें बोलणें काढून त्या रंगेल इसमास बोलकें केलें. मग मात्र दोघांच्या बऱ्याच गप्पा झाल्या. या गप्पांतून खलिफाला समजलें कीं, ही स्वारी कुणी मुशाफिर असून गेले कित्येक महिने राजवाड्यांत तळ ठोकून आहे. झनानखान्यांत बऱ्याच ठिकाणीं तो खुशाल खलिफा म्हणूनच वावरतो. झनानखान्याचे बरेच भाग असें आहेत कीं, तिथल्या नौकरांनीं, बायकांनीं खलिफाला फारसें कधीं पाहिलेलेंच नाहीं. त्यामुळें ते लोक यालाच खलिफा समजतात. सगळें काम कसें मग बिनबोभाट. पैसा खर्च न करतां ऐटींत चंगळ. बरें, जिथें खलिफाला चांगलें ओळखतात, तिथें सुलतानाचा चुलतभाऊ सुलेमान म्हणून सांगत हिंडायचें. म्हणजे कांहीं प्रश्न नाहीं.

"बरें बुवा तुला खलिफासारखें वागणें जमतें?"

"ऊं! त्यांत काय विशेष आहे!" तो माणूस फुशारकीनें म्हणाला, "सारखें आपलें कुठल्यातरी सुंदरीच्या गळ्यांत हात टाकून बसायचें, अन् शराब प्यायची. मधून मधून नौकराच्या अंगावर ओरडायचें: 'डोकें उडवीन,' 'हात कलम करीन,' 'कोरड्यानें झोडपून काढीन' असें आपलें म्हणायचें... म्हणजे लोकांना बिलकुल संशय येत नाहीं. हाः हाः! त्यांना वाटतें की हा शंभर टक्के खलिफाच! ख्यें: ख्यें: !..."

त्याचें फिदीफिदी हंसणें पाहून खलिफाला असा राग आला कीं, याचें या क्षणीं डोकें उडवावें असें त्याला मनातून वाटूं लागलें. पण तें वरकरणी न दाखवितां तो गंभीरपणें म्हणाला,

"मित्रा, तुला एक गोष्ट सांगतों. खलिफाला कोणीहि चुलतभाऊ नाहीं अन् त्याच्या कुठल्याहि भावाचें नांव सुलेमान नाहीं."

"ऊं! असेल नाहीं तर नसेल" तो निष्काळजीपणानें बोलला, "इथें कुणा लेकाच्याला तें माहिती आहे? माझ्याच डोक्यांतून ही शक्कल निघालेली आहे. घाबरूं नकोस."

आतां मात्र खलिफाचें डोकें विलक्षण तापूं लागलें. त्याच्या मनावरचा तोल ढळूं लागला. चेहरा हळूंहळूं बदलत लालबुंद होऊं लागला. पण त्या उमद्या पुरुषाचें तिकडे लक्ष नव्हतें. तो आणखीन लाडांत येऊन खलिफाजवळ सरकला. त्याच्या कानांत कुजबुजला,

"अरे एवढ्यानें काय झालें? मी याच्यापेक्षांहि मजा उडविली आहे. आत्तां मी कोठें गेलों होतों माहीत आहे?"

खलिफानें बावळटासारखी मान हलवली.

"नाहीं. कुठें?"

त्यानें डोळे मिचकावले.

"आत्तांचें प्रकरण तर भारी नाजुक होतें. पण जुळलें अखेरीस बुवा."

खलिफा त्याच्याकडे तटस्थ होऊन पहातच राहिला.

"सांगूं?"

"सांगा."

"पण कुणापाशीं बोलायचें नाहीं."

"नाहीं."

"आत्तां फारच बहार उडाली. कर कान इकडे."

खलिफानें आपला कान त्याच्या तोंडाजवळ नेला.

"आतां मी—"

"हां हां."

"येट राणीसाहेबांच्या महालांतून—"

खलिफाच्या हातांतील नाणीं एकाएकीं गळून पडलीं. खालच्या संगमरवरी फरशीवर त्यांचा खळ्ळकन आवाज झाला. थरथर कांपत तो ओरडला.

"काय?—"

खलिफा एवढ्या मोठ्यांदा ओरडला कीं, तो गृहस्थ दचकून बाजूला झाला. कावराबावरा होऊन खलिफाच्या तोंडाकडे सभय दृष्टीनें पाहूं लागला. कांहींतरी चमत्कारिक प्रकार घडला आहे हें त्यानें क्षणार्धात ताडलें. मग त्यानें खलिफाला विचार करायला फारसा अवधि दिलाच नाहीं. सरकन त्यानें कमरपट्ट्यांतून म्यानासह तरवार उपसली. उलटी करून धरली आणि खलिफाच्या टाळक्यावर तिची मूठ दाणकन आदळली.

त्याबरोबर खलिफाचें टाळकें असें सडकून निघालें कीं कांहीं विचारूं नये. त्याच्या डोळ्यासमोर एकदम काजवेच चमकले. त्या स्वारीनें घाई-घाईनें अंधारांत धूम ठोकली एवढेंच त्याला अंधुकपणें कळलें. पण त्याला प्रतिकार करण्याची ताकद राहिलीच नाहीं. क्षणार्धात बेशुद्ध होऊन तो खालीं कोसळला. पुढें काय झालें याची त्याला कांहीं शुद्ध राहिली नाहीं.

● ●

खलिफा सावध झाला, त्यावेळीं त्याचें डोकें विलक्षण ठणकत होतें. जाळीदार झरोक्यांतून उनाचे ठिपके खालीं उतरले होते. त्यांच्या चित्रविचित्र रांगोळ्यांनीं महालांतील अंतर्भाग उजळला होता. किनखापी पडदे वाऱ्याच्या झुळकांनीं रुळत होते. बाहेर स्वच्छ ऊन पसरलें होतें आणि दूरवरच्या मशिदींचे घुमट त्यांत झगमगत होते. बगीच्यांतील रंगीबेरंगी पांखरें कुलकुलत होतीं. वाद्यांचे मंद सूर लावून कुठूनतरी ऐकूं येत होते आणि खलिफाच्या तोंडावर गुलाबपाण्याचे हबकारे मारून कुणीतरी त्याला सावध करीत होतें.

मोठ्या कष्टानें खलिफानें डोळे उघडले. किंचित विव्हळत विचारलें,

"मी कुठें आहे?"

त्याबरोबर शांत, धिम्या स्वरांत उत्तर ऐकूं आलें,

"आपण आपल्याच महालांत आहांत, सरकार."

आवाजाच्या अनुरोधानें खलिफानें मान वळविली. पाहिलें तों पलंगाच्या पायथ्याला खालच्या मऊ रुजाम्यावर म्हातारा मश्रूर बसला होता. त्याच्या हातांत गुलाबपाण्यानें भरलेली सुरई होती. खलिफानें पाहिल्यावर तो हलकेंच हंसला. मग खलिफाच्या कपाळावर आपला सुरकतलेला हात ठेवून त्यानें उगीच थोपटल्यासारखें केलें. अदबीनें विचारलें,

"आतां कसें वाटतें हुजूर?"

अगदीं हळू आवाजांत खलिफा म्हणाला,

"जरा बरें वाटतें."

आणि त्यानें दोन्ही हातांनीं चांचपडल्यासारखें केलें. नेहमींच्या पलंगाचा स्पर्श त्याला जाणवला. मग किंचित क्षीणपणें हंसून त्यानें उठून बसण्याचा प्रयत्न केला. पण डोक्यांत घण घातल्यासारख्या वेदना होऊं लागल्या. तेव्हां तो नकळत परत खालीं पडला. कण्हत म्हणाला,

"मश्रूर."

"हां जी, सरकार."

"मला येथें कोणीं आणलें?"

"मीच सरकार."

खलिफा चकित झाला. तशाहि स्थितींत त्याचे डोळे विस्फारले.

"तूं?"

"हो सरकार." मश्रूर अदबीनें मान लववून संथपणें म्हणाला, "मला माहीतच होतें. बंद्याचें बोलणें तुम्ही मनावर घेणार नाहीं. आपलाच हट्ट चालवणार. मी तुमच्या मागेंमागेंच होतों, सरकार."

"तर मग तुला सगळें ऐकूं आलेंच असेल."

"होय सरकार. अगदीं शब्द न् शब्द."

खलिफाचा चेहरा लाजेनें लाल झाला. शरमिंदा होऊन कांहीं न बोलतां तो स्वस्थ पडून राहिला. मश्रूरनें शराबाचा प्याला मुकाट्यानें भरला आणि त्याच्या हातीं दिला. तो झोंकल्यावर त्यास अंमळ तरतरी वाटली. मग दुःखी आवाज काढून तो बोलला,

"मश्रूर, लोक फार भयंकर आहेत रे."

"होय सरकार."

"तूं सांगत होतास तें अगदीं खरें. कुणी दुःखी नाहीं. सगळ्यांची कशी चंगळ चालली आहे."

मश्रूरनें आपली पांढरीशुभ्र दाढी कुरवाळली. चेहरा धीरगंभीर केला.

"सद्धर्मपालक, मी हें तुम्हांला आधींच सांगितलें होतें. पण त्यावेळीं तें तुम्हांला पटलें नाहीं."

"आतां पटलें."

"सरकार, यापुढें एक गोष्ट नेहमीं लक्षांत ठेवा. लोक नेहमींच सुखी असतात. दुःखी काय तें आपणच असतों. म्हणून शहाण्या माणसानें लोकांच्या सुखदुःखांची कधींहि चौकशी करूं नये."

"मला हें माहीत नव्हतें." खलिफा क्षीण आवाजांत बोलला.

"बरें झालें माहीत झालें तें. आतां यापुढें आपला महाल सोडून कुठेंहि जाऊं नका. म्हणजे तुम्हीहि सुखी रहाल आणि लोकहि सुखी राहतील."

खलिफानें नुसतीच मान हलवली आणि तो पडून राहिला. त्याला हळूहळू ग्लानी येऊं लागली. शराबाच्या धुंदीनें डोळे जड होऊन मिटूं लागले. तेवढ्यांत त्याला पुन्हां कसलें तरी स्मरण झालें. दचकून जागा होत तो म्हणाला,

"पण काय रे मश्रूर, तूं तर म्हणाला होतास—"

"काय सरकार?"

"आमचे अब्बाजान आणि आजोबा दोघेहि असेच वेष पालटून हिंडत म्हणून. मग?"

मश्रूरनें पुन्हां खलिफाचें कपाळ थोपटलें.

"होय सरकार. त्यांनींहि हा खटाटोप करून पाहिला होता. मी होतोंच ना बरोबर त्यांच्या."

"मग? त्यावेळीं काय झालें?"

"आपले वडील—सद्धर्मपालक खलिफा—त्यांची लोकांनीं तंगडीच मोडली होती. अन् आजोबांची मान मोडून जाण्याचा प्रसंग आला होता. दोघेहि सहासहा महिने बिछान्यावर पडून होते सरकार. त्या मानानें तुमचें थोडक्यांत निभावलें म्हणायचें! आतां यापेक्षां जास्ती कांहीं विचारूं नका."

हें ऐकून खलिफाला पुष्कळच हुषारी वाटूं लागली. त्याच्या डोक्यावरचें ओझें बरेंचसें उतरलें.

"मग काय रे मश्रूर, या गोष्टी ग्रंथांत कां बरें आल्या नाहींत?"

खलिफाचा हा बालिश प्रश्न ऐकून तो अनुभवी म्हातारा हंसला. पूर्वीच्याच गंभीर आवाजांत तो बोलला,

"कारण त्या खऱ्या गोष्टी आहेत. आणि खऱ्या गोष्टी ग्रंथांत घालण्याचा शिरस्ता नाहीं, सरकार... झोपा आतां."

मश्रूरचें बोलणें ऐकतां ऐकतां खलिफाचे डोळे पुन्हां मिटूं लागले. हळूहळू त्याला गुंगी येऊं लागली. मश्रूर त्याचें कपाळ थोपटत राहिला. बगीच्यांतलीं रंगीबेरंगी पांखरें कुलकुल करीत राहिलीं. वाद्यांचे मंद सूर तसेच वाजत राहिले आणि त्या वेड्या खलिफाला झोंप लागली. आधींच सुखी असलेल्या आपल्या प्रजेला जास्ती सुखी करण्याचा विनाकारण प्रयत्न करणाऱ्या त्या दुःखी खलिफाला अखेरीस अगदीं गाढ झोंप लागली.

● ● ●



अनुक्रमणिका




*पाय थकले होते. खांदे भरून आले होते आणि पाठीला रग लागली होती. मग मुक्कामावर पोंचण्याची एवढी घाई त्या दुबळ्या जीवाला कां झाली होती?....*

ओढ्यांतले खांचखळगे न चुकवतां सांगलीची एस्. टी. झोकांड्या खात खात आटपाडी तळावर आली. तायाप्पाच्या हॉटेलासमोर उभं रहात तिनं एक जोराचा सुस्कारा सोडला आणि आपले तारवटलेले डोळे गरगिरी मिटून घेतले. रोज दिवस मावळायला आटपाडींत येणारी 'सांगली' आज साडेनऊ वाजतां आली.

गाडी उभी रहातांच तायाप्पानं फोनोवर एक प्लेट लावली आणि त्याच्या हॉटेलांतल्या पोऱ्यांनीं चहा गरम असल्याच्या आरोळ्या ठोकल्या. गाडींतनं आठ दहाच उतारू उतरले. आपापलीं गाठोडीं, बोजे डोक्यावर घेऊन चालूं लागले. एकानंहि तायाप्पाच्या हॉटेलाकडं नजर वळवली नाहीं. तसा तायाप्पा उगीचच चिडला आणि खसकन् फोनो बंद करत खेकसला,

"च्यायला या सांगलीच्या..."

तेवढ्यांत उभ्या राहिलेल्या गाडींतून एका गुटगुटीत पोराला खांद्यावर पेलत एक फाटका गडी अवघडून खालीं उतरला आणि तायाप्पाच्या हॉटेलाच्या दिशेनं आला. त्याला पाहून तायाप्पाच्या तोंडांतल्या शिव्या ओठांतल्या ओठांतच अडकल्या.

तें तीन साडेतीन वर्षांचं पोर त्या फाटक्या गड्याला घट्ट बिलगलं होतं. एखाद्या एरंडाच्या झाडाला गिरेंबाज फणस लागावा तसं दिसत होतं. मोटारीपासनं हॉटेलांत येईपर्यंत त्या अशक्त माणसाला धाप लागली. त्याच्या निरुंद कपाळावर घाम डवरला. कसंबसं त्या पोराला बांकड्यावर उभं करत त्यानं त्याच्या शेजारींच बसकण मारली. तायाप्पानं गल्ल्यावरनंच विचारलं,

"काय चा ?"

भिंताडाला पाठ देत सखाराम क्षीण आवाजांत म्हणाला,

"हां..."

"कोन गांव ?"

"वाडीचा हाय"

"खांजोड्याच्या ?"

"नाहीं...थेरल्या पाटलाच्या..."

एवढ्या बोलण्यानं सखारामाला पुन: धाप लागली. त्यानं क्षणभर डोळे मिटून घेतले. सोनाराच्या भात्यांतनं वारा सुटावा तसा त्याच्या घशांतनं दोनचारदां आवाज आला. त्याची दीडवीत छाती मागंपुढं झाली. मग त्यानं डोळे उघडले. रखा रखा सगळ्या हॉटेलाच्या भिंतीवरनं नजर फिरवली आणि खोबणींतनं बाहेर पडूं पाहाणारे आपले एवढाले डोळे त्यानं शेवटीं तायाप्पावर रोखले. तो एकाद्या भ्रमिष्टासारखा तायाप्पाकडं एकटक बघतच राहिला. तायाप्पानं नुसत्या भुवया उंचावून 'काय?' असं खुणेनेंच विचारलें. पण सखारामाला तें कळलं नाहीं. त्याचे डोळे तायाप्पावर खिळले होते खरे. पण त्याची नजर कुठंतरी घुटमळत होती. दूरवर घुटमळत होती.

"काय चा ?" तायाप्पानं जरा कावूनच विचारलं.

तसा सखाराम लटकन हालला. डोईचा पटका हातांत घेत बांकड्यावर ताठ बसत म्हणाला...

"हां...चा"

मोटारींत बसून बसून ताठरलेली आपली पाठ त्यानं बसल्या बसल्याच कडा कडा मोडली. मग तोंडावरचा, गळ्याचा, छातीवरचा घाम पुसला आणि पोराला मांडीवर घेत, त्याच्या गोबऱ्या गालाला आपलं अष्टकोनी गालफाड घांसत, लाडक्या आवाजांत विचारलं,

"तुला रं काय पावजे ?"

"लाडू..." आपला गाल बाजूला करत तें पोर म्हणालं.

"लाडू ?...लाडू कंचा ?"

"बेसनाचा."

"लाडू द्या वं दोन–"

कांचेच्या कपाटांतून तायाप्पानं दोन लाडू काढून एका बशींत घातले. ते लाडू गोल नव्हते. त्यांना गुळाच्या ढेपीसारखा उभट आकार देण्यांत आला होता.

लाडवाची बशी समोर येतांच तें पोर हरकलं. गपशिरी लाडू तोंडाला लावून आपल्या इवल्याशा दांतांनीं 'कुरू कुरू' कुरतडूं लागलं. लाडू किती दिवसांचे, शिळे होते कुणास ठाऊक. सखाराम मान वांकडी करून पोराच्या फुललेल्या चेहऱ्याकडे कौतुकानें बघत राहिला. तेवढ्यांत चहा आला. सखारामानं अलगदपणें पोराला मांडीवरनं उचलून बांकावर बसवलं आणि चहाचा कप हातांत घेतला.

आपल्या कोंवळ्या दांतांनीं तें पोर तो कठीण लाडू फोडायची खटपट करत होतं. त्याच्या तोंडाची हालचाल मोठी गंमतीदार होत होती. तायाप्पा पोराकडं बघत हंसला अन् परातींतलं जिलबीचं एक कडं त्यानं पोराच्या बशींत घातलं. त्याच्या गोबऱ्या गालावरनं हात फिरवत त्यानं सखारामाला विचारलं,

"कुणाचा रं ह्यो ?"

"माझाच हाय," चहाचा गरम गरम घुटका गिळत सखाराम म्हणाला. तायाप्पाला जरा आश्चरीत वाटलं...अशा फाटक्या गड्याला एवढं गिरेबाज पोर ! त्यानं पोराला विचारलं,

"नांव काय रं तुझं ?"

"चंद्रकांत सखालाम साळुंखे." तोंडाचा लाडू बाजूला करत तें पोर टरक्यांत म्हणालं.

"ए रे बहाद्दर," म्हणत तायाप्पानं कौतुकानं त्याच्या पाठींत एक हलकासा बुक्का घातला. तसं तें पोर खळखळून हंसलं आणि आपल्या बापाच्या मांडीवर त्यानं आपलं अंग झोंकून दिलं. सखारामाच्या हातांतली मोकळी झालेली कपबशी खालींच पडणार होती पण बचावली.

"आरं हो...हो...हो..." म्हणत सखारामानं कपबशी बांकड्यावर ठेवली आणि धोतराच्या सोग्यानं तोंड पुसत त्यानं तायाप्पाला विचारलं,

"गाडी, छकडा कांहीं मिळल का वाडीपतूर जायला ?"

"न मिळायला का झालं ! पैका मोजल्यावर इमानसुद्धां मिळंल ह्या गांवांत."

"तसं न्हवं...आपलं ही...छकडा काय घील वाडीला ?"

"आतां पयल्यान् डाव वाडीला चालल्यागत इचारतोयस !"

"नाहीं...चार साल येनं घडलंच नाहीं बगा..."

"पांच रुपयाखालीं कुनी यायचा नाहीं ह्या वक्ताला."

"पांच रुपयं ! आवं सांगलीसनं हातवर यायला बी तेवढं पडलं नाहींत..."

"पर एवढी का घाई हाय तुला ? रातच्याला हातं ऱ्हा आन् सकाळीं जा म्हनं सांगोल्याच्या गाडीनं फाट्यापतूर..."

सखाराम क्षणभर गप झाला. त्याला पुनः धाप लागल्यासारखं झालं पापण्यांची विचित्र उघडझांप करत त्यानं आजूबाजूला बघितलं...

"एवढं काशीला निघाल्यागत इचार कसला करतोयस. रातभर न्हा आन् सकाळच्या एसटीनं जा..."

पण सखारामाला तें पटलं नाहीं. आपल्या थरथरत्या हातानं त्यानं ग्लासांतलं पाणी पोराच्या तोंडावरनं फिरवलं अन् तो ओशाळलं हंसला. म्हणाला,

"असं कुठं धुळं मुर्तिजापुराला जायाचंय. दोनएक कोस तर हाय वाडी. घंट्या दीड घंट्याचा रस्ता."

तायाप्पानं त्याला जबाब दिला नाहीं. तो खालीं मान घालून गल्ल्यांतले पैसे मोजूं लागला. सखारामानं खिशांतनं पैसे काढून तायाप्पासमोर ठेवले. पैसे गल्ल्यांत टाकत तायाप्पानं पुनः त्या पोराच्या गोबऱ्या गालावरनं हात फिरवला आणि म्हणाला,

"आईला सोडून बरं न्हातंय रं?"

सखाराम थोडा गप झाला. आपली बांकड्यावरली पिशवी उचलत, कुठंतरी पाहात, जडभारी आवाजांत म्हणाला,

"चार महिनं झालं ह्याची आई खरचल्याला."

"आ...रा...रा..."

"माझी मावळण हाय वाडींतच. तिच्याजवळ ठेवावं म्हनतोय याला. माझ्या गिरणीच्या कामांतनं ह्येच्याकडं बघाय उसंतच होत नाहीं. लई आबदा हुती शेजाऱ्यापाजाऱ्याच्या मेहेरबानीवर ठेवन्यापरीस मायेच्या मानसाजवळ तरी न्हाईल."

"पर...तुला सोडून न्हाईल म्हनतोस कां?"

"काय चार दोन रोज घालंल गोंधळ. मग आपसूक सरळ यील."

"सकाळच्याला जाईनास कां सांगोलच्या एसटीनं...आतां धा वाजाय आल्यात..."

पण सखाराम तें ऐकायला तयार नव्हता...त्याला वाडीला जायची कसली घाई झाली होती देव जाणे. पोराला खांद्यावर घेत आभाळाकडं बघत तो म्हणाला,

"त्येला कां होतंय...चांदनं हाय झकास......हां हां म्हणतां वाट सरंल."

"ह्या टोण्याला घिवून?"

"ते कां," पोराचा गालगुच्चा घेत सखारान म्हणाला, "चालाय मोठा ताठ हाय आमचा गडी."

"तसं न्हवं रं...पर..."

तायाप्पाला तें जरा अवघड वाटलं. वाग आला तर वालथा पडेल अशी बापाची तब्येत आणि तें पोर म्हणजे नाहीं म्हटलं तरी अर्धा-मणाचा बोजा. बरं, कितीहि समजूतदार म्हटलं तरी तें पोरंच...त्याच्या बालहट्टापुढं हा कितीसा टिकाव धरणार?...शक्य तितक्या कळकळीनं तायाप्पानं त्याला समजावून सांगितलं, आडवायचा प्रयत्न केला. पण सखारामानं तें कानाआड केलं.

"बराय...येतो रान" म्हणत तो पोराला पेलत पेलत धाईधाईनं हॉटेलाबाहेर पडला. आपले बगळ्यासारखे लांबट पाय उचलून टाकत तो ओढ्याच्या दिशेनं झरा झरा चालूं लागला.

• •

आभाळ अगदीं लख्ख होतं. अष्टमीचा चंद्र थोडा मावळतीला झुकला होता. नुकत्याच सुगी आटोपल्यानं रानांतल्या वस्त्या गांवांत गेल्या होत्या. चांदणं खात रानं हातपाय पसरून निवांत पडलीं होतीं. सगळं कसं शांत होतं. सुन्न होतं.

पोराला पेलत पेलत सखाराम ओढ्याची उगर चढून वर आला. पोराला खालीं ठेवत त्यानं तोंडानं एक सुस्कारा सोडला आणि वाटेकडेच्या एका धोंड्याला पाठ देऊन तो पाय पसरून बसला. इतका वेळ गप बसलेला चंदू बापाला म्हणाला,

"तात्या, आपुन आजीकडं जायाचं?"

"हां...आजीकडं."

"आजी गिरनींत नाई कां जात?"

"ह्यॅ...ह्यॅ...लेका हातं कुठली गिरनी—"

"मग आजी काय करते?"

"आजी व्हय..." सखाराम अडखळला. आपली मावळण नेमकं काय करते हें सांगणं त्याला थोडकं अवघड गेलं. तरी पण आवढे वटवटीत डोळे आणखी मोठे करत तो म्हणाला,

आमचें राज्य !.... आमचा राज्यकारभार !.... :७:

'म्हैसूरांत (बद)सूर'



"आजी किनाई—गाईची धार काढते."

"आजीची गाय हाय ?"

"हां—"

"मग वासरू केवडं हाय ?"

"तुझ्याएवढं."

"माझ्याएवढं ?" चंदू खळखळून हंसला. गायीचं वासरूं आपल्या एवढंच असणं हें त्याला मोठं गम्मतीचं वाटलं.

थोडका विसांवा मिळाल्यानं सखारामाला जरा बरं वाटलं. धोंड्याला रेटा देत तो उठला. म्हणाला,

"चलो"

चंदूला एकाएकी कसला जोम आला कुणास ठाऊक. त्यानं एवढ्या वेगानं बापाच्या अंगावर झेप टाकली कीं, सखारामाचा एकाएकीं तोल गेला आणि त्याचा फाटका देह फुफाट्यांत जवळजवळ आडवाच झाला.

"आरं...आरं ..आरं..." म्हणत सखारामानं स्वतःला सांवरलं आणि धुळीनं माखलेले आपले हात झटकून तो पुनः दोन पायांवर आला. अपराध्यासारखा जरा बाजूला उभा राहिलेल्या चंदूला त्यानं जवळ ओढला. त्याचा हात हातांत घेत म्हणाला,

"चलो स्वारी"

बापाच्या डोळ्याला डोळा न देतां चंदू अपराधी सुरांत म्हणाला,

"तुला लागल का रं ताल्या ?"

"नाहीं रं माज्या लेकरा..." असं म्हणत सखारामानं खालीं वांकून पटकन पोराचा मुका घेतला. समजावणीच्या आवाजांत त्याला म्हणाला,

"चालशील ना आतां ?..."

"हां पन्हे..."

"चलो..."

बापाचा हात धरून चंदू त्याच्याबरोबर चालूं लागला. पावलागणिक उड्या घेत तें पोर एकाद्या चेंडूसारखं पुढंपुढं जाऊं लागलं. सखाराम आपले बगळ्यासारखे लांबुळके पाय उचलून टाकत त्याच्या बरोबरीनं चालूं लागला.

थोडं अंतर गेल्यावर मागच्या अंगाला कुणाचीं तरी पावलं वाजल्यासारखं सखारामाला वाटलं...सखारामानं चटकन मागं वळून बघितलं. पण त्याला कुणी दिसलं नाहीं...

"कां बगतोस रं ताल्या...?" चंदूनं विचारलं.

"कुणीतरी मागनं आल्यागत वाटलं रं मला."

"कुठं कोन हाय ?..."

"नाहीं...मला वाटलं रं तसं...चल. आतां बोलूं नगोस, बोलण्यानं नेट जातं..."

आणखी थोडं पुढं गेल्यावर सखारामाला पुनः तसाच भास झाला. आतां तर पायांतल्या जोडव्याचा अन् हातांतल्या कांकणांचा आवाज त्याला स्पष्ट ऐकूं आला...त्यानं चंदूला थांबवलं अन् पुनः चौफेर नजर टाकली...पण त्याच्या दृष्टीला कुणी दिसलं नाहीं. सखाराम जरा सटपटला...पण चेहऱ्यावर तसं कांहीं न दाखवतां तो पोराला म्हणाला,

"चांदनं हाय तंवर वाडींत गेलं पायजे. चल. जरा पाय उचल"

"तूंच मांग ऱ्हातोयस...अन् मला भल भल चल म्हणतोयस व्हय ?" असं म्हणत चंदूनं आपला वेग वाढवला. त्याच्या बरोबरीनं चालतांना सखारामाला थोडं अवघड जावूं लागलं. तरी पण तो नेटानं पोराच्या

बरोबरीनं चालत राहिला. आतां पुनः मागं वळून बघायचं नाहीं असं ठरवून तो भराभरा पोराबरोबर चालू लागला.

गेले दीड वर्ष सखारामला मधनं आधनं बारीक ताप येत होता. चंदूची आई होती तंवर तो कांहीं औषधपाणी तरी घ्यायचा. डॉक्टर, वैद्य, देवऋषी सगळ्यांनीं त्याच्यावर इलाज केले होते. पण त्याच्या हाडीं खिळलेला ताप कांहीं निघाला नव्हता. रुक्मिणी गेल्यापासनं तर त्यानं स्वतःचा असा विचारच केला नव्हता. तिन्ही त्रिकाळ त्याला चंदूची काळजी लागलेली असायची... कामावर गेला तरी त्याचं चित्त लागायचं नाहीं....तुमचं चित्त कामांत लागायचं नाहीं, माझं ऐका, तुमी पोराला मावळणीकडं निऊन पोंचवा, माझ्या गळ्याची आण आहे...मरतां मरतां रुक्मिणीनें त्याला शपथ घालून सांगितलं होतं...तुमची तब्येत ही अशी...गिरनींतल्या कामानंच पट्टा पडतोय तुमचा...घरीं यिवून आनि ह्या पोराच्या उरतवाऱ्या करनं तुमाला झेपायचं नाहीं...त्याचं बी हाल होयाल आन तुमचं बी... मरतांना त्यानं रुक्मिणीला वचन दिलं होतं खरं, पण चंद्याला वाडीला पाठवायची कल्पनाच त्याला सोसली नाहीं. रुक्मिणी गेल्यावर त्यानं चंदूला मावळणीकडं पाठवलं नाहीं. नाना उपाय करून त्यानं पोराला सांगलींतच आपल्याजवळ ठेवलं...गिरणींतल्या मुकादमाला आपली अडचण सांगून तो रोजच्याला रात्रपाळ्या करूं लागला...पोगला झोपवून मगच तो गिरणींत जावूं लागला...असं एकदोन महिने कसं तरी चाललं...आणि सखारामाच्या हाडीं खिळलेला ताप अंगावर आला. त्यानं त्याला जवळजवळ महिनाभर लोळवला...महिनाभरानं ताप निघाला, थोडी ताकद आल्याबरोबर सखारामनं पोराला उचलला आणि त्याला घेऊन तो मावळणीकडं निघाला.

सखारामाला कसला रोग झाला होता कुणाला ठाऊक. दिवसेंदिवस तो वाळत चालला होता...वकत चालला होता...

पोराला मावळणीकडे पोंचवायची त्याला नुसती घाई झाली होती. तायाप्यासारख्या वयस्थानं एवढ्या मिनतवाऱ्या केल्या तरी तो आटयाडींत थांबला नव्हता. चंद्याला एकदां मावळणीच्या पदराखालीं सोडला कीं आपण सुटलों असं त्याला आतां वाटूं लागलं होतं.

"ताल्या ते बघ..." चंद्यानं चालतां चालतां मधेंच थांबून आभाळाकडं हात केला...दोन टिटव्या ओरडत चालल्या होत्या. त्यांच्या त्या लयबद्ध करुण ओरडण्यानं सखाराम एकाएकीं शहारला. टिटव्या अशा रात्रीच्या हिंडतांना त्यानं कधीं पाहिल्या नव्हत्या...तो उगीचच म्हणाला...! पाय उचलत घाईघाईनं म्हणाला,

"चल, लवकर चल...तुला वाडीला जायचंय ना ?"

"व्हय..."

दोन पावलं गेल्यावर चंद्यानं सखारामाकडं बघितल्या न बघितल्यासारखं करुन विचारलं,

"तूं सांगलीला मागारी जानार हायस...?"

"हां...तूं ऱ्हाशील ना आपल्या आजीजवळ ?"

"ऱ्हाईन कीं...पन तूं कुठं ऱ्हाशील ?"

"सांगलीला...आपल्या खोलींत..."

"रोज सांच्याला येशील ना वाडीला ?"

आतांच नाहीं म्हणलं तर पोर बिथरेल, गोंधळ करेल हें सखारामानं मनोमन हेरलं आणि रोज संध्याकाळीं ऐशीं नव्वद मैलाचं अंतर तोडून त्यानं वाडीला यायचं कबूल केलं.


DIL BAHAR
KAMINIA OIL
Diwali greetings
दिवाळीच्या या मंगलप्रसंगीं
कामिनियाचीं सौंदर्यप्रसाधनें
आपल्या आश्रयदात्यांना शुभेच्छा व्यक्त
करीत आहेत—आपली दिवाळी
आनंदाची आणि नवें सौंदर्यपूर्ण
वर्ष सुखसमृद्धीचें जावो !
आपल्या सौंदर्यांत आणि मोहकपणांत
भर घालणारीं आमचीं प्रसाधनें :—
कामिनिया हेअर ऑईल
दिलबहार टॉयलेट सोप
ऑटो दिलबहार
कामिनिया स्नो
कामिनिया कोल्ड क्रीम
ॲंग्लो इंडियन ड्रग ॲन्ड
केमिकल कंपनी, मुंबई २

**ही दिवाळी व नवें वर्ष सर्वांना सुखसमृद्धीचें जावो**







अनुक्रमणिका

तात्या रोज सांच्याला वाडीला येणार म्हणल्यावर चंदू हरकला. अधिक जोमानं चालूं लागला. त्याची इवलीशीं पावलें पटापटा फुफाट्यांत ठसे उमटवत पुढें पुढें जावूं लागलीं. सखारामाच्या एका पावलाबरोबर त्याचीं दोनदोन पावलं पडूं लागलीं. आणि दर चारदोन पावलाला तो सखारामाच्या थोडं पुढें जावूं लागला. सखाराम मनांतल्या मनांत कौतुकानं हंसे आणि त्याचा हात ओढून त्याला आपल्याबरोबर घेई.

एव्हांना दीड दोन मैल रस्ता कटला होता. चालून चालून सखारामाच्या कंबरेला रग लागली होती. थांबावं, पाय पसरून जरा बसावं असं त्याला सारखं वाटत होतं. पण पोराचा तो उत्साह आणि चालण्याचं नेट बघून तो बोलला नाहीं, पोराचं बोट धरून त्याच्या बरोबरीनं चालत राहिला. चंदू एकाद्या पंचकल्याणी घोड्यासारखा पौंडावर चालला होता. त्याच्या अंगांत एक लय भरली होती.

चिंचेच्या ओढ्यांतून वर आल्यावर सखारामाला चालणं असह्य झालं. आपल्या गुढग्याच्या वाट्या निसटून आपण पाय फांकून उताणे पडूं काय असं त्याला हरघडी वाटूं लागलं. त्यानं मनाशीं ठरवलं, एवढा चढ चढला कीं जरा बसायचं. विसावा घ्यायचा अन् मगच पुढं जायचं. असा बेत करून तो जिवाच्या करारानं चंदूबरोबर चालूं लागला...ओढत ओढत जाऊं लागला ..पण कां कुणास ठाऊक, चंदूचा वेग एकाएकी कमी झाला. चढ चढून वर आल्यावर सखारामानं कांहीं बोलायच्या आधींच चंदू इवळला.

"तात्या—"

'काय रं ?"

"कांटा मोडला बघ"

"आँ...कुठं ?"

"त्या मागल्या वड्यांत मोडला बघ"

"मग आत्तां सांगतुयास व्हय ?"

दोघंहि बापलेक रस्त्यावरच्या फुफाट्यांत बसले.

"बघूं—" म्हणत सखारामनें त्याचा पाय हातांत घेतला. चाचपला. टांचेला हात लावतांच पोर इवळलं.

"मग लेका चढ कसा चढलास एवढा ?"

"टांच टेकलीच न्हाई म्या..."

"जरा बस...म्हंजे बरं वाटंल..."

"आं ऽ ऽ...कांटा काढून टाक...लई कळ मारतिया..."

"आरं पर आतां दिसायचं नाहीं..."

"आं ऽ ऽ कांटा काढून टाक."

सखारामानं आपल्या परीनं त्याची समजूत घालायचा आटोकाट प्रयत्न केला, पण कांहीं केल्या चंदूची समजूत पटली नाहीं. त्यानं एकच रामठेका लावला...

"कांटा काढ, कांटा काढ. कांटा काढ"

आधींच चालून कंबर ढिली झालेल्या त्या सखारामाला त्याचा तो हट्ट फार वेळ सहन झाला नाहीं. तो एकदम भडकला आणि दोन्ही हात वर फेंकत ओरडला,

"आतां गप बसतोस कां दिवूं एक व्हलपाडा ?"

चंदू एकाएकीं गप झाला. सखाराम बसल्या जागीं आडवा झाला. हातपाय ताणून निपचित उताणा पडून राहिला...आभाळांतल्या चांदण्या त्याला उगीचच जवळ आल्यासारख्या वाटल्या...त्या चांदण्याहि त्याच्या डोळ्याला खुपूं लागल्या...मग हलकेंच त्यानं आपल्या पापण्या मिटल्या...त्याला आणखी बरं वाटलं. तोंच त्याच्या कानांवर कांकणाचा आवाज आला...पण निश्चयानं त्यानं डोळे उघडले नाहींत...'मीं लाखदां सांगितलं, रातपाळी करत जाऊं नगा. पर ऐकायचं नांव नाहीं...ह्या आजारानं तुमचा सोभाव झालाय जरा तापट... पर माझ्या गळ्याची आन हाय पोरावर हात टाकाल तर...' होय. रुक्मिणीचाच आवाज तो...सखाराम तटकन उठून बसला. आणि मग त्याला एकदम वाईट वाटलं. आपण उगीच पोरावर रागावलों. खेंकसलों. तोडून बोललों...बसल्या बसल्याच तो चंदूजवळ सरकला. चंदूचं सारं अंग हादरत होतं. तोंडावर दोन्ही हात दाबून तें पोर हुंदका दाबत होतं. सखारामला एकदम भडभडून आलं आणि त्यानं झेपावून पोराला पोटाशीं धरलं. "तात्या ऽ ऽ" म्हणत चदूनं बापाला घट्ट मिठी मारली. "गप...गप...उगी...आतां दिसायचं नाहीं रं...

आन् सुईवी नाहीं माझ्याजवळ...गप...गप आपुन आजींकडं गेल्यावर कांटा काढूं वर का..." असं म्हणत सखारामानं त्याला खांद्यावर टाकलं आन् तोल संभाळत संभाळत तो उठला...पुनः चालूं लागला. अजून चंदूचा हुंदका जिरला नव्हता. मधनंच त्याचं सर्वांग हादरे आणि त्याच्या तोंडून "तात्याऽऽ' असं इवळणं बाहेर पडे. "उगी उगी...काढू हां काटा" असं म्हणत सखाराम पोराला थोपटीत थोपटीत रस्ता कापूं लागला.

• •

चंद्र आतां मावळतीला टेकला होता. वाडीकडं जाणारा फाटा अजून अर्धा एक मैल तरी लांब होता. पोराला खांद्यावर पेलत पेलत सखाराम चालला होता. चालतां चालतां पोराचा डोळा केव्हां लागला तें सखारामला कळलें नाहीं.

मावळतीकडनं एक गार वाऱ्याची झुळूक आली आणि सखाराम उगीचच उल्हसित झाला. आपल्या किटकुळ्या पायांत जोम आल्यासारखं त्याला वाटलं. चालतां चालतां त्यानं आपला वेग वाढवला. पण तो वेग फार काळ टिकला नाहीं. झोंपलेल्या चंदूचा बोजा पावलागणिक वाढूं लागला. त्याच्या पाठीच्या कण्याला रग लागूं लागली. खांदे भरून येऊं लागले. पायांत पेटके येतील कीं काय असं त्याला वाटूं लागलं.

चंदू बापाच्या खांद्यावर निवांत झोंपला होता. त्याचा गरम गरम श्वास सखारामाच्या कानाशीं कुजबुजत होता. पाय थकले होते...पाठ भरून आली होती आणि कंबरेला रग लागली होती...तरी पण त्या श्वासाच्या प्रेरणेनें सखाराम चालला होता...भेलकांडत...झोकांड्या खात...

मुलाणकीपाशीं आल्यावर सखाराम थोडका थांबला. डाव्या हातानं पोराळा संभाळत त्यानं उभ्या उभ्याच उजवा हात कंबरेवर ठेवला आणि जरा ताठ होत त्यानं आपलं डोकं थोडं मागल्या अंगाला झुकवलं. पाठीचा ताठरलेला कणा कडकड वाजला. त्याला थोडं बरं वाटलं. मग हलकेच त्यानं चंदूला हातावर आडवा घेण्यासाठीं त्याला खांद्यावरनं उचलला... पण एकाएकीं त्याचा तोल गेला आणि पोरासकट त्यानं फुफाट्यांत बसकण मारली. चंदू जागा झाला तो रडतच—

"तात्या...मला घे...मला घे..."

क्षणभरच सखारामाच्या डोळ्यावर झांपड आली. त्याच्या डोळ्यासमोरुन उभे आडवे काजवे वेगानें धांवले. पण क्षणभरच. लगेच त्यानं बसल्या बसल्याच पोराला खांद्यावर टाकला आणि "उगी...उगी हां.. म्हणत तो त्याला थोपटूं लागला. चंदू जागा झाला तसाच पुन्हा झोंपी गेला. सखाराम त्याला थोपटत थोपटत आजूबाजूला बघूं लागला. चंद्र केव्हांच बुडाला होता. आभाळांतल्या चांदण्यांचे थवे उगीचच टेकत असल्यासारखे त्याला वाटले. पलिकडच्या नाळावरनं कोल्ह्यांचे आवाज उठत होते. माणसानं हंसल्यासारख्या विचित्र आवाजांत कोल्हे एकमेकांना साद घालत होती. बाकी कसलीच चाहूल नव्हती. त्या उघड्या माळावर आपल्या तीन साडे तीन वर्षांच्या पोराला खांद्यावर घेऊन एक दुबळा बाप असहाय अवस्थेंत बसला होता. त्याच्या अंगांत आतां उठून उभा राहण्याचाहि त्राण नव्हता आणि आपल्या बायकोला मरतांना दिलेलं वचन पाळण्यासाठीं त्याला अजून एकदीड मैल वाट तुडवायची होती. झोंपलेल्या पोराला खांद्यावर घेऊन त्याला दीड मैलावरच्या वाडींत जायचं होतं.

सखारामाला एकदां वाटलं...इथंच आडवं व्हावं...पोराला कुशींत घेऊन...काय होतंय त्याला ..दिवस उजाडल्यावर कुणाची तरी गाडी मिळेल...गाडींत बसून जाऊं...पण कां कुणाला ठाऊक, हा विचार आला तसाच त्यानं झटकन् पुसून टाकला...आणि त्यानं उठण्याचा प्रयत्न केला.. पण त्याच्या पायांनीं साफ नकार दिला...त्याचीं गुडघ्याचीं हाडें कुटकुटलीं आणि त्यानं पुनः फुफाट्यांत बसकण मारली...पोराला थोपटून तो अत्यंत केविलवाण्या नजरेनं चौफेर बघूं लागला...चांदण्यांचे थवे आपल्याभंवती रिंगा घालतायत असं त्याला क्षणभर वाटलं...त्यानं पुन्हां उठण्याचा प्रयत्न केला. पण त्याच्या पायांनीं कांहींच हालचाल केली नाहीं ...म्हणजे...आपल्याला उठतांच येणार नाहीं?...या जागींच आपण बसलों...तर चंदूला मावळणीकडं कोण पोंचवेल? रुक्मिणीला वचन दिलं होतं. तिच्या गळ्याची शपथ घेऊन तिला सांगितलं होतं...कीं...पोराला मावळणीकडं पोंचतं करीन...

पुन्हां त्याच्या कानावर कांकणांची किणकिण आली. त्यानं मान वळवून

---

*आमचें राज्य !.... आमचा राज्यकारभार !.... :८:*

**'कुठं आहे मानसिंग?'**



डाव्या अंगाला पाहिलं. खरंच रुक्मिणी उभी होती...खालीं वाकून ती त्याच्या खांद्याला धरून त्याला उठवूं पहात होती...तो भान न राहून ओरडला...

"कोण—? रुक्मिणी?"

रुक्मिणीनं तोंडावर बोट ठेवलं आणि ती हलक्या आवाजांत म्हणाली, "शूः ऽ...ओरडताय काय... चंदू उठेल ना."

रुक्मिणीच्या आधारानं सखाराम उठूं लागला. असेल नसेल तेवढ्या ताकदीनं तो पोराला खांद्यावर पेलत ताठ उभा राहिला. रुक्मिणी हंसली. तिनं हलकेच सखारामच्या कपाळावरचा घाम आपल्या पदरानं पुसला. सखारामचे पाय जागच्या जागीं लटपटले. पाठींतनं एक जोरदार सणक आली. मणक्याच्या खालच्या टोकांत भाल्याचं पातं रोवल्यासारखी कळ आली...पण आतां त्याला कशाचीहि परवा नव्हती. त्याच्याबरोबर त्याची रुक्मिणी होती...आणि रक्त नसलेल्या त्याच्या नसानसांतून पोराची माया सळसळत होती. एखाद्या वेफाम झालेल्या वारूसारखा तो कमालीच्या वेगानं एकदम वाडीच्या दिशेनें झेपावला. बघतां बघतां त्यानं फांटा गांठला...न थांबतांच मान तिरकी करून मागं बघितलं. रुक्मिणी त्याच्या मागेंच होती...तिचा चेहरा एकप्रकारच्या समाधानानं फुलून आला होता ...सखारामाला आणखी जोर आला...दुप्पट वेगानें तो वाडीच्या दिशेनें वाऱ्यासारखा धांवूं लागला...पावलागणिक त्याची ताकद क्षीण होत होती. पण त्याची त्याला परवा नव्हती...घामाच्या धारा तोंडावरनं अंगावरनं वहात होत्या. पण त्या पुसण्याची त्याला गरज नव्हती. एकदां पोराला मावळणीच्या मांडीवर ठेवलं कीं आपण सुटलों... मग रुक्मिणी आपला घाम पुसेल...पाय चेपेल...पण खरं तर आतां त्याचे पाय दुखायचे थांबले होते...पाठीच्या कण्याला लागलेली रग पार मरून गेली होती... त्याचे खांदे अगदीं हलके हलके वाटत होते. आपले पाय जमिनीला टेकतायत कां नाहींत हें त्याचं त्यालाच कळत नव्हतं. पोर खांद्यावर आहे हें त्याच्या श्वासावरून कळत होते...हलके हलके त्या पोराचेंहि ओझें वाटेनासें झालें...आपलें पोरगें इतकें हलकें कसें झालें हेंहि त्याला कळलें नाहीं··· आणि...आणि सखारामचा चेहरा एकदम उजळून आला... वाडी जवळ आल्याची...एका हांकेवर आल्याची खूण त्याला दिसली.. त्यानं तो पवाराचा डेरेदार आंबा ओळखला...त्यानें आपले डोळे आणखी ताणले...त्याला गांवांतल्या देशमुखाच्या वाड्याच्या उंचच्या उंच असलेल्या पडक्या भिंती दिसल्या...त्या बऱ्याच लांब होत्या...पण त्यानं ओळखल्या...त्यानं आणखी वेग वाढवला...पण एकाएकी काय झालें कुणास ठाऊक...त्याच्या डोळ्यासमोरची वाट अंधुक व्हायला लागली...तरी पण त्यानं धीर सोडला नाहीं...मधनंच त्याला आभाळांतल्या चांदण्यांचे थवेच्या थवे जमिनीवर उतरल्यासारखे दिसत...मधनंच ते थवे भरकन चिमण्यांच्या थव्यासारखे आभाळांत जात आणि समोर मोकळी वाट दिसे...आठ दहा कासऱ्यांवर देशमुखाच्या वाड्याच्या पडक्या भिंती दिसत...पुनः ते चांदण्यांचे थवे वाटेवर येऊन उतरत आणि वाट दिसेनाशी होई...असें बऱ्याच वेळां झाले आणि मग त्या चांदण्याहि गेल्या आणि ती वाटहि कुठें गडप झाली... चारी अंगांनीं काळ्या भोर चिरेबंदी भिंती वेगानं धांवत आल्या आणि सर्वत्र अंधारच अंधार झाला...

"ताम्या ऽ ऽ"

फुफाट्यांत पडलेला चंदू किंचाळत उभा राहिला. सखाराम धुरळ्यांत आडवा झाला होता. त्याचें तोंड मातीनें माखलें होतें तरी त्याच्या चेहऱ्यावरचें समाधान झाकलें नव्हतें.

चंद्यानं एवढा मोठा गळा काढला. पण त्या मध्यरात्रीच्या वेळीं त्याच्या रडण्याचा केवळ प्रतिध्वनीच त्याच्याजवळ येऊन पोंचला. त्याच्या रडण्याची आवर्तच्या आवर्तं आसमंतांत विरून गेलीं. तो घसा खरवडून खरवडून ओरडला. पण त्याचा सखारामावर कांहींच परिणाम झाला नाहीं. हळूंहळूं त्याचा आवाज कमी आला आणि मुसमुसत बापाच्या छातीवर मान ठेवून तें पोर झोपी गेलं....

पण त्याचा रडण्या-ओरडण्यामुळं गांवाला जाग आली होती. आणि जराशानं गांवाच्या बाजूनं दोन कंदील हेलकावे खात पुढं पुढं येऊं लागले.

● ● ●

# अमरु शतक



—ग. त्र्यं. देशपांडे

*स्त्री-पुरुषांच्या प्रेमजीवनाचीं चित्रें अमरूनें इतक्या कौशल्यानें रेखाटलीं आहेत कीं, वाराशें वर्षें उलटलीं आणि गृहजीवनाचें रूप पालटलें, तरी त्या चित्रांतले रसरंग अजूनहि भावरम्य वाटतात !*

*अमरुककवेरेकः श्लोकः प्रबन्धशतायते ॥*

**—एक अज्ञात भरतटीकाकार**

संसारांत स्वतःला अनुभवी समजणारी एक मैत्रीण एका नवोढेला प्रेमाचें रहस्य समजावून देत होती :

*मुग्धे मुग्धतयैव नेतुमखिलः*
*कालः किमारभ्यते*
*मानं धत्स्व, धृतिं बधान, ऋजुताम्*
*दूरे कुरु प्रेयसि ।*

"भोळ्या मुली, सदासर्वकाळ पतीशीं असें सरळपणानेंच काय वागतेस ? कांहीं मान धरावा, थोडा धीर ठेवावा, सारखा सरळपणा ठेवण्याचें कमी कर."

*सख्यैवं प्रतिबोधिता प्रतिवचः*
*तामाह भीतानना*
*नीचैः शंस हृदि स्थितो हि ननु मे*
*प्राणेश्वरः श्रोष्यति ॥ अ. श. ७०*

मैत्रिणीचा असा उपदेश ऐकतांच ती नवोढा भीत्यागंत होऊन म्हणाली, "बाई ग, अगदीं हळू सांग बरं ! नाहीं तर माझ्या हृदयांत असलेले प्राणेश्वर तें ऐकायचे !"—उपदेश करावयास आलेली मैत्रीण आपणच प्रेमाचा धडा घेऊन गेली नसेल असें म्हणतां येणार नाहीं !

• •

द्विभार्याप्रतिबंधाच्या आजच्या काळांत असे प्रसंग सांगणें इष्ट नव्हे, पण इतिहास म्हणून पुढील गोष्ट सांगावयास हरकत नसावी :

*दृष्ट्वैकासनसंस्थिते प्रियतमे*
*पश्चादुपेत्यादरा—*
*देकस्या नयने पिधाय विहित—*
*क्रीडानुबन्धच्छलः ।*
*ईषद्वक्रितकन्धरः सपुलकः*
*प्रेमोल्लसन्मानसा—*
*मन्तर्हासलसत्कपोलफलकाम्*
*धूर्तोऽपरां चुम्बति ॥ अ. श. १३*

सामान्यतः सवती एकमेकींशीं भांडतांना दिसत असल्या, तरी जेव्हां त्यांचें एकमेकीं-वांचून अडतें, तेव्हां त्या एकहि होतात. एकदां अशाच दोन सवती एकमेकींना न्हायला घालून दुपारच्या उन्हांत मोकळे केस वाळवीत एकाच चौरंगावर बसल्या होत्या. पतीला हें दृश्य दिसलें. तो पाय न वाजवितां त्यांच्या मागें आला; क्रीडामिषानें त्यानें हळूंच एकीचे डोळे झांकले, व मान किंचित् कलती करून दुसरीचें हळूंच चुंबन घेतलें. 'केवढें आपल्यावर प्रेम' असेंच त्या दोघींनाहि वाटलें असेल! दोन नायकांच्या दादल्याच्या संसाराचा विचकाच होतो असें आपल्याला धूर्त व दक्षिण नव-ऱ्यांच्या बाबतींत तरी म्हणतां येणार नाहीं !

• •

*दम्पत्योर्निशि जल्पतोर्गृहशुके—*
*नाकर्णितं यद्वचः*
*तत्प्रातर्गुरुसन्निधौ निगदतः*
*तस्यातिमात्रं वधूः ।*
*कर्णालम्बितपद्मरागशकलम्*
*विन्यस्य चञ्चूपुटे*
*व्रीडार्ता विदधाति दाडिमफल—*
*व्याजेन वाग्बन्धनम् ॥ अ. श. १६*

शय्यागृहांत झालेलें दंपतीचें बोलणें एके रात्रीं पोपटानें ऐकलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं सासू, सासरा वगैरे गुरुजन पोपटाला "बोलो मिठ्ठू सीताराम" असें नेहमींप्रमाणें म्हणूं लागले. पोपट मोठा लबाड. त्यानें त्यादिवशीं आपलीं नेहमीचीं भजनें न म्हणतां, आदल्या रात्रीं जें ऐकलें, तेंच मोठ्या सुरांत सांगावयास सुरवात केली. वधू लाजेनें चूर झाली. क्षणभर गोंधळली. पण ती चतुर होती. तिनें लागलीच आपल्या कानांतलें माणकाचें लोलक काढलें व पोपटासमोर धरलें. त्याला वाटलें हा डाळिंबाचा दाणाच आहे; लागलीच गोष्ट थांबली. तोंड बंद करण्याचा हा प्रकार अलौकिक नाहीं असें कोण म्हणेल ?

•

अनुक्रमणिका

भावाभिव्यंजनाचें एक व संघटनाचातुर्याचीं दोन अशीं तीन पद्यें वर दिलीं आहेत. तीं सर्व अमरुशतकांतील आहेत. **अमरुशतक** हा शृंगारप्रधान संस्कृत मुक्तकांचा (स्फुट पद्यांचा) संग्रह असून, तीं सर्व पद्यें 'अमरु' किंवा 'अमरुक' नामक कवीनें रचलेलीं आहेत. यांतील चार ओळींच्या प्रत्येक पद्यांत सलग अशी एक संपूर्ण कल्पना असून तिच्या द्वारें कवीनें शृंगाररसांतील एखादा भाव प्रत्येक वेळीं अभिव्यक्त केला आहे. या शतकांतील एकूण पद्यसंख्या निश्चित नाहीं. निरनिराळ्या प्रतींत १०२ पासून तो १६३ पावेतों वेगवेगळी पद्यसंख्या आहे.*

अमरु कवीची वैयक्तिक माहिती कोणतीच उपलब्ध नाहीं. तो केव्हां व कोठें होऊन गेला याबद्दल कांहींच सांगतां येत नाहीं. अमरूचीं पद्यें वामनानें काव्यालंकार सूत्रवृत्तींत उदाहरणांकरितां घेतलेलीं आहेत. वामनाचा काळ इ. स. ८०० हा निश्चित केलेला आहे. आनंदवर्धनानेंहि ध्वन्यालोकांत अमरूचीं पद्यें उदाहरणांकरितां घेतलेलीं असून शिवाय रसस्यन्दि मुक्तकांकरितां अमरूचा त्यानें गौरव केला आहे. आनंदवर्धनाचा काळ इ. स. ८५० हा आहे. याचा अर्थ असा कीं, अमरू इ. स. ८०० पूर्वी केव्हां तरी झाला व इ. स. ८५० पर्यंत रसस्यंदि मुक्तकांकरितां त्याची प्रसिद्धि झाली होती. अमरूबद्दल निश्चितपणें एवढेंच सांगतां येतें. अमरूनें आपल्या पद्यांतील अनेक कल्पना गाथासप्तशतीवरून घेतल्या असाव्यात असें पं. मथुरानाथ शास्त्री यांनीं गाथासप्तशतीच्या प्रस्तावनेंत दाखविलें आहे. गाथासप्तशतीचें अखेरचें संस्करण केव्हां झालें हें सांगतां येत नाहीं. पण तें इ. सनाच्या सहाव्या शतकापर्यंत झालें असावें असें अनेक अभ्यासकांचें मत आहे. या सर्व गोष्टी लक्षांत घेतां अमरु कवि इ. स. ६०० ते इ. स. ८०० या काळांत केव्हां तरी झाला असावा एवढाच अंदाज करतां येतो.

अमरुशतक हें काव्य आद्य शंकराचार्यांनीं रचलें असा एक प्रवाद आहे. माधवाचार्यांच्या शांकरदिग्विजयांत एक कथा आहे. ती अशी : शंकराचार्यांचा मंडनमिश्र या प्रसिद्ध मीमांसकाशीं वाद झाला; त्यांत मंडनमिश्र हरला. पण मंडनमिश्रांची पत्नी '**उभयभारती**' लागलींच पुढें येऊन म्हणाली, "यतिश्रेष्ठ, आपण मला वादांत जिंकल्याशिवाय माझ्या पतीला आपण हरविलें असें व्हावयाचें नाहीं." तेव्हां आचार्य तिच्याशीं वाद करावयास प्रवृत्त झाले. वादाच्या भरांत उभयभारतीनें आचार्यांना प्रश्न केला, "कामाच्या कला किती आहेत? त्यांचें स्वरूप कसें आहे? त्यांचीं स्थानें कोणतीं आहेत? शुक्लपक्ष व कृष्णपक्ष यांत त्यांची स्थिति कशी असते? तसेंच स्त्री व पुरुष यांच्या ठिकाणीं त्यांचा निवास कसा असतो?" हा प्रश्न ऐकतांच आचार्यांना मोठा पेंच पडला. प्रश्नांचीं उत्तरें दिलीं, तर यतिधर्माला बाध येतो; न दिलीं तर तर अल्पज्ञता पदरीं येते. आचार्यांनीं एक महिन्याचा अवधि मागून घेतला. त्याच सुमारास 'अमरक' नांवाचा एक राजा मृत झाला. आचार्यांनीं आपल्या योगसामर्थ्यानें त्याच्या मृत शरीरांत प्रवेश केला; व एक महिन्याच्या अवधींत राण्यांच्या सहवासांत त्यांनीं कामतत्त्वाचें ज्ञान प्राप्त करून घेतलें. तसेंच वात्स्यायनाचीं कामसूत्रे व त्यावरील भाष्याचें अध्ययन केलें; व नृपवेषांत असतांनाच त्यांनीं त्या आधारें उभयभारतीच्या प्रश्नांचीं उत्तरें देणारा कामशास्त्रविषयक नवीन प्रबंध रचला.

हा प्रबंध म्हणजे अमरुशतकच होय असें म्हणतात. पण त्यांत कांहीं तथ्य दिसत नाहीं. आचार्यांचीं भाष्यें, प्रकरणें व स्तोत्रें जशीं ज्ञात आहेत, तसा कामशास्त्रावरील कोणताहि ग्रंथ (नामांतर घेऊन लिहिलेलाहि) त्यांच्या नांवाला चिकटविलेला नाहीं. बरें, असा एखादा ग्रंथ त्यांनीं लिहिला असें मानलें, तरी तो वात्स्यायनसूत्रें व त्यावरील भाष्य यांच्या आधारें लिहिलेला एक निबंध असून, त्यांत उभयभारतीच्या प्रश्नांचीं उत्तरें गर्भित होतीं हें स्पष्ट आहे. आचार्यांनीं अमरुशतकासारखें एखादें काव्य लिहिलें असा शांकरदिग्विजयांत पुसटसुद्धां उल्लेख नाहीं. व अमरुशतकांतील पद्यांत उभयभारतीच्या प्रश्नांचीं उत्तरें शोधूनहि सांपडत नाहींत. तेव्हां अमरुशतकाचें कर्तृत्व शंकराचार्यांकडे कल्पनेनेंहि देतां येत नाहीं. तें देणें ही त्या यतिश्रेष्ठाची विटंबनाच होय.

अमरुशतकावर रविचंद्राची एक टीका असून तींत या पद्यांचा अर्थ शृंगाररसपर व शांतरसपर असा दोन प्रकारचा केलेला आहे. शांत रसाच्या समर्थनार्थ रविचंद्रानें अशी आख्यायिका दिली आहे : "दिग्विजय करीत आचार्य

* अमरुशतकावर अर्जुन वर्मदेव, वेमभूपाल, व रुद्रदेव यांच्या टीका आहेत. अर्जुन वर्मदेवाची टीका १०२ पद्यांवर आहे, वेमभूपालाची टीका ११६ पद्यांवर आहे, तर रुद्रदेवाच्या टीकेप्रमाणें एकूण १३० श्लोक होतात. रुद्रदेवाच्या पाठांतील कांहीं श्लोक अर्जुन वर्मदेवानें प्रक्षेपकांत काढले आहेत. याशिवाय वेगवेगळ्या सुभाषितसंग्रहांत अमरूच्या नांवावर आणखी कांहीं श्लोक आहेत. हे सर्व श्लोक एकत्र करून निर्णयसागर संस्करणांत एकूण १६३ श्लोक अमरूचे म्हणून दिले आहेत. या लेखाकरितां निर्णयसागर प्रतीचाच उपयोग केलेला आहे.

काश्मीर देशांत गेले असतां, तेथील सभेंतील पंडितांनीं आचार्यांना शृंगाररसाचें वर्णन करावयास सांगितलें. तेव्हां आचार्यांनीं परकायाप्रवेशविद्येनें अमरु नामक राजाच्या मृत देहांत प्रवेश करून शंभर स्त्रियांशीं एक रात्र क्रीडा केली व प्रातःकाळीं हें काव्य रचलें. पुढें स्वतःला आजन्म ब्रह्मचारी म्हणविणारा हा कपटी संन्यासी दिसतो अशी पंडितांनीं निंदा केली असतां, आचार्यांनीं याच पद्यांतून शांतरसहि कसा अभिप्रेत आहे हें दाखविलें." रविचंद्राच्या या म्हणण्याला कसलाहि आधार नाहीं. तो स्वतःच याबाबतींत "इति किंवदन्ती" असा शेरा मारतो. शिवाय रविचंद्रानें दिलेली ही "किंवदन्ती" शांकरदिग्विजयांतील कथेशीं विसंगत आहे. दुसरें असें की, रविचंद्राशिवाय इतर कोणत्याहि टीकाकारानें असा शांतरसाचा शोध घेण्याचा प्रयत्न केलेला नाहीं. आनंदवर्धनासारखा रसिकाग्रणी व अभिनवगुप्तासारखा साक्षेपी साहित्यमीमांसक यांनाहि या पद्यात केवळ शृंगारच दिसला, शांत दिसला नाहीं. शिवाय अमरूचीं कित्येक पद्यें गाथासप्तशतींतील गाथांशीं जुळतात. तेव्हां त्या गाथांतहि शांतरस अभिप्रेत आहे असें मानण्याचा प्रसंग येईल; अमरूच्या पद्यांत शांतरस शोधणें म्हणजे 'रहसि प्रौढवधूनां रतिसमये वेदपाठ इव' असलाच प्रकार होय !

अमरूच्या पद्यांचा विषय शृंगार आहे. शृंगाराची अभिव्यक्ति करावयास कवीच्या ठिकाणीं असामान्य शक्ति असावी लागते. शब्दयोजना, अर्थव्यक्ति, मधुर व प्रसन्न संघटनौचित्य, अलंकारांचा उचित विन्यास आणि विभावादि रससामग्रीचा सम्यक्‌योग या सर्व गोष्टी कवीला एकाच प्रयत्नांत साधतां आल्या पाहिजेत. अमरूला या सर्व गोष्टी विशिष्टतेनें साधल्या आहेत. इतर कवींना जो प्रसंग उभा करावयास पद्यामागून पद्यें खर्च करावीं लागलीं असतीं, तो प्रसंग अमरु केवळ चार ओळींत साधतो. अमरूच्या पद्याचा आकार दिसावयास मुक्तकाएवढाच असला, तरी त्यांतला आशय प्रबंधाएवढा असतो. अमरूच्या या वैशिष्ट्याचा निर्देश सर्व साहित्यरसिकांनीं एकमुखानें केला आहे. या लेखाच्या प्रारंभीं दिलेल्या अज्ञात भरतटीकाकाराच्या वचनांत हाच आशय आहे.

अमरूच्या पद्यांतील शृंगाररसाचा आस्वाद घेण्यापूर्वीं थोडक्यांत कां होईना, पण शृंगाराचें स्वरूप आपणास समजून घेतलें पाहिजे. शृंगाराचा स्थायिभाव 'रति' हा आहे. रति म्हणजे प्रेमरूप चित्तवृत्तिविशेष. अर्थात् येथें स्त्रीपुरुषविषयक प्रेमच अभिप्रेत आहे. "स्त्री पुंसोः अन्योन्यालम्बनः प्रेमाख्यः चित्तवृत्तिविशेषः रतिस्थायिभावः" असें जगन्नाथानें रतिभावाचें स्वरूप सांगितलें आहे. कामसूत्रांमध्यें 'रति' आणि 'प्रीति' हे परस्परांचे पर्याय म्हणून सांगितले आहेत. या रतीचेंच स्वरूप हेमचंद्रानें 'आस्थाबन्ध' असें सांगितलें आहे. 'आस्था' म्हणजे आत्मीयता किंवा अनन्यता. प्रेमरूप चित्तवृत्तीचें जें आलंबन असतें, त्या आलंबनाविषयीं आत्मीयता किंवा अनन्यता असणें ही आस्था होय. अनन्यता म्हणजे अन्याश्रयाचा त्याग. आलंबनविषयाखेरीज प्रेमिकाची कोठेंहि अन्यत्र निष्ठा नसते. प्रेमिकाचे सर्व वाङ्मनःकायरूप व्यापार प्रेमविषयाच्या किंवा आलंबनाच्या ठिकाणींच समर्पित झालेले असतात. कोणत्याहि कारणानें आलंबन व चित्त यांच्या वियोगाची जाणीव झाली, तर त्यामुळें व्याकुळता निर्माण होते. स्त्रीपुरुषांची अशाप्रकारें परस्पराश्रित अनन्यतावृत्ति म्हणजेच आस्थाबंध होय. प्रेमबंधांत दोघांपैकीं कोणत्याहि एकाला निरपेक्ष अस्तित्व नसतें. तसेंच त्यांतील एक दुसऱ्याच्या सुखाचें साधन आहे अशीहि भावना नसते. प्रेमविषय साधनरूप नसून फलरूप असतो.

म्हणूनच 'रति' ही 'परस्परविशेषिका असूनहि 'द्वयोरपि एकरूपा' असते असें हेमचंद्र सांगतो. प्रेमाच्या या एकरूपतेचा आविष्कार करतांना अमरु म्हणतो :

*आश्लिष्टा रभसात् विलीयत इवा—*
*क्रान्ताप्यनङ्गेन या*
*यस्याः कृत्रिमचण्डवस्तुकरणा—*
*कूतेषु खिन्नं मनः।*
*कोऽयं कास्मिनि प्रवृत्तसुरता*
*जानाति या नान्तरम्*
*रन्तुः सा रमणी स एव रमणः*
*शेषौ तु जायापती ॥ अ.श. १४१*

परस्परांच्या आवेगानें झालेल्या आलिंगनांत जणूं परस्पर विलीन झाल्यासारखे होतात; कामपीडित झाले असतांहि कृत्रिमता व उग्रता यांच्यामुळें खिन्न होतात; आणि परस्परांच्या सहवासांत असतां 'हा कोण व मी कोण' हा भेदच जाणवेनासा झालेला असतो; अशी ज्यांची स्थिति असते, तेच खऱ्या अर्थानें परस्परांचे रमण आणि रमणी असतात; इतर सर्व लौकिक

दृष्टीनेंच नेवरात्रायको असतात झालें !

वरील पद्यांत प्रेमबंधाचीं सर्व वैशिष्टयें आलीं आहेत. 'विलीन' वृत्तीमध्यें 'तदर्पिताखिलाचारता' आहे. 'कोऽयम् काहम्' याच्या विस्मरणवृत्तीमध्यें 'द्वयोरपि एकरूपता' आहे. म्हणूनच हें प्रेम, प्रीति किंवा रति आहे. या एकात्मक रतिभावाचे रमण आणि रमणी हे दोन अंश आहेत. या रतिवृत्तीला विघ्नभूत होऊं पाहणाऱ्या वृत्तींचा निर्देशहि 'कृत्रिमचण्डवस्तुकरणाकृतेषु खिन्नं मनः' यांत केलेला आहे. कृत्रिमता आणि चण्डता या गोष्टी प्रेमवृत्तीमध्यें चालत नाहींत. कृत्रिमतेनें जुगुप्सा निर्माण होते. प्रीति दोन हृदयांना आकर्षित करून त्यांच्यांत एकता निर्माण करते, तर जुगुप्सा एक होऊं पाहणाऱ्या हृदयांना दूर करते. कृत्रिमता हें जुगुप्सेचें प्रधान कारण होय. चण्डता ही उग्रतेची द्योतक आहे. प्रेमवृत्तींत उग्रता चालत नाहीं. दोन प्रेमी हृदयें एक होतांना त्या वृत्तिमिलनांत एक प्रकारचा आवेग असतो. ही रभसता होय. रभसतेच्या उलट आलस्य आहे. म्हणून प्रेमवृत्तींत आलस्यहि चालत नाहीं. रतीच्या आविष्कारांत अभिलाष, हास्य, लज्जा, याप्रमाणेंच कांहीं प्रसंगीं कोप, अमर्ष, मान, दैन्य, शंका इत्यादि भाव चालतील; त्यामुळें रत्याविष्कारांत वैचित्र्यहि येईल; पण जुगुप्सा, आलस्य व उग्रता मात्र मुळींच चालावयाचे नाहींत, त्यांमुळें रतिभावच नष्ट होईल




रतीचे पारस्परिक आलंबन स्त्रीपुरुष आहेत. शृंगाराच्या आविष्काराच्या दृष्टीनें या स्त्रीपुरुषांचें वैशिष्ट्य अपेक्षिलें आहे. ते तरुण तर आहेतच पण त्याशिवाय त्यांच्या ठिकाणीं 'समग्रविषयग्राम समग्रता', 'स्थिर अनुराग' आणि 'कामिता' या गोष्टी आवश्यक आहेत. समग्रविषयग्राम समग्रता म्हणजे विषयसामग्रीची पूर्णता. अपूर्णतेची जाणीव असतां रतीचा आविष्कार होऊं शकत नाहीं. रतिभावाला आवश्यक असणाऱ्या अनन्याश्रयतेला अपूर्णतेची जाणीव बाध आणते. पूर्णतेची जाणीव अर्थातच मनःस्थितिसापेक्ष असते. ती केवळ बाह्य वैभवाच्या न्यूनाधिक्यावर अवलंबून नसते. "न खलु बहिरुपाधीन् प्रीतयः संश्रयन्ते" म्हणूनच बाह्यतः वैभवांत वावरणाऱ्या दांपत्यांत न दिसणारा रत्युदय, झोपडींत किंवा वनांत दिसून येईल. 'कामिता' ही रत्युदयाचा प्रारंभ आहे. कामितेचें रत्युदयांत पर्यवसान होण्यांत कोणत्याहि प्रकारचें अनौचित्य न जाणवणें हें या पूर्णतेचें स्वरूप आहे,

त्रिवर्गाचें योग्य प्रकारें साधन न झालें तर रत्युदय अनुचित ठरतो. "धर्मादर्थस्ततः कामः कामात् सुखफलोदयः साधीयान्" असें शृंगारतिलकांत कामशास्त्रानुसार म्हटलें असलें, तरी "तेषां समवाये पूर्वो पूर्वो गरीयान्" असें वात्स्यायनमुनींनींच सांगितलें आहे. धर्म, अर्थ व काम यांचा समवाय प्राप्त झाला असतां, धर्म अर्थापेक्षां व अर्थ कामापेक्षां श्रेष्ठ समजावा असा या मुनिवचनाचा आशय आहे.

धर्मतः जी रति इष्ट नव्हे ती शृंगारांत परिणत होत नाहीं. तो स्वैराचार होय. शृंगाराच्या या धर्ममूलक औचित्यावर साहित्यमीमांसकांनीं फार मोठा भर दिला आहे, व त्या दृष्टीनेंच साहित्यशास्त्रांत त्यांनीं नायिकाभेद वर्णिले आहेत. "नायिका स्वकीया, परकीया, सामान्याच इति त्रेधा। स्वयमूढा शीलादिमती स्वीया। परोढा परस्त्री कन्याच। परेणोढा परस्य स्त्री परस्त्री। साच नाङ्गिनि रसे उपकारिणी। अवरुद्धापि परस्त्री इत्युच्यते। कन्या तु पित्राद्यायत्तत्वात् अनूढाऽपि परस्त्री इत्युच्यते। गणिका सामान्या। केवलं धनलाभालम्बनेन कृत्रिमप्रेमत्वात् ॥" असें हेमचंद्र म्हणतो: नायकाचा जिच्याशीं विवाह



अनुक्रमणिका

झाला असून जी शीलवती आहे व शिवाय ऋजुता व गृहाचारनिपुणता जिच्या ठिकाणीं आहे, तीच स्त्री नायकाच्या रतिभावाचें आलंबन होऊं शकते. परस्त्री म्हणजे दुसऱ्याची पत्नी किंवा त्याची अवरुद्ध स्त्री. अशा स्त्रीच्या संबंधांत रतिभाव संभवतच नाहीं. परस्त्रीचा दुसरा प्रकार म्हणजे कन्या. ती कन्याभावांत पित्याच्या स्वाधीन असल्यानें परस्त्रीच होय. तिच्या ठिकाणीं अभिलाषा संभवते. अभिलाषा ही रतिभावाला पोषक होईल; पण ती स्वतः रतिस्वरूप नाहीं. ती कामितारूप आहे व विवाहपूर्वविप्रलंभाचा ती हेतु होऊं शकते. गणिका ही साधारण स्त्री आहे. तिचें आलंबन नायक नसून धन हें आहे. म्हणून तिचें प्रेमहि कृत्रिम आहे. धननिरपेक्षतेनें नायकाशीं एकनिष्ठ असणारी गणिका मात्र रतीचें आलंबन होतें; कारण तिच्या ठिकाणीं कन्येप्रमाणेंच वधूत्व येण्याची शक्यता असते. मृच्छकटिकांतील वसंतसेना याचें उत्तम उदाहरण होय.

सारांश, नायकाशीं विवाहबद्ध झालेली, शीलवती, निष्कपट, गृहाचारनिपुण स्त्री आणि नायकाच्या दृष्टीनें जिला वधूत्व प्राप्त होऊं शकेल (म्हणजे नायकाशीं विवाहबद्ध होण्यास जिला प्रत्यवाय येणार नसेल) अशी कन्या, अशा दोनच नायिका रतिभावाचें उचित आलंबन होऊं शकतात. यांच्याच आलंबनावर शृंगाराचा आविष्कार होऊं शकतो; म्हणून त्याच शृंगारनायिका होत. इतर स्त्रियांच्या बाबतींतील तथाकथित शृंगार हा केवळ शृंगाराभास होय.

अमरूचें वैशिष्ट्य असें कीं, त्यानें शृंगाराची ही मर्यादा कटाक्षानें पाळली आहे. अमरूच्या शृंगारिक पद्यांतील सर्व नायिका विवाहित आहेत, शीलयुक्त आहेत, निष्कपटी आहेत, आणि गृहाचारदक्ष आहेत. एकाच पद्यांतील नायिका कन्या आहे. त्या पद्यांत अमरूनें तिचा प्रथमानुराग अभिव्यक्त केला आहे :

*अलसवलितैः प्रेमार्द्रार्द्रैः मुहुर्मुकुलीकृतैः*  
*क्षणमभिमुखैर्लज्जालोलैर्निमेष पराङ्मुखैः ।*  
*हृदयनिहितं भावाकूतं वमद्भिरिवेक्षणैः*  
*कथय सुकृती कोऽयं मुग्धे त्वयाद्य*  
*विलोक्यते ॥ अ. श. ४*

तारुण्यांत पदार्पण केलेली एक मुग्ध बाला कोणाकडे तरी राहून राहून पहात होती. तिच्या मैत्रिणीच्या हें लक्षांत आलें. तेव्हां जवळपास कोणी नाहीं हें पाहून ती मैत्रीण म्हणते, "असा

कोण ग पुण्यवान् आहे कीं ज्याच्याकडे तूं राहून राहून पाहतेस? आणि पाहण्याच्याहि कितीं तऱ्हा! एकदां अगदीं हळूंच कटाक्ष फेकलेले दिसतात, तर मधूनच प्रेमार्द्र होऊन तुझे डोळे अर्धोन्मीलित झालेले दिसतात. क्षणभर त्याच्याकडे निरखून पाहतेस, तोंच तुझी दृष्टि लज्जातरल होऊन लगेलीच पराङ्मुख होते. पण तीहि क्षणभरच. असं वाटतं कीं हृदयांत आजवर सांठवून सांठवून ठेवलेले अभिलापविशेष (भावाकूत) आज तुझ्या नजरेनजरेंतून नुसते ओसंडत आहेत!"

अमरूचें हें एकच पद्य त्याचें वैशिष्ट्य दाखवितें. नायिका मुग्धावस्थेंतील आहे. तिला प्रेमाची स्पष्ट कल्पना नाहीं. पण वयःसंधीच्या अवस्थेंत कन्यकांच्या हृदयांत उदित होणारे, पण लज्जेमुळें प्रकट न होऊं दिलेले मधुरभाव तिच्या हृदयांत शिगोशीग भरलेले आहेत. आज त्या हृदयाला किंचित्सा धक्का बसतांच ते जणूं नेत्रद्वारानें ओसंडत बाहेर आले. ही संपूर्ण स्थिति 'वमद्भिः' या एका शब्दांतून अभिव्यक्त झाली आहे. 'भावाकूत' या शब्दांतील अभिप्राय असा: आकूत म्हणजे संकल्पविशेष किंवा मनोराज्य. या मनोराज्यांनीं तिचें हृदय व्यापलेलें आहे. पण हीं मनोराज्यें केवळ आकाशचित्रें नव्हेत. तीं भावरूप आहेत. पूर्वावस्थेंत शांत असलेल्या मनाचे यौवनोद्भेदामुळें होणारे ते परिणामरूप आविष्कार आहेत. यौवनागमाबरोबर त्या मुग्धेच्या मनोभूमींत स्वभावतःच जें बीज अंकुरावयास लागलें, त्याची अंकुर प्रकट होण्यापूर्वीची भूमींतच होणारी उच्छूनावस्था म्हणजे भाव होय. या भावरूप संकल्पविशेषांचें प्रथम प्रकटन नेहमीं ज्या दृष्टींतून होत असते, ती दृष्टि येथें अमरूनें प्रत्यक्षवत् उभी केली आहे. ही दृष्टि स्त्रियांचा स्वाभाविक अलंकार होय. भाव, हाव आणि हेला हे यौवनांत पदार्पण केलेल्या मुग्धेचे स्वाभाविक (अयत्नजाः) अलंकार होत. भाव जेव्हां नजरेंतून प्रगट होतो, तेव्हां त्या प्रकटीकरणास 'हाव' असें म्हणतात. हाव हा भावोद्रेकामुळें होणारा दृष्टीचा स्वाभाविक विलास आहे. त्यांतून शृंगार अंकुरतो, पण स्पष्टपणें दिसत नाहीं. तोच जेव्हां शारीरिक हालचालींतून प्रकट व्हावयास लागतो, तेव्हां त्या अवस्थेला 'हेला' म्हणतात. या पद्यामध्यें 'हाव' नामक नाट्यालंकार आहे. दृष्टीचे हे विलास अमरूनें जणूं टिपून घेतल्यासारखे दिसतात. ती बाला कटाक्ष फेकते. पण त्या कटाक्षांत मांथर्य आहे [अलसवलितैः], यौवनाच्या मध्यावस्थेंत येणाऱ्या कटाक्षांची तीव्रता त्यांत नाहीं; दृष्टींत प्रीतीची स्निग्धता आहे [प्रेमार्द्रैः], पण ती अजून प्रवाहित झालेली नाहीं; दर्शनसुखानें दृष्टि अर्धोन्मीलित होते (मुकुलीकृत), पण त्याबरोबरच तिची तृष्णा वाढते; म्हणूनच ती क्षणभर नायकाभिमुख होते, पण लज्जेनें लागलीच बाजूला वळते. पण तीहि क्षणभरच. अशाप्रकारें ती बाला आपलें गुपित एकीकडे झांकीत असतांच दुसरीकडे समकालच तें प्रकट होऊं पाहतें. हाच "**नर्मस्फोट**" होय. (नर्मस्फोटस्तु भावानां सूचितालपरसो लवैः) अशा दृष्टीलाच भरतांनीं '**रतिदृष्टि**' म्हटलें आहे. आणि दृष्टीच्या या विविधतेची कल्पना यावी म्हणूनच अमरूनें "ईक्षणैः" असा बहुवचनी प्रयोग केला आहे. या श्लोकाचें स्वारस्य सांगतांना अखेर अर्जुनवर्मदेव म्हणतो, "अशा दृष्टींचें सौंदर्य हें फक्त अनुभवानेंच प्रतीत होतें. शब्दांनीं त्याचें व्याख्यान करतां येत नाहीं."

वस्तुतः अमरूच्या प्रत्येक श्लोकाचेंच असें आहे. त्यांतील प्रत्येक भावच मुळीं अनुभवैकगम्य आहे. 'प्रतीयमानता' हा अमरूच्या मुक्तकांचा प्राणच आहे. या लेखाच्या प्रारंभीं दिलेलीं भावसंसूचक पद्यें पाहा. त्यांतील नववधूची 'भावप्रगल्भता' खरोखरी वाच्य नाहींच. नवोढेच्या भावोद्रेकांत मान, अमर्ष, कोप यांना मुळीं स्थानच नाहीं. मुग्धावस्थेंतील ऋजुतेंत कोप स्वभावतः तर येत नाहींच, पण तो ओढून ताणून आणला तरी टिकत नाहीं.

गृहिणीच्या प्रेमप्रकर्षांत ईर्ष्यामान कसा टिकत नाहीं याची कबुली एक गृहिणीच देते :

*भ्रूभङ्गे रचितेऽपि दृष्टिरधिकम्*
*सोत्कण्ठमुद्वीक्षते*
*रुद्धायामपि वाचि सस्मितमिदम्*
*दग्धाननं जायते।*
*कार्कश्यं गमितेऽपि चेतसि तनू*
*रोमाञ्चमालम्बते*
*दृष्टे निर्वहणं भविष्यति कथम्*
*मानस्य तस्मिन् जने॥*

"त्याना पाहतांच भ्रुकुटीवर कितीहि आठ्या आणल्या, तरी दृष्टि अधिकच उत्सुकतेनें पाहूं लागते; तोंडाला कुलूप लावून बसलें, तरी या मेल्या मुखावर हंसूं दिसावयास लागतें; मनाला अगदीं कठिण केलें, तरी ही कायाच पुलकित होऊं लागते. आतां हा राग टिकवावा तरी कसा हेंच मला कळत नाहीं."

विवाहित दंपतीच्या जीवनांत प्रेमाचा असा एकछत्री अंमल असतो. पण त्यांत ते आचारातिक्रम होऊं देत नाहींत. घरांत वडीलधारीं माणसें असतात. त्यांच्यासमोर प्रेमाचा पाणचटपणा ते करीत नाहींत. किंबहुना अशा संयमामुळें त्यांच्या प्रेमांत आणखी वेगळीच खुमारी येते. नववधूनें लबाड पोपटाचें तोंड कसें चतुराईनें बंद केलें हें प्रारंभीं सांगितलें. वडिलांचा मान सांभाळूनहि प्रेमी दंपती आपला व्यवहार कसा चातुर्यानें पार पाडतात हें अमरु दाखवितो :

*स्मररसनदीपूरेणोढाः पुनर्गुरुसेतुभिः*
*यदपि विधृतास्तिष्ठन्त्याराद्पूर्णमनोरथाः ।*
*तदपि लिखितप्रख्यैरङ्गैः परस्परमुन्मुखा*
*नयननलिनीनालानीतं पिबन्ति*
*रसं प्रियाः ॥ अ.श. १०४*

प्रेमरसाच्या नदीचा पूर त्यांना वेगानें ओढीत असतो, पण गुरुजनरूपी बांध त्यांना त्या लोंढ्यांत वाहून जाऊं देत नाहींत. मनोरथ अपूर्णच राहिल्यानें ते अभिलाषस्थितींतच असतात. पण असें असलें तरीहि ते परस्परोन्मुख झाले, म्हणजे त्यांचीं अंगें चित्रासारखीं स्तिमित होतात आणि ते प्रेमिक नयनकमलाच्या (दृष्टिरूप) नालांनीं वाहून आणलेला प्रेमरस सारखा प्राशन करतात. या पद्यांत अभिलाष, स्तंभ व औत्सुक्य यांतून संभोगशृंगार अभिव्यक्त झाला आहे.

एवढेंच नव्हे, तर त्यांचें रुसणें फुगणें, कोप व अनुनय हेहि चालत नसतात असें नाहीं. मात्र तेथेंहि आचारातिक्रम होत नाहीं असें अमरु दाखवितो :

*लोलभ्रूलतया विपक्षदिगुप—*
*न्यासेऽवधूतं शिरः*
*तद्वृत्तान्तनिरीक्षणे कृतनम—*
*स्कारो विलक्षः स्थितः ।*
*कोपात् ताम्रकपोलभित्तिनि मुखे*
*दृष्ट्या गतः पादयोः*
*उत्सृष्टो गुरुसन्निधावपि विधि—*
*र्द्वाभ्यां न कालोचितः ॥ अ.श.८३*

पतीनें बाहेर शेजारींच कोणाशीं कांहींसा लघळपणा केला हें वधूच्या लक्षांत आहे. घरामध्यें वडीलधारी मंडळी असल्यानें प्रत्यक्ष बोलून समज देणें शक्य नव्हतें. बरें, बोलण्याला अवसर मिळेतोंवर तो रागहि शिळा व्हायचा. तेव्हां तिनें काय केलें? पतीचें आपल्याकडे लक्ष जातांच भ्रुकुटिक्षेपपूर्वक तिनें शेजारच्या घराकडे पाहिलें व पुन्हा पतीकडे प्रश्नार्थक मुद्रेनें पाहिलें. नायकाच्या तें लक्षांत आलें. पण बनवाबनवी करण्याच्या हेतूनें 'काय निष्कारण आळ घेतेस? तुला नमस्कार असो' असें कुचवल्यान शिरश्चालनपूर्वक हात जोडल्यागत केलें. त्याची दृष्टि मात्र त्यावेळीं 'विलक्ष' होती. ही सर्व बनवाबनवी आहे हें नायिकेनें ओळखलें. "मला बनवतां काय?" अशी भावनेनें ती पाहूं लागली. अरुण झालेलें तिचें मुख पाहतांच मात्र त्यानें अजाणतेच्या भावनेनें दृष्टि खालीं केली व तिच्या पायाकडे लावली. नायिकेचाहि कोप तत्काळ नाहींसा झाला. अमरु म्हणतो : वडिलधाऱ्यांच्या सान्निध्यांतहि त्यांनीं कोपप्रसादनाचा विधि त्यावेळीं उचित अशा प्रकारें पार पाडलाच. हा कोपप्रसादनाचा प्रकार त्यांनीं केला नसता, तर नायिकेचा संपूर्ण दिवस अस्वस्थतेंत गेला असता; तो बोलून केला असता, तर गुरुजनांविषयीं मर्यादेचा अतिक्रम झाला असता. वधूनें अतिक्रम होऊं न देतां पतीला समजहि दिली व आपली प्रसन्नता राखून गोडवा कायम ठेवला.

वरील पद्यांतील नायिका 'मध्या' आहे. तिच्या गृहाचारनिपुणतेचें हें चित्र आहे. तारुण्याच्या 'मुग्धा'वस्थेंतून ती बाहेर पडली, पण तिच्या ठिकाणीं अजून तरुणभावाची प्रगल्भता आली नाहीं. प्रगल्भ नायिकेनें आपला कोप कसा प्रकट केला याचें एक उदाहरण पाहा :

*एकत्रासनसंस्थितिः परिहृता*
*प्रत्युद्गमाद् दूरतः*
*ताम्बूलाहरणच्छलेन रभसा—*
*श्लेषोऽपि संविघ्नितः ।*

*आमचें राज्य !... आमचा राज्यकारभार !... : ९ :*

**काश्मीरची 'काळजी!'**



*आलापोऽपि न मिश्रितः परिजनं*
*व्यापारयत्यन्तिके*
*कान्तं प्रत्युपचारतश्चतुरया*
*कोपः कृतार्थीकृतः ॥ अ. श. १८*

पतीनें शय्यागृहांत प्रवेश करतांच तिनें त्याचें आज दुरूनच उभें राहून स्वागत केलें आणि एकासनावर बसण्याचें सहज टाळलें; तो जवळ आला असतां, 'अगबाई, विडा आणायचा तसाच राहिला' असें म्हणून तिनें आलिंगनहि टाळलें; आणि तो बोलणार असें दिसतांच नोकरांना हांक मारून उद्यांचीं कामें सांगावयास लागली. अशा प्रकारें एकीकडे गृहाचार बरोबर सांभाळीत असतांच तिनें आपला कोपहि प्रकट केला. रतिभावनेनें एकजीव झालेल्या दांपत्याच्या संसारांला अशा प्रकारें रुसव्याफुगव्यांनीं सुद्धां गोडी येत असते. अशा प्रकारचे अनेक बहारीचे प्रसंग अमरूनें चित्रित केले आहेत. एका ठिकाणीं तर तो म्हणतो : "तन्व्यास्तिष्ठतु निर्भर-प्रणयिता मानोऽपि रम्योदयः॥(२७)—तिचें निर्भर प्रेम तर रम्य आहेच, पण तिचा रुसवा (मान) सुद्धां तेवढाच रम्य आहे." आणि त्यावर अर्जुनवर्मदेव म्हणतो, "म्हणूनच ती कोणत्याहि अवस्थेंत स्पृहणीयच आहे (सर्वावस्थासु स्पृहणीया इति भावः)"

विवाहोत्तर दाम्पत्यजीवनांतील या रतिभावाचा आविष्कार कवि जेव्हां आपल्या प्रतिभाबलानें काव्यांतून आविष्कृत करतो, तेव्हां शृंगार रस अभिव्यक्त होतो. अशा शृंगाराचे संभोग व विप्रलंभ असे दोन अंश आहेत. संभोग-विप्रलंभ, संयोग-वियोग, संप्रयोग-विप्रयोग अशा समानार्थक जोड्या आहेत. हे दोन शृंगार नव्हेत; या दोन अंशांनीं बनलेला शृंगार हा एकच रस आहे. पतिपत्नींची ही संयुक्त किंवा वियुक्त अवस्था एकावस्थानमूलक नाहीं. तीं दोघें एकत्र असलीं म्हणजे संयोग, व भिन्न स्थळीं असलीं म्हणजे वियोग, असा यांतील अभिप्राय नाहीं. संयुक्त-वियुक्तावस्था या मनाशीं निगडित आहेत. त्या अंतःकरणवृत्तिविशेषांच्या वाचक आहेत. "मी संयुक्त आहे" ही जाणीव ज्यांत आहे असा शृंगारांश संभोगशृंगार होय. "मी वियुक्त आहे" ही जाणीव ज्यांत आहे असा शृंगारांश विप्रलंभशृंगार होय. म्हणूनच "दम्पत्योर्निशिजल्पतोः" या प्रारंभीं दिलेल्या पद्यांत "लज्जा या व्यभिचारि भावनेंतून अभिव्यक्त झालेला संभोगशृंगार आहे" असें अर्जुनवर्म देव म्हणतो. उलट एकाच शयनावर ईर्ष्येनें तळमळत पडलेल्या दांपत्यांत विप्रलंभच असतो.

संभोग व विप्रलंभ हे शृंगाराचे दोन अंश मिश्रित होऊनच परस्परांना चारुत्व आणतात. विप्रलंभामध्यें संभोगमनोरथ अविच्छिन्न असतोच, पण संभोगांशामध्येंहि विरहाशंका नसेल तर त्याची चारुता कमी होते. स्वाधीन व अनुकूल वस्तूबद्दल ओढ नसण्याचीच शक्यता असते. कामाचें वामत्व तें हेंच. म्हणूनच ज्या काव्यांत या दोन्ही अंशांचें योग्य मिलन प्रतीत होतें, तेथेंच खरोखरी शृंगाराचें अनुपम सौंदर्य पाहावयास मिळतें. अमरूचें पुढील पद्य पाहा :

*एकस्मिन् शयने पराङ्मुखतया*
*वीतोत्तरं ताम्यतोः*
*अन्योन्यं हृदयस्थितेऽप्यनुनये*
*संरक्षतोर्गौरवम् ।*
*दम्पत्योः शनकैरपाङ्गवलनात्*
*मिश्रीभवच्चक्षुषोः*
*भग्नो मानकलिः सहासरभस—*
*व्यावृत्तकण्ठग्रहम् ॥ अ. श. २३*

एकाच शयनावर असलेलें दांपत्य, त्यांचीं उत्तरें प्रत्युत्तरें झाल्यामुळें, परस्परांकडे पाठ करून अस्वस्थपणें पडलें. एकमेकांचा अनुनय करावा असें प्रत्येकाच्या मनांत क्षणोक्षणीं येई पण 'मीच अगोदर कां बोलूं?' असा मान त्यांना अडवूं लागे. हळूं हळूं त्यांची दृष्टि परस्परांकडे वळूं लागली. एकानें पाहावें, दुसरा स्वस्थ पडलेला दिसावा. यानें आपली दृष्टि पुन्हा वळवावी, असा प्रकार सुरू झाला. होतां होतां त्यांचे डोळे परस्परांशीं भिडले मात्र; त्यांचा मानकलह पार भग्न झाला व त्याचक्षणीं दोघांनींहि हंसून परस्परांस गाढ आलिंगन दिलें. येथें विप्रलंभ व संभोग या दोनहि शृंगारांशांचें सुंदर मिलन झालें आहे. प्रणयकोपामुळें येथें विप्रलंभ निर्माण झाला आहे. याहि अवस्थेंत त्यांचा रतिभाव मात्र कायमच होता. कारण अनुनय करण्याचें दोघांच्याहि मनांत येई. पण मान त्यांना एकत्र येऊं देईना. दृष्टिमिलन होतांच तो मान भग्न झाला व त्यांचीं मनें पुन्हा संयुक्त

झालीं. दृष्टिमिलनाबरोबर प्रकट झालेलें हास्य हें त्या मनोमिलनाचें द्योतक होय. त्यामागें आलेलें आलिंगन हा त्या मनोमिलनाचा शारीरिक अनुभव होय. म्हणूनच त्याला अर्थ आहे; मनोमिलनाविरहित होणाऱ्या चुंबनालिंगनांना कसलाच अर्थ नाहीं. अमरूचा एक नायक आपला अनुभव सांगतांना म्हणतो: "मी तिच्या वस्त्राला स्पर्श केला. तिनें तक्रार केली नाहीं; मी तिचें चुंबन घेतलें, तिनें कसलाहि विरोध केला नाहीं; तिला आलिंगन देतांना तिनें अंग चोरलें नाहीं, उलट जणूं तिनें माझ्या बाहूंत आपलें शरीर टाकून दिलें. खरोखरी तिनें कोप व्यक्त करण्याचा आज हा वेगळाच प्रकार शोधला होता.* येथें शरीरदृष्ट्या चुंबनालिंगनादिक असले तरी तो शृंगाराचा संभोगांश नाहीं, येथें मनाची संयुक्तावस्थाच नाहीं, कोपामुळें तिचें मन वियुक्त झालें आहे असें नायकास वाटतें.

सारांश, शृंगाराचे संभोग व विप्रलंभ हे अंश मनोऽवस्थेशीं संबद्ध आहेत. रतिभाव हा शरीरांच्या सहावस्थानाशीं संबद्ध नाहीं. तो मनाच्या संयुक्तावस्थेशीं निगडित आहे. मनाच्या संयुक्तावस्थेंत अनुभवास येणारें सुख हेंच रतिभावाचें बीज आहे. अशा सुखालाच वात्स्यायनमुनींनीं "आभिमानिक संप्रत्यय" अशी संज्ञा वापरली असून 'काम' हा आभिमानिक संप्रत्ययांत स्थित आहे असें म्हटलें आहे.

यामुळेंच अभिलाष, मान व प्रवास हे विप्रलंभाचे हेतु होतात. यापैकीं कुमारींच्या बाबतींत अभिलाषविप्रलंभच संभवतो; मान व प्रवास यामुळें होणारे विप्रलंभ संभवत नाहींत. पतिपत्नीमध्यें मात्र सर्वच विप्रलंभ संभवतात. मानामध्यें प्रणयकोप व ईर्ष्याकोप हे दोन्ही प्रकार येतात. यांचीं उदाहरणें मागें आलेलीं आहेत. अभिलाषविप्रलंभाचा शेवट अभिलाषापूर्तीमुळें होतो. मानविप्रलंभ अनुनयानें नाहींसा होतो. त्यामुळें ते अल्पकालिकहि असूं शकतात. प्रवासविप्रलंभाचें मात्र तसें नाहीं. प्रवासविप्रलंभांत पतिपत्नींचा रतिभाव व त्यांची कर्तव्यबुद्धि या दोहोंचीहि परीक्षा होते, व या दोहोंच्याहि कसोटींत तीं उतरलीं, तर त्यानंतर होणाऱ्या त्यांच्या मीलनांत त्यांचें संपूर्ण जीवनच नवीकृत होतें.

ज्या कालांत अमरु झाला, त्या कालांतील प्रवासाची स्थिति लक्षांत घेतल्याशिवाय आज आपल्याला प्रवासविप्रलंभाची नीट कल्पनाच येणार नाहीं. आजच्या प्रवासांत विरहाची तीव्रता पूर्वीइतकी जाणवत नाहीं. पतिपत्नींना आज कितीहि अंतरावर राहण्याचा प्रसंग आला, तरी निदान पत्रद्वारें तरी त्यांच्या भेटीगांठी होऊं शकतात. टेलिफोनच्या व्यवस्थेंत परस्परांशीं बोलतांहि येते. पूर्वीच्या काळीं असें कोणतेंच साधन नसे. पति एकदां प्रवासाला गेला, म्हणजे तो परत आल्यावरच आपला, अशी अवस्था असे. त्यामुळें प्रवासाचा प्रसंग हा दंपतीच्या जिवावरचाच प्रसंग असे. "किं सौख्यं ननु चाप्रवासगमनम्—सुख कोणतें ? प्रवासाचा प्रसंग न येणं" असें भर्तृहरीनें म्हटलें आहे तें यामुळेंच.

पण असें असलें तरी प्रवास टाळतां येणें शक्य नव्हतें. संसार सुखाचा खरा, पण पैशाशिवाय तो चालत नाहीं. पैसा कमावायचा म्हणजे दूरदेशीं गेलेंच पाहिजे; आणि तेंहि तारुण्यांतच. अर्थ आणि काम यांचा वात्स्यायनांनीं सांगितलेला समवायप्रसंग अशा वेळीं येई. जे कर्तव्यहीन असत, ते अशा वेळीं घाबरून अर्थपराङ्मुख होत. पण जे जबाबदार पतिपत्नी असत, ते अशा वेळीं प्रेमानें, पण तेवढ्याच धीरानेंहि परस्परांचा निरोप घेत. अशा विरहांतच त्यांच्या प्रीतीचीहि परीक्षा होई.

अमरूनें प्रवासविप्रलंभाचीं अत्यंत भावपूर्ण चित्रें काढलीं आहेत. पतीनें पत्नीला आपला प्रवासाचा बेत कळविला. पत्नी आतां मुग्धा नव्हती, तारुण्याच्या प्रगल्भ अवस्थेंत होती. कितीहि नको असला तरी प्रवास टाळणें तिला योग्य वाटलें नाहीं. ती म्हणते :

*गन्तव्यं यदि नाम निश्चित महो*
*गन्तासि केयं त्वरा*
*द्वित्राण्येव दिनानि तिष्ठतु भवान्*
*पश्यामि यावन्मुखम् ।*
*संसारे घटिकाप्रणालविगलद्—*
*वारा समे जीविते*
*को जानाति पुनस्त्वया सह मम*
*स्याद् वा न वा सङ्गमः ॥*

---

** आयस्ता कलहं पुरेव कुरुते*
*न स्रंसने वाससो*
*भुग्नभ्रूरतिखण्डयमानमधरम्*
*धत्ते न केशग्रहे ।*
*अंगान्यर्पयति स्वयं भवति नो*
*वामा हठालिङ्गने*
*तन्व्याशिक्षित एष सम्प्रति पुनः*
*कोपप्रकारोऽपरः ॥ अ. श. १०६*

"जायचें टरलेंच आहे तर मग आपण जाणारच. पण ही आतांच घाई का? आणखी दोन तीन दिवस थांबावें एवढेंच मी म्हणतें. तेवढ्यांत मी आपली मूर्ति डोळ्यांत सांठवून घेईन. संसाराच्या सारख्या फिरणाऱ्या या रहाटगाडग्यांत जीवित म्हणजे पाण्यासारखें. जरा कललें कीं सांडलेंच. अशा अवस्थेंत आपली माझी पुन्हा भेट होईल कीं नाहीं हें कोणी सांगावें?"

मनाच्या अशा अवस्थेंत तीन दिवसांनीं त्यांनीं परस्परांचा निरोप घेतला. निरोप घेतांना तो म्हणतो :

*"याताः किं न मिलन्ति सुन्दरि पुनः*
*चिन्ता त्वया मत्कृते*
*नो कार्या नितरां कृशासि—"*

"प्रवासाला गेलेले परत येतच नाहींत असें थोडेंच आहे? माझी मुळींच चिंता करूं नकोस. अगोदरच तूं किती रोडावलीस—"

भरल्या नेत्रांनीं, मात्र एकहि अश्रू गळूं न देतां (निपतत्पीताश्रुणा) तिनें त्याला निरोप दिला. तो वाट चालूं लागला. तो दिसेनासा होईपर्यंत हिची दृष्टि त्याच्या मागोमाग गेली. मग ती परत फिरली.

कित्येक दिवस गेले. आजार नसतांहि ती कृश होत गेली. शेजारणी-मैत्रिणींना चिंता वाटूं लागली. तिची अवस्था पाहून त्यांच्याच डोळ्यांना पाणी येई. पण तीच उलट त्यांना म्हणे :

*यास्यामीति समुद्यतस्य गदितम्*
*विस्रब्धमाकर्णितम्*
*गच्छन् दूरमुपेक्षितो मुहुरसौ*
*व्यावृत्य तिष्ठन्नपि ।*
*तच्छून्ये पुनरास्थितास्मि भवने*
*प्राणास्त एते दृढाः*
*सख्यस्तिष्ठत जीवितव्यसनिनी*
*दम्भादहं रोदिमि ॥ अ. श. ७१*

"तुम्हीच नाहीं का पाहिलं कीं "प्रवासाचा बेत नक्की झाला" असें त्यांचें बोलणें मी स्तब्धपणें ऐकलें. जात असतां ते सारखे मागें वळूनवळून पाहात होते, त्याचीहि मी उपेक्षाच केली ना? आणि आतां त्यांच्या विरहित शून्यवत् असणाऱ्या या घरांत मी राहतेंच ना? मग सख्यांनो, तुम्ही कां घाबरतां? धीर धरा. माझे प्राण पक्के आहेत. व मलाहि जगावयाचें आहे. मी रडतें हें खरें, पण तें उगीच!"

आणि तिकडे दूरदेशाला गेलेल्या पतीची काय अवस्था होई? अमरु सांगतो :

*देशैरन्तरिता शतैश्च सरिता—*
*मुर्वीभृतां काननैः*
*यत्नेनापि न याति लोचनपथम्*
*कान्तेति जानन्नपि ।*
*उद्ग्रीवश्चरणावरुद्धवसुधः*
*प्रोन्मुच्य सास्रे दृशौ*
*तामाशां पथिकस्तथापि किमपि—*
*ध्यायन् पुनर्वीक्षते ॥ अ. श ११*

आपल्या आणि प्रियेच्या मध्यें किती तरी देश आहेत, शेंकडों नद्या, आणि पर्वतावरील अरण्यें पसरलेलीं आहेत, हें त्याला दिसत होतें. कितीहि प्रयत्न केला तरी प्रिया नयन-गोचर होणें शक्य नाहीं हें त्याला कळत होतें. तरी पण तो पथिक मधूनच थांबे, मान उंच करी, आणि कसलें तरी चिंतन करीत आपली अश्रुपूर्ण नजर त्याच दिशेला टाकी.

हेहि दिवस संपले. एके दिवशीं सकाळीं तो अवचित येऊन उतरला. आई, वडील व इतर त्याला पाहतांच त्याच्याजवळ गेले. कांहीं अंतरावरून तिनेंहि पण त्याच्याकडे पाहिलें. याला तिच्या डोळ्यांतील पाणी दिसलें. आणि एक दीर्घ निःश्वास ऐकूं आला. तो अश्रू म्हणजे आजवर प्रदीप्त झालेल्या विरहाग्नीवर पडलेला पहिला पाण्याचा थेंब होता, व त्यामुळें निघालेली पहिली धूमलेखा म्हणजे तो निःश्वास होता असेंच त्याला वाटलें :

*तन्वङ्ग्या गुरुसन्निधौ नयनयोः*
*यद्वारि संस्तम्भितम्*
*तेनान्तर्गलितेन मन्मथशिखी*
*सिक्तो वियोगोद्भवः ।*
*मन्ये तस्य निरस्यमानकिरण—*
*स्यैषा मुखेनोद्गता*
*श्वासायाससमाकुलालिसरणि—*
*व्याजेन धूमावली ॥ अ.श. १६*

रात्रीं तो शय्यागृहाकडे वळला. त्याला मागला एक प्रसंग आठवला. विवाहानंतर या गृहांत तो प्रथमच शिरला, तेव्हां त्या गृहाच्या दारावर नीलकमलाची वंदनमाला (तोरण) बांधली होती. तेथून मंचकाकडे जातांना त्याच्यावर फुलें उधळलीं गेलीं होतीं. मंचकापाशीं येतांच त्याला अर्घ देण्यांत आला होता. अशा प्रकारें पहिल्या रात्रीं त्याचें मंगलपूर्वक स्वागत झालें होतें. हा सर्व प्रसंग त्याला आज तेथें शिरतांना आठवला. तो दाराशीं जातांच आजहि त्याचें स्वागत झालें पण तें सर्वस्वी वेगळें होतें. अमरु सांगतो :

*दीर्घा वन्दनमालिका विरचिता*
*दृष्टयैव नेन्दीवरैः*
*पुष्पाणां प्रकरः स्मितेन रचितो*
*नो कुन्दजात्यादिभिः ।*
*दत्तः स्वेदमुचा पयोधरभरे—*
*णार्घो न कुम्भाम्भसा*
*स्वैरेवावयवैः प्रियस्य विशतः*
*तन्व्या कृतं मङ्गलम् ॥* अ. श. ४५

आज त्याला वंदनमालिका दिसली, पण ती नीलकमलांची नव्हती, दृष्टीची होती; त्याच्यावर आजहि फुलें उधळलीं गेलीं, पण तीं जाई-कुंदांचीं नसून मंद हास्याचीं होतीं. आजहि त्याला अर्घ दिला, पण तो कुंभांतील पाण्यानें नव्हे, तर स्तनांवरील घर्मबिंदूंनीं. अशा प्रकारें तो शय्यागृहांत शिरतांच तिनें आपल्या अंगप्रत्यंगांनींच त्याचें स्वागत केलें. पहिल्या रात्रीप्रमाणेंच आजहि ती 'वासकसज्जा' होती. पण आजचा प्रकार वेगळाच होता.

आणि त्याच्या बाहुपाशांत ती असतांनाच तो विचारूं लागला :

*अङ्गानामतितानवं कुत इदम्*
*कस्मादकस्मादिदम्*
*मुग्धे पाण्डुकपोलमाननमिति*
*प्राणेश्वरे पृच्छति ।*
*तन्व्या सर्वमिदं स्वभावत इति*
*व्याहृत्य पक्ष्मान्तर—*
*व्यापी बाष्पभरस्तया वलितया*
*निःश्वस्य मुक्तोऽन्यतः ॥* अ.श.५०

"प्रिये, तूं एवढी कशी रोडावलीस ? आणि हें मुख, हे गाल किती फिकट झाले ?" ती म्हणाली, "छे छे, माझी मुळची प्रकृतीच तशी आहे !" मात्र लागलीच तिनें मान वळवली, त्यावेळीं तिच्या पापणीवरून अश्रू आणि ओठावरून निःश्वास समकालच ओसरतांना दिसत होते.

आणि नंतर...

अमरु आपणास नंतरचें फक्त एवढेंच सांगतो :

*चिरविरहिणोरत्युत्कण्ठाश्लथीकृतगात्रयोः*
*नवमिव जगज्जातं भूयश्चिरादभिनन्दतोः ।*
*कथमपि दिने दीर्घे याते निशामधिरूढयोः*
*प्रसरति कथा बह्वी यूनोर्यथा न*
*तथा रतिः ॥* अ. श. ४४

"त्यांनीं दीर्घकाल विरह भोगला होता; उत्कंठेनें त्यांचीं गात्रें विकल झालीं होतीं; आज किती तरी काळानें भेटीचा आनंद तीं अनुभवीत होतीं; सर्व जगच आज पुन्हा नवीन झालें असें त्यांना वाटत होतें; दिवसाचा तो दीर्घ काळ त्यांनीं कसा तरी घालवला होता आणि आतां रात्रीं ते भेटत होते. त्या रात्रीं त्यांच्या नाना प्रकारच्या जेवढ्या गोष्टी झाल्या, तेवढे रतिविलास झाले नाहींत. "अविरत गतयामा रात्रिरेव व्यरंसीत्—गत संपली पण गोष्टी संपल्या नाहींत" असें भवभूति म्हणतो. अमरूचाहि हाच अभिप्राय नाहीं काय ?

विवाहितांच्या प्रेममय जीवनाचें अमरूनें असें भावरम्य चित्रण आपल्या शृंगारिक पद्यांतून केलें आहे. विविधतेनें नटलेल्या त्या जीवनाच्या नाजुक छटा त्यानें हळुवारपणें रंगवलेल्या आहेत. त्यांतून वर दिलेलीं पद्यें केवळ वानगीदाखल आहेत. अमरूच्या काव्याचें वैचित्र्य आस्वादावयास अमरूचीं सर्वच मुक्तकें वाचावयास हवींत.

हीं मुक्तकें बाराशें वर्षांपूर्वींचीं आहेत. त्या वेळच्या गृहजीवनाहून आजचें जीवन वेगळें दिसत असलें, तरी दांपत्यप्रेमांतील विविध भाव आजहि तसेच चिरंतन आहेत. म्हणूनच अमरूच्या पद्यांतील शतकांपूर्वींचा प्रत्यय रसिकांच्या प्रत्ययास आजसुद्धां तेवढ्याच ताजेपणानें जाणवेल असा प्रस्तुत लेखकाचा विश्वास आहे.

• • •





अनुक्रमणिका



# सौदा

विजय तेंडुलकर

*जगाच्या बाजारांत सुखाचासुद्धां सौदाच करावा लागतो ! कुणाला तत्त्वं सोडावीं लागतात, कुणाला सहकारी तोडावे लागतात. पण राम देशमुखला द्यावी लागलेली किंमत फारच भयंकर होती....*

झिरझिरत्या पावसाच्या एका दिवशीं तो आमच्या कचेरीच्या दाराशीं आला. धुवट सदरा आणि लेंगा असा त्याचा पोषाक होता. एका हातांत एक लखोटा आणि दुसऱ्या हातांत थोडी भिजलेली छत्री होती.

"मे आय कम इन ?" त्यानं शाळकरी मुलासारखं भेदरट अदबीनं विचारलं.

"संपादक नाहींत." मी त्याला न्याहाळत किंचित् हंसत म्हणालों, "पण तुम्ही आंत यायला कांहींच हरकत नाहीं."

क्षणभरांत त्याच्या मुद्रेवरचा शाळकरी कावरेबावरेपणा एकदम कोसळला आणि गोबरे गाल पसरून तो हंसला, स्वतःलाच हंसला. आंत आला. कोपऱ्यांत छत्रीसाठीं जागा हेरून त्यानें तिथें छत्री काळजीपूर्वक टेकून ठेवली.

"बसा." मी म्हणालों.

तो खुषीनें बसला. इतस्ततः अभ्यासू नजरेनें पाहूं लागला.

"आतां बोला. काय काम आहे तुमचं ?" मी विचारलं.

"काम...संपादकांशीं होतं माझं काम–" त्यानं पुन्हा स्वतःला किंचित् चोरून घेतलं.

"तर मग पुन्हा यायला हवं तुम्हांला." मीं सांगितलं, "संपादक तर नाहींत."

माझ्याकडे पहात त्यानें कचरतच विचारलं, "आणि मग तुम्ही-आपण कोण ?"

"मी ?" मी म्हणालों, "मी कारकून इथला." माझ्या पुढ्यांतल्या प्रुफांवरची त्याची नजर हेरून पुढें म्हणालों, "प्रुफंही मीच पहातों."

"त्या स्थानानं वेगळे दिसतं." तो पटदिशीं बोलला.

मला आश्चर्य वाटलं. कारण हा मुद्दा मला कधीं जाणवलेला नव्हता.

तो लेखक आहे हें त्याच्या हातच्या लखोट्याबरोबरच, माझ्या विषयींच्या त्याच्या त्या एका वाक्यानं मला पटलं होतं.

मी विचारलें, "म्हणजे कसा ?"

उत्तर द्यायला त्यानं जरा वेळ घेतला. बोललों तें उगाच बोललों असंही त्याला क्षणभर वाटलं असावं. तो जरा इकडे तिकडे किंचित् चाळा करून म्हणाला, "तुम्हीच संपादक म्हणून कुणी मला सांगितलं तर मी तें खरें मानेन."

"चेहरे असेच फसवे असतात," मीहि मख्ख गंभीरपणें ऐकवलं, "गोष्ट वगैरे आणली असेल तुम्ही तर ठेवून चला—"

त्यानं जवळचा लखोटा चांचपला. जरा विचार केला. गोबऱ्या गालांनीं किंचित् लाजरं हंसत म्हणाला, "दिली असती, द्यायला हरकत नाहीं, पण संपादक भेटले असते म्हणजे—"

"संपादकांनाच वाचायला देईन मी तुमची गोष्ट." मी आश्वासन दिलं, "महिन्या भरांत तुम्हांला कळेल निर्णय."

"महिना ?" त्यानं मुद्रा कष्टी केली. "महिना म्हणजे फार उशीर होतो. पण आतां आलोंच आहे तर असूं दे ही. तिकिटं आहेतच. जरा लौकरच शक्य तर कळवायला सांगा तुम्ही त्यांना. प्लीज—"

माझ्या होकारावर नमस्कार करून, वळून, छत्री उचलून आणि एकदां मागें वळून मला अविश्वासानेंच न्याहाळून तो निघून गेला.

गोष्टीवरचं त्याचं नांव मी पाहिलं :

'राम देशमुख बी. ए.'

पदवी वाचून गंमत वाटली. आमच्या काळचीं बी. ए. मुलं आठवलीं.

लेखक म्हणून तो तसा नवा दिसत होता. कारण त्याचं कुठंच कांहीं मी वाचलं नव्हतं, पाहिलं नव्हतं.

● ●

कुठलंही मासिक उत्कृष्ट साहित्यच छापतं हा दावा खोटा. कांहीं वेळां ज्याला आपण 'tolerably good' म्हणतों असंही कांहीं जास्त उजव्या मजकुराअभावीं प्रत्येक मासिकाला छापावं लागत. राम देशमुखची गोष्ट मी छापली. त्याआधीं त्याला तसं पत्रहि पाठवलं. त्यावर त्याचं आभाराचं पत्र आलं. 'असेच मार्गदर्शन आणि आधार देत चला, तुमच्यासारख्या मान्यवर संपादकांच्या अगत्यावरच आम्ही नवे लेखक पहिलीं पावलें टाकायला शिकतों' असं कांहीं तरी त्यानें त्यांत लिहिलं होतं.

त्या सुमारें वर्षभरांत त्याच्या आणखी तीन कीं चार गोष्टी टपालानें आल्या आणि मी त्या स्वीकारून प्रसिद्ध केल्या. टसटशीत भाषा आणि स्वप्नाळु हळवेपणा हें त्यांचं वैशिष्ट्य होतं. दिवाळीला त्याच्याकडून शुभ-चिंतनाचं हातीं तयार केलेलं एक कार्ड आलं. संक्रांतीला पिशवींतला तिळगूळ आला. एकदोनदां मासिकाच्या ताज्या अंकाबाबतचं त्याचं मतही त्यानें 'एक रसिक पण सामान्य वाचक' म्हणून नम्रपणें, कांहींसं स्तुतिपाठकाच्या सुरांत आणि थोडंसं स्पष्टवक्तेपणानं कळवलं. आणि

एकदां तो येऊन गेला तेव्हां मी कचेरींत नव्हतों. 'संपादक नाहींत' असं त्याला छापखान्याच्या माणसांकडून सांगण्यांत आलं. 'पण इथं एक कारकून असतात ते कुठं गेले?' या त्याच्या पृच्छेवर 'कारकून नाहीं' असं कांहींतरी संदिग्धच उत्तर त्याला मिळालं. तो गेला. त्यानं नवी गोष्ट वगैरे मागें ठेवली नव्हती.

पुढें बरेच दिवस त्याच्याकडून कांहीं साहित्य आलं नाहीं. आवर्जून मागावं असं कांहीं त्यानं त्याआधीं लिहिलेलं नव्हतं; म्हणून मीही त्याला कधीं लिहिलं नाहीं.

आणि एक दिवशीं इन्कमटॅक्स ऑफिसच्या इमारतींत तो मला सामोरा आला. आतां तो इस्त्रीच्या शर्टतुमानींत होता. त्यामुळें उंच वाटत होता. गालांचा गोबरेपणा बराच ओसरला होता आणि त्यावर थोडी निबराई आली होती. उगीच किंचित् मिशाही त्यानें राखल्या होत्या.

"नमस्कार हो—" मला हटकून जरा जूनच सुरांत त्यानें हंसत म्हटलं, "ओळख आहे का?"

"हो." मी किंचित् चांचपडत म्हणालों, "तुम्ही राम देशपांडे."

"देशमुख." जरा विरसून त्यानं मला दुरुस्त केलं, "तुम्ही असतां त्या मासिकांत लिहीत होतों मी. एकदां भेटलोंही होतों आपण."

मी मान हलवली. "आठवलं." मी म्हणालों.

तिथल्या माझ्या कामाचं स्वरूप त्यानें विचारलं आणि माझ्याकडून तें कळल्यावर अगत्यानं, आपलं काम बाजूला ठेवून मला शक्य ती मदत केली. या संदर्भांत अर्थातच मीच मासिकाचा संपादक-संचालक ही गोष्ट त्याच्या नजरेला आली. पण तो कांहीं बोलला नाहीं. त्यानं आश्चर्यही दाखवलं नाहीं. तो फक्त किंचित् हंसला.

काम झाल्यावर मी त्याचे आभार मानून त्याचा निरोप घेऊं लागलों. तेव्हां तो म्हणाला, "चला, चहा घेऊं. तुम्ही रोज थोडेच भेटणार? आज भेटलांच आहांत तर चहाला नाहीं म्हणूं नका."

कॅंटिनमध्यें त्यानं मला नेलं. चहा आणि बिस्किटं ऑर्डर केलीं. गर्दीगर्दीनं बरींच माणसं त्या आकुंचित जागेंत बसलीं होतीं आणि त्यांतच आम्ही बसलों होतों.

त्यांतल्या त्यांत जरा ऐसपैस होत तो मग म्हणाला, "छान वनवलंत तुम्ही आम्हांला त्या दिवशीं." आणि तोच त्या स्वरगानं मनापासून हंसला. "आम्हीही बावळटच होतों म्हणा तेव्हां. नुकताच मुंबईत आलों होतों मी सांगलीहून. नोकरीच्या शोधांत होतों. तोंवर म्हटलं, चार गोष्टी लिहूं या. लिहिण्याची आवड. आणि लिहून चार पैसे मिळाले तर हवे होते." त्यानें माझ्याकडे जरा रोखूनच पाहिलं. "पण क्वचित् ज्यांनीं दिले असते त्यांना माझ्या गोष्टी आवडल्या नाहींत आणि तुम्हांला त्या आवडल्या, पण तुम्ही पैसे देऊं शकलां नाहींत. असंच ना? लिहून काय, सारा उद्योग फुकट. अखेर म्हटलं, यांत अर्थ नाहीं. आणि बंद केलं लिहिणं. टाइपिंग शिकलों, अकौंटन्सीचा एक कोर्स केला, एक पार्टटाइम जॉबही धरला. तेवढ्यांत ही नोकरी मिळाली."

त्याला मी मोबदला म्हणून कांहीं पाठवलं नव्हतं हें खरं होतं. तें माझ्या मनांतही आलं नव्हतं. आणि इतर अशा लेखकांप्रमाणें त्यानेंही कधीं एकाद्या पत्रानं मला त्याबद्दल रागवून वा दीनपणानं विचारलं नव्हतं.

मी दिलगीर न होण्याचा प्रयत्न करीत म्हटलं, "सगळ्यांनाच मोब-दला देणं आम्हांला जमत नाहीं."

"पण तुम्ही तो द्यायला हवा." अनपेक्षित ठामपणें तो सरळ माझ्या-कडे पहात म्हणाला, "लेखकांचा तो हक्क आहे."

त्यानेंच मग सांवरून तो विषय बदलला. खाण्यापिण्याचं बिल दिलं. आणि जरा घाईनंच माझा निरोप घेतला. "भेटलांत, बरं झालं" असं तो म्हणाला.

● ●

कांहीं काळानं फिरून त्याचा एक लखोटा टपालानं कचेरींत आला. सोबतच्या पत्रांत होतं, "ओळख आहेच. अलिकडे वेळ होत नाहीं, पण लिहावंसंही एकसारखं वाटत रहातं. यावर लिहावं, त्यावर लिहावं असं सारखं कांहीं ना कांहीं सुचत असतं. आयुष्य नोकरीत चाललं आहे असं वाटतं. आतां मनासारखं लग्नही झालं आहे. सगळं चांगलं आहे. (तुम्हांला भेटूं शकलों नव्हतों. पण आठवणीनं लग्नचिठ्ठी पाठवली

*आमचें राज्य!.... आमचा राज्यकारभार!.... :१०:*

**मद्रासमध्यें 'मातादोर!'**



होती. मिळाली का? लग्नाला आलां नव्हतात. घरच्यांचा विरोध असतांही मी तें केलं. तें एक प्रकरणच आहे.) जास्त चांगलं होणार हेंही दिसतं आहे, कारण वरचे ऑफिसर्स माझ्या कामावर खूष आहेत. पण आयुष्यांत समाधान नाहीं. असो. तुमचा वेळ उगीच घेत नाहीं. सवड काढून निर्णय कळवा. पुरतीचं पोस्टेज सोबत आहेच. आमच्या ऑफिसच्या संबंधांत कांहीं काम लागलं तर जरूर जरूर भेटा—" वगैरे वगैरे.

गोष्ट, पुन्हा एकेवार tolerably good च होती. कथावस्तु जास्त परिपक्व वाटत होती–एवढाच नवा म्हणावा असा गुण. पहिलीं कांहीं पानंही बरींच समर्थपणें लिहिलीं होतीं. त्यानंतर पुढें मग सारंच वाचनीय-तेच्या मर्यादेत अनावर, कुठें फिकं, कुठें ढोबळ असं कांहींतरी झालं होतं. जास्तींत जास्त म्हणजे तो एक चांगलाच 'प्रयत्न' होता.

रिवाजाप्रमाणें, मी ती गोष्ट प्रसिद्ध केली. या वेळीं आधीं निर्णय कळवणं खरं तर राहून गेलं आणि मग म्हटलं कीं पाठवावा एकदम अंकच. तेवढंच 'सप्राइज.'

याही वेळीं मोबदला पाठवला नाहीं. मनांत त्याचे ते जुने उद्गार येऊन गेले, परंतु फारसा विचार मी त्यावर केला नाहीं. अखेर केवळ 'छापण्यायोग्य' गोष्टीला मोबदला देऊन माझ्या मासिकासारख्या दुसऱ्या दर्जाच्या मासिकाचं चालणं शक्य नव्हतं.

• •

याच्याही दोन एक वर्षं उलटलीं. माझ्याकडे वा इतरत्र त्याचं कांहींच कुठें वाचलं नव्हतं. इन्कमटॅक्स ऑफिसांत जायचे प्रसंग नंतर कांहीं वेळां येऊनही तो मला भेटला नव्हता आणि मीहि त्याचा आपण होऊन मुद्दाम शोध घेतला नव्हता. त्याचं पत्र नव्हतं, गोष्टही नव्हती.

पण मग एक दिवशीं, नवीन ठेवलेल्या पार्टटाइम हिशेबनिसानं कांहीं कारणानं वर्गणीदारांचं पुस्तक पुढें धरलं आणि त्यांत त्याच पानावर त्याचं नांव दिसलं. राम देशमुख असं तें नव्हतं. आर. व्ही. देशमुख असं होतं. पुढें 'ऑनररी सेक्रेटरी, इन्कमटॅक्स ऑफिस सर्क्युलेशन लायब्ररी' असा हुद्दा होता. मी पाहिलं आणि ओळखलं. पत्त्यामुळें चट-कन् ओळखलं. ही वर्गणी केव्हांपासूनची आहे त्याचा उगाच शोध घेतला. वर्गणी जुनीच, परंतु त्याचं नांव मात्र पत्त्यांत अलिकडेच दाखल झालेलं होतं असं कळलं.

मग सहजच, वाटलं म्हणून आणि वेळही होता म्हणून, त्याला एक कार्ड लिहून 'अलिकडे तुम्ही कांहीं लिहीत नाहीं. एकादी गोष्ट पाठवतां आली तर पाठवा—' असं कळवलं. न राहवून पुढें 'मोबदल्याची शक्यता अद्यापिहि नाहींच' असा ताजा कलम—खरं तर जरा खवचट-पणेंच लिहून ठेवला.

म्हटलं, यावर चिडून तो कांहींतरी लिहील. आणि एकादी गोष्टहि पाठवील.

पण गंमत अशी कीं, गोष्ट आली नाहीं. त्याचं उत्तरही आलं नाहीं.

• •

कैक दिवस गेले. एक दिवशीं भायखळ्याला 'ए' रूटच्या बसमध्यें तो भेटला. आतां तो जास्तच प्रौढ वाटत होता. बराच उतरला होता. अंतर्मुख आणि अस्वस्थही होता. ओळख दाखवण्याइतपत तो किंचित् हंसला. मी हंसलों. माझ्या जुन्या पत्राबद्दल त्यानें कांहीं म्हटलं नाहीं. मीहि संपादकीय आब राखण्यासाठीं, आपण होऊन त्याबद्दल त्याला कांहीं विचारलं नाहीं. स्मरण दिलं नाहीं.

'कसं काय' स्वरूपाच्या माझ्या प्रश्नावर त्यानं बिलकुल बरं नसल्या-सारखं 'बरं आहे' म्हणून उत्तर दिलं. मग तोच, थोडा वेळ गप्प राहिल्यावर म्हणाला,

"आतां कांहीं एक लिहूं नये असंच वाटतं आणि लिहिण्यासारखं खूप कांहींतरी घडतं आहे. तुम्ही आम्हांला निरुत्साही केलंत. लेखकाला नाममात्र एक रुपया मोबदला द्यायलाही जड जातो? छापखान्याला पैसे देतां ते?"

मी मखलपणें म्हटलं, "लेखक ही मासिकाच्या काटकसरीच्या संसारांत सर्वांत बिनमहत्त्वाची आणि विपुल मिळणारी वस्तू आहे, देशमुख! गरजेपेक्षां अधिक मिळतं त्याला मूल्य उरत नाहीं हा अर्थशास्त्राचा नियमच आहे."

"संपादक आणि अर्थशास्त्र बोलतां!" देशमुख कांहींसा विषण्ण हंसून म्हणाला.

त्याला यांत कांहींतरी मोठी आणि दुष्ट विसंगति दिसत असावी.

मग त्यानें तुटकपणें ऐकवलं, त्यांत इतकं कळलं कीं, त्याची बायको प्रथमच गर्भार असतां, नोकरीहून येतांना, बसमधून उतरतांना पडून तिचा गर्भपात झाला होता. मरतां मरतां ती कशीबशी वांचली होती, पण आतां तिची तब्येत कायमची ढांसळून बसली होती. त्यामुळें ती दुबळी, चिडचिडी झाली होती. तिला इतरांचं वागणं असह्य होत होतं आणि ती इतरांना असह्य होत होती. तोही याला अपवाद नव्हता. त्या प्रकरणांतच, शक्य ती खटपट केलीच पाहिजे म्हणून, एकां नव्या स्त्री-





अनुक्रमणिका

रोग-तज्ज्ञाची ॲपॉइंटमेंट घ्यायला आतां तो चालला होता. ऑफिसमध्यें, युनियनचं काम तो करतो म्हणून त्याची 'इन्क्रिमेंट्स्' थांबवण्यांत आलेलीं होतीं आणि या अन्यायामुळेंच युनियनचं काम टाकून शरणागति पत्करणं आतां त्यालाही पटत नव्हतं. सदा करवादलेल्या, कावलेल्या बायकोला त्याचं हें आणि इतरही बरंच वागणं मानवत नव्हतं. मिळून लग्नांतला 'रोमान्स' पार करपून गेला होता. भांडणं वारंवार होत होतीं. तोंडें वाजत होतीं. एकमेकांचा वीट येऊं लागलेला होता. त्याला मुलाची अत्यंत हौस. पण तें नव्हतं आणि आतां होणं वैद्यकीय दृष्ट्या अशक्य होतं.

मध्येंच, स्टॉप आल्यानें तो उतरून गेला. निरोपही न घेतां. अर्धवट सारं टाकून.

मला त्याच्याविषयीं सहानुभूति वाटली. पण ती तितकीच.

कारण त्याच्या परिस्थितींत, चुकचुकण्यापलिकडे, 'विचारा' म्हणण्या-पलिकडे मी तरी काय करूं शकणार होतों ?

• •

आयुष्यांत सुतासारखा तुम्ही एकच माणूस मनांत धरून फार काळ पुढें सरकूं शकत नाहीं. गुंता फार. मग ओळखींचे गोधळ होतात, ऋणानुबंध तुटेपर्यंत तंग होतात, उपकार विसरले जातात; तुम्ही फार विसराळूच होतां.

मासिक आतां जास्त बरं चाललं होतं. मोठ्या जाहिराती ओळखी-देखीनें मिळूं लागल्या होत्या. आणि खपहि पुरेसा होता. वेगळ्या, नवीन योजना, नव्या विस्ताराच्या योजना डोक्यात अस्पष्ट घोळत होत्या. दिल्लीची एक वारीही त्यासाठीं करून आलों होतों. नव्या प्रकाशनाच्या योजनेची अनिश्चित मुदतीची एक पानभर जाहिरात मासिकांत टाकून दिली होती. पुढल्या जुळवाजुळवीच्या दृष्टीनें मनाशीं नवनवे आराखडे काढीत आणि खोडीत होतों.

आणि त्याचं एक कार्ड आलं. तें इंग्रजींत होतं.

"फार दिवसांनीं पत्र लिहितों म्हणून आश्चर्य करूं नका. तुमचं मासिक चाळतों. चांगलं असतं. पत्र लिहिण्याचं कारण, मला कांहीं महत्त्वाच्या कामानिमित्त तुमची भेट हवी आहे. खालीं दिलेल्या नंबरवर आगाऊ फोन करून कृपा करून 'लंच'लाच याल का? मी तुमच्याकडे आलों असतों. परंतु वेळेअभावी तें शक्य नाहीं. तुमची वाट पहातों. —राम देशमुख."

कार्ड वाचून जरा गूढ वाटलं. कशासाठीं हा भेटूं इच्छितो? कसलं काम? असलं औपचारिक कार्ड लिहिण्याचं प्रयोजन काय असावं? मला जेवायला बोलवण्यामागला उद्देश काय असेल? एक कळत होतं कीं हें कांहींतरी वेगळं आहे.

वर्गणीच्या पुस्तकांत आतां इन्कमटॅक्स ऑफिसच्या सर्क्युलेटिंग लायब्ररीचा ऑनररी सेक्रेटरी म्हणून कुणा दुसऱ्याचं नांव होतं.

मी देशमुखच्या भेटीला गेलों.

• •

त्याच्या कचेरींत आतां तो वरच्या अधिकारावर रुजू झाल्यासारखा दिसत होता. त्याची टेबलखुर्ची वेगळी मांडलेली होती. त्याला फोन होता. 'इन्वर्ड' आणि 'आऊटवर्ड'च्यीं खोकीं सरकारी कागद-पत्रांनीं भरून गेलेलीं होतीं. प्यून येऊन तीं वारंवार भरीत आणि रिकामीं करीत होते. देशमुखच्या शर्टावर एक टाय आणि त्याला नाजुक टाय पिन होती. कोट खुर्चीच्या पाठीवर लटकत होता. तो वेगळा वाटत होता. इतका वेगळा कीं, त्याच्याकडे तसा पहात मी कितीही वेळ न कंटाळतां थमलों असतों.

ऑफिसच्या इमारतीनजीकच्या एका निवांत हॉटेलांत आम्ही मग गेलों. त्यानं मोठं जेवण—त्याच्याकरतां आणि माझ्याकरतां—मागवलं. 'संकोच नका करूं' म्हणून मला पुन्हा पुन्हा बजावलं.

मग शर्टाच्या बाह्या नीटसर्या वर दुमडून जरा प्रशस्त बसत तो म्हणाला, "बोला संपादक!"

मी किंचित् हंसलों.

"पत्र वांचून तुम्हांला थोडंसं आश्चर्य वाटलं असेल—"

"वाटलं." मी म्हणालों.

"असंही वाटलं असेल कीं पुन्हा मी एखादी गोष्ट वगैरे—"

माझ्याकडे तो रोखून पहात होता.

"गोष्ट—तसं मनांत येऊन गेलं." मी टेबलावरच्या 'मेनू' कडे आणि त्याच्याकडे आळीपाळीनें पहात म्हणालों, "पण त्याकरतां तुम्ही मला तुमच्या ऑफिसांत बोलवाल हें शक्य वाटलं नाहीं. म्हणून ती कल्पना मी बाद केली."

"बरं केलंत." तो खुर्चीला मागें रेलत सुखानें म्हणाला, "आतां लेखन कायमचं संपलं. आतां कांहीं लिहिणंच शक्य नाहीं. इच्छाही नाहीं आणि तुमच्या साहित्यिक भाषेंत बोलायचं म्हणजे, लेखणीही गंजून गेली आहे." तो हंसला. "जवळच्या कुणाला पत्र लिहायचं तरी

'डिअर सर' आणि 'कॉर्डिअली युअर्स' सुचतं. आयुष्याचाच विचार हल्लीं मी या भाषेंत करतों."

मग जेवण आलं. दरम्यान मासिकाची औपचारिक चौकशी त्यानें केली आणि मीही शक्य ती माहिती—इन्कमटॅक्स ऑफिसमधल्या माणसाशीं मी बोलतों आहें हें एकीकडे ध्यानांत बाळगूनच—दिली.

जेवूं लागतांना मध्येंच थांबून, हुंकारून तो म्हणाला, "आतां काम."

मीहि माझ्या न कळत कांटाचमचा खालीं ठेवला. त्याचं माझ्याकडे असं कोणतं काम असूं शकतं तें माझ्या अद्यापही ध्यानीं येत नव्हतं.

"जेवायचे थांबूं नका." तो मिस्किल होत म्हणाला, "एका वेळीं दोन कामं करायची संवय असेलच तुम्हांला."

आणि मग जेवतां जेवतांच त्यानं आपल्या कामाचं स्वरूप उघड केलं. तो म्हणाला, "एकदम सगळं तुम्हांला संक्षेपानं सांगून टाकलं तर तुम्ही गोंधळाल. गैरसमज करून घ्याल. म्हणून जरा विस्तारानं आणि क्रमशः तुम्हांला ऐकवतों. यांत कांहीं फार व्यक्तिगत गोष्टी सांगाव्या लागतील. पण याआधींही नाहीं म्हटलं तरी मी तुमच्याकडे व्यक्तिगत स्वरूपाचं बरंच बोललों आहें. तुम्हांला लिहून कळवलं आहे. ते दिवस, त्या वेळा मला आठवतात. तें असो; आतां आपल्या कामाबद्दल. तुम्ही पाहिलंत त्याप्रमाणें आतां मला ऑफिसांत वरची जागा मिळाली आहे. त्यासाठीं फार मोबदला द्यावा लागला हें खरं. पण तसं करावंच लागतं. कांहीं हवं असलं, तर कांहीं द्यावंही लागतं कीं नाहीं? आणि तें नेहमींच भारी असतं. युनियनचं काम मी सोडलं. सद्वर्तनाची माफीसह हमी लिहून दिली. कांहीं चहाड्या केल्या. इतर कांहीं, एरवीं कोणाला—किंवा मलाच—अपमानास्पद वाटणाऱ्या गोष्टी केल्या. एकूण बऱ्याच किल्ल्या फिरवून मागचा सगळा 'लांच्छनास्पद' भूतकाळ स्वच्छ धुवून निघेल अशी व्यवस्था केली आणि बदल्यांत मला ही वरची जागा मिळाली. आतां पगार आणि इतर कांहीं उत्पन्नावर मी तसा बराच 'वेलप्लेस्ड' आहे. मला वाटतं 'प्रॉस्परस' देखील किंचित् किंचित् दिसूं लागलों आहे. दिसतों का?"

तो दिसत होताच.

"घरचं म्हणाल तर, बायकोची प्रकृति अद्याप होती तशीच आहे. पण तिच्या मनाप्रमाणं मी एक प्रकारें वागल्यानं आणि तिच्या कल्पनेंतलं सीनेचं वैभव तिला मिळाल्यानं, तिच्या बऱ्याच तक्रारी अलिकडे दूर झाल्या आहेत. ज्या बाकी आहेत त्या किरकोळ आहेत. त्याही राहूं नयेत म्हणून अलिकडेच घरीं सर्व प्रकारच्या कामाला एक बाई ठेवली आहे. ती काम करते आणि माझी बायको उशाला बँकबुक घेऊन पलंगावर मऊ कुशन्समध्यें तिन्ही त्रिकाळ लोळत, न पचणारे बदामपिस्ते चघळत, मराठी रहस्यकथा आणि चित्रपट-साप्ताहिकं वाचत असते. तिच्या आयुष्यांत एवढंच एक उद्दिष्ट उरलं आहे."

त्याचा सूर कोरडा, रुक्ष, किंचित् Sarcastic होता.

"पण हें सांगण्याकरितां कांहीं मी तुम्हांला बोलावलं नाहीं, संपादक. माझं काम असं आहे कीं, बायकोचे वडील म्हणजे माझे सासरे गेल्या वर्षीं वारले. त्यांच्या इस्टेटीपैकीं बेळगांवचें एक घर त्यांनीं बायकोच्या नांवें करून ठेवलं होतं. त्या घराचा दुसरा कांहीं उपयोग आम्हांला नसल्यानें आम्हीं तें नुकतंच विकलं. आलेल्या पैशांतले दहा हजार प्रेमळ बायकोनें मला खाऊला दिले आहेत."

देशमुख विचित्र हंसत होता. त्याच्या जून, Prosperous मुद्रेवर बालिश स्मित विलसत होतं.

"पुन्हा एकवार, आई खाऊला पैसे देते तेव्हां तिला बदल्यांत आपल्याला 'त्रास देणार नाहीं' 'रडणार नाहीं' 'मारामारी करणार नाहीं' 'अभ्यास करीन' 'देवासारखा बसेन' असं कांहींतरी भारी वचन द्यावंच लागतं कीं नाहीं? तसं माझ्या बायकोला मीही एक वचन दिलं आहे. मी तिला एका विशिष्ट व्यक्तीशीं अलिकडे जुळलेले माझे बरेच निकटचे संबंध तोडण्याचं वचन दिलं आहे."

किंचित्काल देशमुख फार भूक लागल्यासारखा नुसता जेवत राहिला. मग हातांतला घांस तसाच ठेवून म्हणाला, "ही व्यक्ति अर्थातच एक स्त्री आहे. कुमारिका आहे—" किंचित्काळ मला त्यानं कसल्याशा संशयानें न्याहाळलं आणि तो पुढें म्हणाला, "फार चांगली आहे. तिला माझी गरज होती आणि मलाही तिची उणीव कालपरवांपासून चांगलीच जाणवते आहे. असं वाटतं कीं, तिच्यामुळें माझं सारं आयुष्य बदललं असतं, त्याला अर्थ आला असता. तो आलाही होता थोडाफार. Any way मी सारं तोडलं आणि बायकोच्या बापाचे दहा हजार पदरांत पाडून घेतले. अखेर जगांत तेवढी एकटीच निरोगी स्त्री नाहीं आणि मीही एकटाच पुरुष नाहीं! मी तिला नकार—कायमचा नकार कळवला आणि त्याला आलेलं तिचं उत्तराचं एन्व्हलप फोडून आंत काय आहे तें बघितलेलंहि नाहीं. आणखी काय असणार?"

देशमुख जेवायचा बंद झाला होता. कांटा उलटासुलटा करून पहात होता. अर्थातच अधोमुख होता. त्याच्या डोक्यावर पडूं लागलेलं टक्कल विरळ केंसांतून डोकावत होतं. किंचित्काल तसाच तो न जेवतां न बोलतां बसला.

"अलिकडे तसे फार मुलींशीं माझे संबंध येतात." तो पुन्हा बोलूं





अनुक्रमणिका

लागला, "बऱ्यापैकीं तरुण मुली ही तशी महागांतली 'कॅमॉडिटी' नसल्याचं माझ्या लक्षांत येऊं लागलं आहे. बायकोला हीं माझीं 'अॅडव्हेन्चर्स' कळत असतात. कधीं संदर्भानें, कधीं कुणाच्या तरी तोंडून. आणि ती तिकडे उत्तम प्रकारें दुर्लक्ष करते. तिचा बँक-अकौंट, बदामपिस्तें, मऊ कुशन्स आणि रहस्यकथा तिला मिळाल्या, म्हणजे त्यापलिकडे तिचं कांहींच म्हणणं नसतं असं मला वाटे. परंतु या मुलीबाबत मात्र तिनं दुर्लक्ष करण्याचं नाकारलं. तिला मनांतून-अशी भीति वाटत होती कीं, मी पुढेंमागें घटस्फोट घेईन आणि तिच्याशीं लग्न करीन—त्या मुलीशीं. तसं झालं नसतंच असं मला पुरतेपणीं म्हणतां येणार नाहीं. तसं व्हायलाच हवं होतं असंही आतां एकेकदां—तें सगळं संपल्यावर—वाटतं. बायकोनं धमकी दिली : तिच्याशीं यानतर संबंध ठेवाल तर मी जीव देईन. तुम्हांला दोष देणारं पत्र लिहून ठेवून मरेन. म्हणजे तुम्हीही अडकाल..."

देशमुख पलिकडच्या टेबलापासच्या कोण्या माणसाकडे टक लावून पहात राहिला. मग जागृति आल्याप्रमाणें दचकून जेवूं लागत तो म्हणाला, "बायकोच्या जीव देण्याचं तसं मला कांहीं कांहीं वाटण्याजोगं नव्हतं. वाटण्याजोगं सारं केव्हांच संपलं होतं. तसं म्हटलं तर आम्ही केव्हांही एकमेकांचे जीव सुखानं घेऊं शकलों असतों. दुःख झालं असतं तें स्वतःच्या जीव जाण्याचंच. ती म्हणत होती तसं मला तिनें त्या प्रकरणांत नक्की गोंवलं असतं आणि हंसत हंसत ती मेली असती याविषयीं मला संशय नव्हता. माझ्या बाबतींत, माझं वाईट व्हावं म्हणून तिनं काय वाटेल तें केलं असतं. म्हणून थोडा विचार केला. हिशेब केला. आणि थंड डोक्यानं नव्या स्वरूपांत तो सौदा तिच्याशीं केला. मला दहा हजार. तिला माझं जिवंतपणीं वाटोळं केल्याचं स्वर्गसुख."

देशमुख मकास हंसत होता. पाण्याच्या ग्लासांत डोकावत होता.

"तर माझं काम असं कीं," तो दीर्घ श्वास घेत अत्यंत कोरड्या सुरांत म्हणाला, "हे दहा हजार मी तुम्हांला देणार आहें. कर्ज म्हणून नव्हे, देणगी नव्हे, बक्षीस नव्हे; मी काय म्हणतों तें समजून घ्या. मला या दहा हजारांचं एक मासिक निघायला हवं आहे. तुम्ही त्या स्वरूपाची एक नवी योजना तुमच्या ताज्या अंकांत जाहीर केली आहे. मला ती पसंत आहे. हें तिच्याकरतां भांडवल. मला हें परत नको. हें जाण्यांत माझं खरं सुख आहे. अट तशी म्हटली तर एकच : दहा हजार संपेपर्यंत मासिक चालू ठेवणं."

मला काय वाटत होतं तें माझं मलाच कळत नव्हतं. मनस्वी उकडत होतं.

"आणि आणखी एक अट," देशमुख मकासपणे निरिच्छ होत पुढें बोलला, "सर्व लेखकांना न चुकतां आणि न कुरकुरतां चांगला मोबदला देणं."

आणि तो घशांतल्या घशांत हंसला. ठसका लागल्याप्रमाणें त्यानें पाण्याचा ग्लास तोंडाला लावून रिकामा केला.

आमचं जेवून संपलं. दोघेही गप्प होतों.

"काय ठरवलंत ?" त्यानें विचारलं. सूर चमत्कारिक, व्यापारी होता. "काय तें आतांच सांगा मला."

मी घसा खाकरला. कसाबसा म्हणालों, "ठीक आहे. पुन्हा भेटतों."

आणि पोळत्या उन्हांतून परत निघून आलों.

● ● ●



## बा. भ. बोरकर

# समुद्रकांठची रात्र.....

*वर्षानुवर्षं कोंडमारा सहन करीत आलेलं मन वंड करून उठलं. मग जनरीतीचा विसर पडला, नीतिनियमांचे बांध ढांसळले; आणि अकल्पित सुखास रथीं सुरेश सिद्ध झाला*

गांवचा मुख्य रस्ता टाकून प्रो. शिरोडकर डाव्या फाट्यानें नारळींच्या बागेंत शिरले आणि आपल्याच तंद्रींत झपझप पावलें टाकीत चालूं लागले. सरत्या चैत्राच्या त्या मावळत्या उन्हांत त्यांची सडपातळ आकृति मोठी आकर्षक दिसत होती. मूर्तींत ताज्या वेताचा लवचिकपणा. कांतीहि तीच. ऐट जरा डाव्या अंगावर वजन टाकून चालायची. त्यांत आज त्यांनीं आपला आवडता पनाम्याचा सूट वापरला होता फिकट हिरव्या रंगाचा. मावळत्या उन्हांत विशेषच खुलून घिसघिसणारा. वेषाची रंगसंगतीहि कशी छान जमली होती ! माडाच्या चुडतीसारखा हिरवा गर्द टाय. त्याला सोन्याच्या फिलिग्रीची पिन टोचलेली. डाव्या हातांत टायपेक्षांहि गडद हिरवी अशी फेल्ट हॅट. उजव्या हातांत 'मरून' रंगाची कातड्याची कोरी करकरीत बॅग आणि पायांत त्याच रंगाचे मुलायम बूट. स्वारी अगदीं खुषींत होती आणि त्यामुळें चालण्याची त्यांची ती विशिष्ट ऐट नेहमींपेक्षां अधिक उठावदारपणें नजरेंत भरत होती.

पायाखालची तांबडी नागमोडी वाट नारळींतल्या वाळवंटांत गायब झाली होती. किनाऱ्यावर आतां कुठून कसें जायचें याचा त्यांना नीट अंदाज घेतां येईना. माडांच्या लांब लांब सावल्यांचीं कोळिष्टकें ठिकठिकाणीं वाळत पडलीं होतीं आणि त्यांत उमटलेल्या पावलांच्या रांगा वाट चुकल्या होत्या. तरी तसेच पांचपंचवीस पावलें ते पुढें चालून गेले. पुन्हां पुन्हां तानुस पिवळी वाळू बुटांत जाऊन त्यांना उपद्रव देऊं लागली. [illegible] किंचित् त्रासले

दी. १६

अनुक्रमणिका

जरा थांबून त्यांनीं वाऱ्यानें चिमचिमणारीं आपलीं काळींभोर झुल्पें डोक्याला झटका देऊन बाजूला सारलीं आणि एखादं माणूस जवळपास दिसतें का याचा ते अंदाज घेऊं लागले. भिरभिरत्या नजरेनें सभोंवार पाहूं लागले. कान फांकून चाहूल घेऊं लागले. असंख्य आवाजांचा काला होऊन त्यांचा एकत्र आवाज बनला आहे आणि भोंवळ येऊन तो घुमत राहिला आहे असें त्यांना वाटलें. तो विचित्र आवाज माडांच्या झुलत्या झावळांचा कीं दूरीपलिकडच्या समुद्राच्या लाटांचा याचा नेमका कयास त्याना करतां येईना. तोंच सफेती केलेला एक दगडी क्रॉस त्यांना दिसला. त्याच्या पायथ्याशीं मळक्या फाटक्या कपड्यांत अंगाची मोटकुळी करून एक म्हातारा बसला होता. डोळ्यावर आलेल्या चपट्या हॅटमुळें त्याचा चेहरा नीट दिसत नव्हता. जवळ जाऊन शिरोडकरांनीं विचारलें,

"कळंगूटच्या किनाऱ्याला इथून कसं जायचं?"

"या दिवसांत होशी लोकांचा तळ पडतो, तो किनारा मागं राहिला, साहेब. तुम्ही वाट चुकलांत. पण असंच नाकासमोर चालत राहिलांत, तर दिवस पडण्यापूर्वी सहज पोंचाल किनाऱ्यावर. मात्र रात्रीं नाचगाणं चालतं तिथं जायचं असेल, तर तिथून डाव्यानें मैलभर तरी तुम्हांला चालावं लागेल." म्हाताऱ्यानें उत्तर दिलें. तो थोडा थांबला आणि पुढें म्हणाला, "मात्र दिवस पडण्यापूर्वी किनाऱ्याला पोंचा बरं का. कारण या बाजूला आम्हां लोकांची 'सिमेट्री' आहे. तिथल्या असंतुष्ट मृतात्म्यांचा हल्लीं उपद्रव सुरू झाला आहे म्हणतात या गांवांत."

"मला सोबत करतां किनाऱ्यापर्यंत? तुमचे श्रम फुकट घेणार नाहीं."

"पाहुण्यासाठीं आम्ही गांवच्या लोकांनीं एवढंसुद्धां नाहीं का करायचं? पण काय करूं? याच अस्वस्थ मृतात्म्यांना शांत करण्यासाठीं या खुरसापुढं आज आम्ही या वाडींतले लोक मेणबत्त्या लावून 'लादाईन' म्हणणार आहोंत."

धर्म बदलला तरी चालत आलेले संकेत आणि समजुती किती प्रभावी असतात आणि प्रत्यक्ष जीवनांत धर्मावर कशी मात करतात याचें हें चालतें बोलतें प्रत्यंतर, असें मनाशीं म्हणत शिरोडकर झपझप वाट चालूं लागले. पण किनारा जवळ येत चालला, तसतसा जमिनीचा भुसभुशीतपणा वाढूं लागला. पावलें उचलायला कष्ट पडूं लागले. बुटांतली वाळू जास्तच उपद्रव देऊं लागली. ती वारंवार काढून टाकण्यासाठीं पुन्हा पुन्हां थांबावें लागलें. उन्हें भरभर पळूं लागलीं. सावल्या वाढूं लागल्या आणि पाण्यांत साखर विरावी, तसा प्रकाश काळोखांत विरत जाऊन आसमंताला एकाएकीं अद्भुत कळा प्राप्त झाली. चर्चची 'आमोरे'ची घंटा वाजली. त्या नादानें हवा कांपल्यासारखी झाली आणि समुद्राच्या लाटांची वाढती गाज जास्तच स्पष्टपणें कानावर येऊं लागली. कातरवेळेच्या त्या जागत्या गाजत्या निस्तब्धतेंत शिरोडकरांच्या साऱ्या संवेदना विलक्षण सचेतन झाल्या. आपलें अंग किंचित् भ्यालें आहे कीं, समुद्रकांठचा आनंद लुटण्यासाठीं अकस्मात् उत्तेजित झालें आहे हें त्यांना नीटसें उलगडेना. एवढें मात्र खरें कीं त्यांच्या अंतःचक्षूंना त्या मागें राहिलेल्या चुनेरी क्रुस पुढें असंख्य रंगीबेरंगी मेणबत्त्या जळत असलेल्या दिसत होत्या आणि अंतःश्रुतींना गांवकन्यांच्या 'लिटनी'चें तालबद्ध प्रार्थनासंगीत ऐकूं येत होतें.

तें किनाऱ्यावर पोंचले तेव्हां आठाचा सुमार होता. अजून मैलभर चालावें लागणार अशा समजानें त्यांनीं डाव्यानें वळून पाहिलें आणि समाधानाचा सुस्कारा टाकला. कारण ती नाचगाण्याची, आनंद करण्याची



अनुक्रमणिका

नागा अगदींच जवळ होती. अवघी आठ दहा मिनिटांच्या वाटेवर. तेथें वाळवंटांत कोवळ्या झावळांचा विस्तीर्ण उघडा मांडव अनेक किट्सन च्या प्रकाशांत चैतन्यानें कसा अगदीं रसरसला होता. बँडची लय सारखी चढत चालली होती. आणि त्या तालावर नेटक्या आणि नटेल वेषांतलीं खिस्ती जोडपीं भिंगरीसारखीं वर्तुळाकार गिरगिरत होतीं.

'म्हाताऱ्याची थोडी गफलत झाली हें एका अर्थी बरंच झालं' असें मनाशीं म्हणत शिरोडकरांनीं शिणवटा घालवण्यासाठीं वाळूंत बैठक मारली. बॅगवर हॅट ठेवून पायांतले बूट काढले. सुवासिक रुमालानें तोंड पुसून घेतलें. सोनेरी केसमधून उंची सिगारेट शिलगावली आणि कधीं मोत्यांच्या राशी ओतीत फुटणाऱ्या प्रचंड काळ्या लाटांकडे तर कधीं बाजूच्या झगमगणाऱ्या मांडवाकडे धुंदावलेल्या डोळ्यांनीं ते पाहूं लागले.

पण त्यांचें मन अंतर्मनांतील स्वप्नागारांत शिरलें होतें. दिवसा संसारांत वावरतांना भक्कम कड्याकुलपें लावून ठेवलेलीं त्याचीं दारें आज त्यांनीं सताड उघडीं केलीं होतीं. ह्याच बुद्धीनें आज ते इकडे यायला निघाले होते. लोकनीतीप्रमाणें थाटलेला बेतलेला आपला संसार, कसोशीनें चारित्र्य पाळण्याची जागरूकता, सरकारी शाळेच्या मुख्याध्यापकाच्या जबाबदाऱ्या, विद्यार्थ्यांच्या चाचणी परीक्षाच्या उत्तरपत्रिका, खात्यांतले हेवेदावे, हें सारें झटकून टाकून ते आले होते. त्यांना समुद्राप्रमाणें सर्वार्थानीं मुक्त व्हायचें होतें, मस्त व्हायचें होतें, तोंड चुकवणाऱ्या तारुण्याला कायमचें पकडून ठेवायचें होतें.

• •

मांडवांत नाचणाऱ्या जोडप्यांच्या त्या पुसट आकृती पहातां पहातां त्यांच्या मनांत आलें : 'लुइझा'नें वारंवार हट्ट घेऊन नाचाचे कितीतरी पदविन्यास आपल्याला शिकवले. त्यानंतर ट्रेनिंग कॉलेजमधें शिकतांना आणि नतर देखील तिच्याबरोबर नाचण्याच्या कितीतरी संधी आपल्याला चालून आल्या. पण भलत्या संकेतांना बळी पडून आपण त्या घालवल्या. संस्कृति, संस्कृति असा जप करीत किती सुनर्थ करून टाकलंय् आपण जीवन! तेव्हां नाचलों असतों, सराव ठेवला असता, तर यांच्याइतकंच चांगलं आपल्यालाहि नसतं का नाचतां आलं? किती लवकर ओळखी झाल्या असत्या, स्नेह जमले असते एकेकाशीं! आणि आनंद कसा क्षणोक्षणीं फुलवतां आला असता! नृत्यांतला प्रत्यक्ष आनंद नाहीं तर नाहीं. डोळ्यांचा आनंद तरी लुटू असें मनाशीं म्हणत ते उठले आणि तयार होऊन मांडवाच्या दिशेनें उत्साहानें चालूं लागले.

ते मांडवाशीं पोंचले, तेव्हां नृत्य अगदीं रंगात आलें होतें. मांडवाच्या बाहेर उघड्यावर अष्टकोनी संगमरवरी मेजें तळ्यातील साळकांप्रमाणें फुललीं होतीं आणि नृत्याचें 'आवर्तन' पुरें करून शिणलेलीं जोडपीं पुन्हां उत्तेजित होण्यासाठीं त्यांच्याभोंवतीं विश्रब्धपणें बसलीं होतीं. कुणी मंद तर कुणी तीव्र मद्याची माफक विरामानें लज्जत घेत होते. स्त्रीपुरुष आपसांत बोलत होते तीं तीं हलक्या आवाजात, स्वरांना आणि हावभावांना संस्कारितेची किंचित् डूब देऊन. जरा जादा अदबीनें. पण खरें संभाषण डोळ्यांनींच होत होतें. त्यामुळें हीं जोडपीं नवरा-बायको नव्हतीं हें उघड होतें. जाड आडव्या पट्ट्यांचीं रंगीबेरंगी तंग गंजिफ्राकें घातलेले कांहीं मुजाड जवान घोळक्या घोळक्यानें पोरींना डोळा घालण्याचा डाव खेळून पहात होते. आपलीं तयार तरुणीं शरीरें मिरवायची हौस अंगविक्षेपांनून पुरवून घेत होते. शिरोडकर कुत्र्यानें बुजल्यासारखे आजूबाजूला पहात एका कडेच्या रिकाम्या मेजाशीं बसले. शुभ्र गणवेषांतल्या काळ्याकुट्ट वेटरनें पाढा म्हटल्याप्रमाणें मादक पेयांचीं भराभर नांवें घेतलीं. त्यांतलें कोणतें पेय मागवावें याचा त्यांना चटकन् निर्णय करतां येईना.

"साधं लेमनेड." ते उद्गारले.

या उत्तरानें वेटर इतका नाराज झालेला दिसला कीं, मनांतल्या मनांत त्यानें आपणाला शिवी हांसडली असावी असें शिरोडकरांना वाटलें आणि आपल्या अंगांत मुरलेल्या सांकेतिक गुलामगिरीची कांहींशी चीड आली. तेवढ्यांत लेमनेडचा फेसाळणारा ग्लास त्यांच्या मेजावर हजर झाला. त्या थंड पेयाचे घुटके घेत ते समोरच्या लाटांचा खेळ पहात राहिले. एक मोठी प्रचंड लाट फुटली. तिनें उधळलेली मोत्यांची रास, किट्सनांच्या प्रकाशाच्या धूसर पसर्यांत चांगलीच उजळून उठली आणि उघड्या पावलांची, पिवळसर गोऱ्या पावलांची, गाद 'मरून' फ्रॉक घातलेली, कुणीतरी तरुण स्त्री समोरून येत असलेली त्यांना दिसली. किती पण माणसामाणसांत साम्य असावें! हें हात उडवीत चालणं, माना वेळावण्याची ही लकब कशी अगदीं तंतोतंत लुइझाच्या सारखी. तीच

आमचें राज्य !.... आमचा राज्यकारभार !.... :१११:

'बुडित' विहार !








असेल का हीं? आपल्याप्रमाणें तिलाहि इकडेच येण्याचं आज सुचलं असेल का?

शिरोडकर अशा विचारांत आहेत तोंच ती तरुण स्त्री मांडवाच्या उत्तरेकडच्या अंगानें निघून गेली.

बसल्या ठिकाणाहूनच त्यांचे डोळे तिचा वेध घेऊं लागले. हो. लुइझाच ती. आतां शंकेला जागाच नव्हती. मांडवाच्या उत्तरेकडच्या खांबाशेजारीं स्टुलावर बसून ती पायांत उंच टांचाचे नाजुक चिमुकले बूट चढवूं लागली. ट्रेनिंग कॉलेजमधें हस्तकौशल्याच्या तासाला फ्रेट वर्कचें काम करतांना ती अशीच बसली होती. आणि आपण चोरट्या नजरेनं तिच्या चंद्रगौर उरोजाच्या फटींतून घरंगळणारा सोन्याचा क्रूस न्याहळीत होतों. तेव्हां लटक्या रागाच्या नजरेनें दटावीत ती आपल्याला म्हणाली होती, "तुम्ही विवाहित ना?" आपण चांचरत म्हणालों होतों, "...पण...पण...मी क्रूस पहात होतों." आणि त्यावर तिनें कोटिक्रम केला होता, "क्रूसच पाह्यचा तर खिडकींतून दिसतो आहे कीं चर्चचा भला थोरला क्रूस." आणि मग ती किती छान शीतल हंसली होती! आणि मग झालेली जखम कशी क्षणार्धांत भरून निघाली होती!

तिनें मान वर केली. आणि ते मनांतल्या मनांत उद्गारले, "लुइझा!" आपण ट्रेनिंग कॉलेजांतून बाहेर पडून सहा वर्षें झालीं. पण तेव्हांच्या पेक्षांहि किती कोवळी दिसते ही! वयानें आपल्याला शिवूं नये अशी किमया तरी कोणती असते या लोकांच्याजवळ?

नृत्याचें आणखी एक आवर्तन संपलें. वाद्यें थांबलीं. आदल्या जोडप्यांची जागा घेणाऱ्या नव्या जोडप्यांच्या ओळी जमूं लागल्या, लागोपाठ तीन पुरुषांनीं 'आपल्याबरोबर नाचशील का?' असें लुइझाला विचारून पाहिलें. पण आपला शब्द गुंतला आहे असें मर्यादशीलपणें सांगून तिनें त्यांना वाटेला लावलें. लुइझा कुणाबरोबर नाचणार आहे हें जाणून घेण्याचें शिरोडकरांचें कुतुहल अगदीं शिगेस आलें. तिचा कुणी प्रियकर, लवकरच तिच्याशीं लग्न करणार असलेला तिचा हृदयवल्लभ, तर आतां तिला बाहुपाशांत घेऊन दिमाखानें नाचणार नसेल? तो कोण असेल? कसा दिसत असेल?

लुइझा एकाएकीं उठली आणि चपळाईनं शिरोडकरांच्या दिशेनेंच

येऊं लागली. अस्ताव्यस्तपणें मांडलेल्या मेजांतून आणि दाटीवाटीनें उभ्या असलेल्या लोकांतून वाट काढीत ती सरळ त्यांच्या मेजाशीं आली आणि म्हणाली, “सुरेश, असा एकटाच बसून काय राहिला आहेस? मिनिटा दोन मिनिटांत वाद्यं वाजूं लागतील. चल निघ.” असें म्हणून तिनें त्यांची बॅग आणि हॅट वेटरच्या हातीं दिली आणि सुरेशला पुरतें बोलूंहि न देतां त्याचा हात धरून ती चालूं लागली.

हतबुद्ध झालेल्या सुरेश शिरोडकरनें तिला म्हटलं,

“अग, माझं हंसं का करणार आहेस चार लोकांत? समारंभांत मी कधीं नाचलों नाहीं आजवर आणि तूं शिकवलं होतंस तें तर मी केव्हांच विसरून गेलोंय्.”

“त्याची तुला नको काळजी. तुला कसं नाचवायचं तें चांगलं माहीत आहे मला.” मिस्किलपणें हंसून तिनें म्हटलें.

“पण तूं घाबरल्यासारखी कां दिसतेस? तुझा हात थंडगार कां?”

“सहा वर्षांनीं भेटतों आहोंत आपण, सुरेश. तुला कळायचं नाहीं तें. मी सारखी तुझी वाट पहात राहिलें आणि तूं मात्र मुद्दाम मला टाळीत आलास. पण आज कसं नेमकं पकडलं तुला!” असें म्हणून लुइझा पुन्हा एकदां हंसली. ती उत्तेजित झाली होती. तिच्या या अनपेक्षित आणि अपूर्व स्नेहवर्षावानें सुरेशहि उत्तेजित झाला. त्याचें सर्वांग तापून निघालें. जोडपीं पवित्र्यांत उभीं राहिलीं. बँड सुरू झाला आणि चार चार पाकळ्यांचीं पावलांचीं साळकें संथ लयींत गिरगिरूं लागलीं. आरंभाला सुरेशला जरा अवघडल्यासारखें झालें. पण लुइझानें त्याला सांभाळून घेतलें आणि लाडिकपणानें ती त्याच्याशीं असा कांहीं मधुर प्रणयसंवाद करूं लागली कीं, सुरेशला वाटलें, आपलें शरीर फुलासारखें हलकें झालें आहे आणि घोट्यांना अचानक पंख फुटले आहेत. वाद्यांची लय वाढली तसा तो पट्टीच्या सराइतासारखा नाचूं लागला. हा हिंदु असून नाचांत इतका तरबेज आहे याची जाणकार मंडळींत कुतुहलपूर्ण चर्चा चालू झाली आणि त्या जाणिवेनें सुरेश अधिकच धुंद होऊन नाचूं लागला. नाच चालला असतांना लुइझाच्या सुखद स्पर्शाच्या लाटांवर तो तरंगत होता. त्याच्या मनावरचा सनातनी संस्काराचा सारा धुरळा पार उडून गेला होता आणि त्याचें रक्त समुद्राच्या पाण्यासारखें प्रवाही, उद्दाम आणि उच्छृंखल झालें होतें. नाच थांबला, तेव्हां लुइझानें त्याला अशा कांहीं



# काळजी



पुणें-दि. १-११-५८

प्रिय चंद्रकान्त यांस,

सप्रेम नमस्कार वि. वि.—

गेले पंधरा दिवसांत तुमचें पत्र नाहीं त्यामुळें फार काळजी वाटत आहे. तरी खुशाली कळवावी.

सध्यां भारताच्या राजधानींत अतिशय धामधूम चालू असल्यामुळें इकडे पत्र लिहिणें आपल्याला साहाजिकच शक्य झालें नसेल. हें जरी खरें असले, तरी आपले माणूस पुण्यांत आहे हें विसरूं नये. आंतरराष्ट्रीय अर्थ व नाणें परिषदेनंतर ‘भारत १९५८’ हें प्रदर्शन दिल्लींत भरलें असल्यामुळें तें पाहाण्यास भारताच्या कानाकोपऱ्यांतून भारतीय नागरिक दिल्लींत टोळधाडीप्रमाणें जमा होणें साहाजिकच आहे. दिवाळीच्या सुट्टींत मी चि. विजय व कलाला घेऊन दिल्लीला आल्यानंतरच सर्व प्रदर्शन पाहायला जाऊं. आधीं एकट्यांनीमात्र जायचें नाहीं बरं कां?

अरे हो, बरी आठवण झाली. किनई तुमच्या दिल्लींत आमचे पुणेकर श्री. बंडोपंत सरपोतदार यांनी कृष्णा मार्केटजवळ, बीडन रोड, करोल बाग, नवी दिल्ली येथें इकडील गणपती चौक, लक्ष्मी रोड येथील पूना गेस्ट हाऊसची शाखा काढली असल्याचे चि. चारुदत्त मला सांगत होता. तेव्हां तुमच्या जेवणाखाण्याची आतां मला काळजी करित बसण्याचे कारण नाहीं. तरी हे पत्रदेखत तुम्हीं पूना गेस्ट-हाऊस, नवी दिल्ली येथेंच सकाळ सायंकाळ जेवणाची व्यवस्था करावी. नाहीं तरी तुम्हीं राहतां तो मित्र करोल बागमध्येंच राहातो. तेथून पूना गेस्ट-हाऊस जवळच असणार. तसेंच ता. ७-११-५८ पासून आपणां सर्वांसाठीं दोन खोल्या त्यांचेकडेच राखून ठेवण्यास सांगणें. आम्हीं ता. ७ ला सकाळीं अमृतसर एक्सप्रेसनें येत आहोत. स्टेशनवर यालच. श्री. व सौ. बंडोपंतांना नमस्कार. कळावें,

तुमचीच
**प्रभा**

अनुक्रमणिका

हलुवार शब्दांत धन्यवाद दिले कीं, तिच्या प्रथम चुंबनाचें माधुर्यच तिनें त्यांत ओतलें असें त्याला वाटलें.

मांडवांतून हंसत खिदळत तीं दोघें बाहेर आलीं आणि मेजाशीं बसलीं. लुइझानें वेटरनें पाद्दा वाचण्याआधींच फर्मावलें, " पिंक शांपेन. "

केवढा वेळ तरी तीं शांपेन पीत बसलीं होतीं. आठवणीचीं पानें चाळीत, त्यांच्यावर गुलाबपाणी शिंपडीत होतीं. मधून मधून सुरेश सिगारेटचे झुरके घेत होता. दोघांच्याहि मनांत जें फार दिवस सांचलें होतें आणि संकोचामुळें जें इतके दिवस बोलतां आलें नव्हतें, तें तीं बोलत होतीं. मधेंच लुइझाच्या मनांत काय आलें कोण जाणे. सुरेशच्या ओठांतली सिगारेट तिनें झटकन् काढून घेतली आणि ती आपल्या लालचुटुक ओठांत धरून तिनें धुराचा फवारा त्याच्या तोंडावर सोडला. लांब पापण्यांचे तिचे आकर्ण नेत्र अधिक धुंद झाले.

" तू सिगारेट ओढतेस हें माहीत नव्हतं मला. नाहीं तर आधीं तुला नजर न करतां ती ओढण्याचा प्रमाद मी केला नसता. " किंचित् ओशाळल्यागत होऊन सुरेशनें म्हटलें.

"आजवर कधीं मी ओढली नाहीं. पण आज मला सगळे संकेत झुगारून द्यायचे आहेत. बेफाम व्हायचं आहे. मनमुक्त जगायचं आहे. भावनांचा खूप खूप कोंडमारा सहन केला मी. कविता फक्त वाचल्या गायल्या. आतां मला त्या जगायच्या आहेत. पडेल ती किंमत देऊन, शीलाची देखील!"

आपली शालीन लुइझा इतकी धीट झालेली पाहून सुरेशला आश्चर्य वाटलें. हिच्या भवितव्याच्या विचारानें त्याचें मन थोडें थरकलेंदेखील. एकीकडून त्याला थोडें बरेंहि वाटलें. तरीहि न राहवून तो म्हणाला, "तूं इतकी बदलशील असें स्वप्नांत देखील मला वाटलं नव्हतं, लुइझा!"

"चारित्र्याच्या खोट्या कल्पनांनीं आपण पदोपदीं जीव पिचून मात्र घेतला आणि शेवटीं मिळवलं काय? तर आत्मतिरस्कार आणि दुसऱ्याचीं सुखं पाहून करून घेतलेला मनोदाह. एवढंच ना?"

सुरेशला ती आपल्याच मनांतलें, आपल्याला ऐकायला नको असलेलें, पण हरघडी प्रत्ययाला येणारें सत्यच बोलते आहे असें वाटलें. पण असलें हें संभाषण बटलरच्या कानीं जाणें बरें नव्हे. एकादें ओळखीचें माणूस

भेटलें तर साऱ्या रंगाचा बेरंग व्हायचा या विचारानें तो तिला म्हणाला, "तूं जिथं उतरली असशील, तिथं एकान्त असेल तर आपण तिथं जाऊं. नसल्यास दूर कुठं तरी वाळूंत जाऊन बसूं. उगीच गांवभर बभ्रा नको व्हायला. पेशानं शिक्षक पडलों ना आपण? दुःखी जग सुखावर घाव घालायला कसं टपलेलं असतं!"

"मला नाहीं जगाची भीति. फार केलं दुसऱ्यासाठीं. आतां मला माझ्यासाठीं जगायचं आहे."

"आणि माझ्यासाठीं नाहीं वाटतं?"

"किती वेडा आहेस! माझ्यासाठीं म्हणजेच तुझ्यासाठीं नाहीं का? तुला इथं संकोच वाटतोय. दिसतंय मला. किती छान बंगला मिळालाय म्हणून सांगूं! आणि एकान्त काय हवा तेवढा! चल आपण तिकडेच जाऊं."

सुरेशच्या कंबरेभोंवतीं हात घालून लुइझा वाळवंटांतून त्याला घेऊन चालली होती. शांपेनचा अंमल माफकच होता. पण त्यांत नऊ वर्षें मुरलेलें प्रणयाचें मद्य मिसळलें गेल्यामुळें आपण फुलांच्या पायघड्यांवरून चालत आहोंत असें सुरेशला वाटत होतें.

• •

पायऱ्या चढून दोघेंहि एका बंगल्याच्या दाराशीं आलीं. काळोखांत ती इमारत किती मोठी आहे याचा नीटसा अंदाज सुरेशला आला नाहीं. पण चमकणाऱ्या तावदानांच्या आकारावरून बंगला कुणातरी श्रीमंताचा आहे या बाबतीं त्याला शंका राहिली नाहीं.

लुइझानें 'मारी' अशी हांक मारतांच टचटचीत ओठांच्या आणि दणकट बांध्याच्या एका 'मुलाटो' मोलकरणीनें दार काढलें. प्रवेशगृहांत एक नक्षीचा दिवा छताला टांगलेला होता. त्यांतून तिथें हे मुख्य दिवाणखान्यांत आलीं. तेथें हंड्याझुंबरें लखलखत होतीं. उंची सामान आणि कोरीव शिसवी फर्निचर अभिरुचीची विदग्धता सांगत होतें. मधलें जेवणाचें प्रशस्त टेबल साजून शैलीच्या चिनी सरंजामासह आगतस्वागतासाठीं सज्ज होतें. चांदीचे चमचे काटे आणि चमचमणाऱ्या सुऱ्या शिस्तींत वाट पहात होत्या आणि सैंपाकघरांतला खमंग आणि गरम वास जेवण तयार असल्याची वर्दी देत होता.

वॉश वगैरे घेऊन लुइझा आणि सुरेश जेवायला बसलीं. मुलाटो मोलकरीण नवा पदार्थ नव्या बशींत वाढीत होती, तत्परतेनें रिकामी बशी घेऊन जात होती आणि त्यांच्याप्रमाणेंच तिच्या अंगांतूनहि भूक जागवणाऱ्या वाफा सुटत होत्या. पण त्याकडे लक्ष न देतां सुरेशनें म्हटलें, "सगळं कसं माझ्या आवडीचं जेवण तयार केलं आहेस! काय चिकन, शेवग्यांचें कालवण, ओल्या वाटाण्याचा पुलाव, आणि आवळं घालून लोणचं देखील! मी आज येणार हें तुला कळलं होतं कीं काय?"

प्रश्न विचारतांना त्याचें मन मधुर कृतज्ञतेनें भरून आलें होतें.

"आपल्या प्रेमाच्या माणसाच्या साऱ्या हालचाली कितीहि दुरून दिसूं शकतात, सुरेश. मात्र प्रेम तितकं उत्कट पाहिजे."

लुइझा भारल्यासारखी बोलत होती. जणूं तिच्या प्रेमानेंच तिला प्रेषितत्व दिलें होतें.

"आपली नाहीं बुवा एवढी ताकद. आपण कबूल करतों." सुरेश आपण जणूं एकाद्या देवतेपुढें आहोंत अशा विनम्र भावानें तिला म्हणाला.

बराच वेळ त्यांचें असें बोलणें झालें. मग ती सुरेशला आंतल्या खोलींत घेऊन गेली. तिथें गुबगुबीत आणि प्रसन्न रेशमी शय्या त्यांच्यासाठीं तयार होती. अंगांत घालायला परीटघडीचा बारीक फुलांचा निळंसर नायटसूट उशीवरच ठेवला होता. त्याच्याकडे बोट करून लुइझा सुरेशला म्हणाली, "हा मी तुझ्या काल्च्या वाढदिवसाला स्वतः शिवला. माप चुकायचं नाहीं. घालून बघ. ही मी आलेंच." आणि इतकें बोलून ती आंत निघून गेली.

नायटसूट घालून पलंगावर पडल्या पडल्या सुरेश कोंपऱ्यांतलें बोतीसेलीचें चित्र पहात राहिला. त्यांतली दाराच्या पायऱ्यांवर तोंड झांकून बसलेली दीर्घकेशी तरुणी कोण असेल, कशी दिसत असेल, हें तो कल्पनेनें पहाण्याचा प्रयत्न करीत होता. तोंच लुइझा आंत आली. केस मोकळे सोडलेली, पांढरा शुभ्र जाळीदार नायट गाउन घातलेली आणि त्याच्या असंख्य छिद्रांतून आपल्या अंगकांतीचें शीतळ मोहक चांदणें उधळीत असलेली. लुइझाच्या सौंदर्याची आज जणूं शरद्पूर्णिमा होती. विस्मयविमुग्ध होऊन पलंगावर रेललेला सुरेश सांवरून बसला आणि अनिमिष नेत्रांनीं तिच्याकडे पहात तिला म्हणाला, "तुझ्या गळ्यांतला तो सोन्याचा क्रॉस कुठं गेला ?"

"मी तो काढून ठेवलाय. त्याला बिचाऱ्याला शृंगाराचा विटाळ नको व्हायला !" कांहींशा चेष्टेच्या स्वरांत ती बोलली, खदखदां हंसली आणि एकदम सुरेशाच्या गळ्यांत पडून वेड लागल्यासारखी त्याचीं चुंबनावर चुंबनें घेऊं लागली. शीतल, गोड, अमृतमधुर ! पण सुरेश भुइनळ्यासारखा पेटून निघाला. बेफामपणें तिचीं चुंबनें घेऊं लागला आणि मग तिचें कोमल सौष्ठवपूर्ण शरीर परोपरीनें कुरवाळूं लागला. पण पहिला आवेग ओसरल्यावर तो थोडा भानावर आला आणि चकित होऊन म्हणाला,

"इतकं कसं ग तुझं अंग थंडगार ?"

"तूं एकदां म्हणाला होतास ना, कीं उचितरति ही ग्रीष्मांत गार आणि शिशिरांत उबदार असते म्हणून ? उन्हाळा सुरू झाला हें तुझ्या गांवींहि नाहीं पटतं अजून ?" सूचक लाडिकपणानें लुइझानें विचारलें.

"असें आपण बोलणार तरी किती वेळ? तुला झोपायचं नाहीं का ?"
सुरेशनें विचारलें. कारण तो आतां चांगलाच भानावर आला होता. आपण कड्याच्या कांठाशीं आलों आहोंत, इतक्यांत सावध झालों नाहीं तर आपल्याला परततां यायचें नाहीं हें त्यानें ओळखलें होतें आणि म्हणून त्यानें हा प्रश्न तिला मुद्दामच विचारला होता.

"आहे ना ! पण इथंच. असं तुझ्याजवळ. तुझ्या गळ्यांत गळा घालून सर्वस्वीं तुझ्यांत लुप्त होईपर्यंत." असें म्हणून ती त्याच्या अंगावर कलंडली. पण संस्कार उधळून द्यायला निघालेल्या सुरेशला तें शक्य झालें नाहीं. ऐन वेळीं दुखावलेल्या नागांप्रमाणें त्यांनीं फणा काढल्या. फूत्कार घालीत त्याच्या सर्वांगांतून ते डोल घेऊं लागले.

"लुइझा, मी तुझा ऋणी आहे ! त्या ऋणाची फेड पुढच्या जन्मीं मी जरूर करीन. पण या जन्मीं मी शपथेनं बद्ध आहे. आपल्या पेशाची प्रतिज्ञा आपण मोडून कसं चालेल ? तूं अविवाहित आहेस. तुझा बेभानपणा आणि त्याचं मांगल्य मी समजूं शकतों. पण मी भानावर आहे. अशा स्थितींत तुझ्या पतनाला मी कारण झालों, तर दुहेरी दुःख मला जन्मभर वागवावं लागेल."

बोलतां बोलतां सुरेशला दम लागला. लुइझाचा चेहरा एकदम पडला. ती जखमी झाली. पण लगीच तिला त्याची दया आली. किंचित् थांबून ती त्याला म्हणाली, "ठीक. तुझ्या मनांत पापगंड निर्माण होणार असेल तर राहिलं. मी जातें. झोंप तूं."

"नको. तूं निघून गेलीस तर मला झोंप लागायची नाहीं. सारी रात्र तळमळत काढावी लागेल." सुरेश काकुळतीला येऊन म्हणाला.

"मग मी करूं तरी काय ? खरंच, मी नाहीं रागावलें तुझ्यावर. तुला आज मला सुखी करायचं आहे. तुझ्यासाठीं मी काय करूं सांग. मी तें आनंदानं करीन." लहान मुलाला समजवावें तशा आश्वासक आवाजांत लुइझा बोलूं लागली.

"करशील ना ? मग चल. एवढ्यांत लख्ख चांदणं पडलं असेल बाहेर. आपण चांदण्यांतल्या लाटा बघत समुद्रावर जाऊन बसूं. तूं





कॉलेज सोडतांना ज्या कविता आणि गीतं मला तुझ्या गाढ हस्ताक्षरांत नकलून दिलीं होतींस, आणि जीं तूं नेहमीं म्हणत होतीस, डोळ्यांत पाणी येईपर्यंत आळवीत होतीस, तीं सारीं आज म्हण. त्या गाण्यानं आपण दोघेंहि पार थकून जाईपर्यंत तीं म्हणत राहा."

"मग चल."

लहान मुलांप्रमाणें तीं दोघेंहि तशींच नायट-पेहरावांत समुद्रावर गेलीं. लुइझाचें गाणें सारखें चढत जात होतें. वाढत्या चांदण्याबरोबर लाटा जास्त जास्त निळावत होत्या, धुंदावून फेंसाळत होत्या आणि सुरेशचा प्राण खडीसाखरेच्या खड्यासारखा आंतल्या आंत विरघळत होता.

● ●

सुरेशनें डोळे उघडले, तेव्हां त्याच्या अंगावर चांगलेंच ऊन्ह पडलें होतें. बॅग, हॅट आणि बूट जवळच पडले होते आणि तो पनाम्याच्याच सुटांत होता. आपण तर नायटसूटमध्यें होतों! आणि लुइझा कुठं गेली? आपल्याला झोंप लागली असं पाहून, कंटाळून, विषण्ण होऊन ती निघून गेली असेल का? लगबगीनें बूट चढवून आणि डोक्यावर हॅट ठ्ठवून, बॅग झेलवीत तो चालूं लागला. डावीकडच्या बंगल्याच्या पायऱ्या झपझप चढून दाराशीं पोंचतांच त्यानें हांक मारली, "मारी—"

पण कुणाचीच जागमाग दिसली नाहीं. उघड्या दारांतून तो आंतल्या दिवाणखान्यांत गेला. पहातां तों तो अगदीं सुना. ओसाड. मग तीं झुंबरं, तें शिसवी फर्निचर, ती मुलाटो मोलकरीण, सारं गेलं कुठं?

भांबावून गेलेल्या सुरेशनें भेटेल त्याच्याशीं विचारपूस करीत गांवच्या शाळामास्तरणीचें घर गांठलें. ती सकाळचं 'मास' आटोपून नुकतीच आली होती. सुदैवानें ती सुरेशची आणि लुइझाची सहाध्यायिनी निघाली. सुरेशला पहातांच 'ओलिंदा'नें विचारलं, "सुरेश, तूं असा भांबावलेला कां दिसतोस?"

"आपली लुइझा रात्रीं किंवा सकाळीं तुला भेटली का?"

"सुरेश, ती इथं आपल्याला भेटूं शकेलच कशी? गेल्याच आठवड्यांत नोकरीचा राजीनामा देऊन ती कलकत्याला नाहीं का गेली? आपल्या मामेभावाशीं लग्न ठरलंय तिचं."

आश्चर्याचा धक्का बसून सुरेश म्हणाला, "ओलिंदा, तूं म्हणतेस तरी काय? अग, ती काल माझ्याबरोबर नाचली, बोलली, गायली. किती छान वेळ गेला आमचा!"

"सुरेश, किती लबाड आहेस रे? आपलं लुइझावर किती गाढ प्रेम आहे याचा कॉलेजमधल्या तीन वर्षांत विलकुल थांग लागूं दिला नाहींस तूं!" तिनें मिस्किलपणें म्हटलें.

"भलतंच!"

"भलतंच कसं? काल दिवस पडल्यावर तूं वेळेवरच्या त्या ओसाड बंगल्याच्या बाजूनं गेला होतास ना? त्यांतली ती विषप्रयोगानं मेलेली कुमारिका सांपडेल त्या तरुण माणसाच्या प्रेयसीचं रूप घेऊन आपल्या अपुऱ्या वासना पुरवून घेत असते. वर्फासारखं होतं ना तिचं अंग?"

ओलिंदाच्या या प्रश्नासरशीं सुरेश एकदम फटफटीत पडला. बसल्या जागींच त्याची मान आडवी झाली. घाबरलेल्या ओलिंदानें पोर्टचा ग्लास तोंडाशीं धरून लगोलग त्याला सावध केलें. ती समुद्रकांठची रात्र खरी कीं हा भाजणारा दिवस खरा हेंच सुरेशला कळेनासें झालें.

● ● ●





# राक्षस

रूप कथ्यक

*आज मागची आठवण यत्किंचितहि द्यायची नाहीं असं मी ठरवलं आहे. त्याच घटनांना उजाळा देण्यांत काय अर्थ आहे? मला त्यांत कोणतंच स्वारस्य वाटत नाहीं.*

*म्हणजे मागची आठवण आतां विसरायला हवी,—मला. तूं ती विसरली आहेस असं मी समजतों. त्याशिवाय का इतक्या निर्विकारपणानं हें सारं जग चाललं असतं!*

*स्त्रिया धूर्त असतात. धूर्त होणं त्यांना भागच असतं. आयुष्यांत त्यांच्यावर इतक्या विविध बाजूंनी गहजब होत असतो कीं, त्या सगळ्यांना तोंड द्यायचं म्हणजे धूर्तपणाचा अवलंब करावा लागतोच.*

*प्रेम हा धूर्तपणाचाच एक भाग का?*

*प्रेम!...तूं प्रेम कधीं केलं असशील तर तुला हें समजूं शकेल.*

*तुला हें समजूं शकेल असं मी समजूं शकतों.*

*(मी प्रेम केलं आहे याचा हा एक नवा पुरावा!)*

*पण तूं धूर्त कधींच नव्हतीस. कांहीं गोष्टी तुला समजतच नव्हत्या. अगदीं तशा त्या अवस्थेंतहि पाहतां क्षणींच पेटवून देणारी आतुर लालसा मला तुझ्या दृष्टींत कधींच भेटली नाहीं. केवळ तृप्ति...*

*आणि केवळ करुणा.*

*करुणा ही प्रेमाची अनादिकालापासून वैरीण आहे.*

*तुला समजलं नव्हतं कीं मला हें सारं समजलं आहे.*

*तुझ्या हृदयांत आहेत दोन अमोघ शक्ती. एक सगळीकडे हाहाःकार उडवून देते आणि दुसरी सगळं तुला हवं तसं राखून देते.*

*म्हणून मी तुला अजून नांव ठेवूं शकलों नाहीं.*

*तुझा सहवास, तुझा विचार म्हणजे एक वावटळ. आणि मी एक स्थाणुकाय वृक्ष.*

*मी वांकलों नाहीं, तें माझें प्रेम.*

*तुझ्यावर मी एक रूपक रचलं आहे. त्यांत सोयीसाठीं मी स्वतःकडे तुझी भूमिका ठेविली आहे.*

त्यामुळे एक मात्र झालं कीं, मला त्यांत कुठंच अवसर मिळाला नाहा.

"आरस्पानी पाण्यांत-मी मला पाहत असतें नार्सिससारखी. माझं गात्र न् गात्र इतकं रेखीव आणि कांतिमान् असतं कीं, त्यांचं शारीर रूपच मी विसरून जातें. इतक्या अमाप लावण्याचा मी मांठा करतें. मी अगदीं संतृप्त असतें. मला कांहींच नको असतें. मला कशाची आठवणहि रहात नाहीं."

ही तूं.

मी असतों रात्रंदिवस जळत.

तुला ठाऊक नव्हतं, तेव्हांपासून मी तुला माझी केली आहे.

ही माझी तऱ्हा. ही सगळ्या जगाची तऱ्हा.

तूं आहेस जगावेगळी.

तूं कधींच कांहीं शिकली नाहींस का? कीं तुला त्याची जरूरच भासली नाहीं?

बीज आपणांतच सबंध वृक्षाचा विस्तार सामावून असतं, म्हणून त्याला स्वयंपूर्ण म्हणतात.

तूंहि तशीच आहेस.

घेतलंस तर घेतेस—स्वखुषीनं आणि स्वतःसाठीं देणं तुझ्या लेखीं नाहीं. तुझा तो धर्मच नाहीं. तुझा आविष्कार, तुझं विकसन याला तुझ्या दृष्टीनं कांहीं अर्थच नाहीं. तें सारं तुझं हें मुख्य, महत्त्वाचं.

मला हे केव्हां समजलं?

मला हें कसं समजलं?

(हें जाणून घेण्याची वास्तविक तुझी अपेक्षाहि नाहीं!)

...मी जेव्हां तुला टाळायला लागलों तेव्हां.

पण करुणा म्हणजे प्रेम नाहीं, तशीच भक्ति म्हणजेहि प्रेम नाहीं.

प्रेम हें दाहक असतं. परवश असतं. दुसऱ्याचं दुसरेपण नाकारणारं असतं.

शिवाय तुझ्यांत असं काय होतं कीं, मी इतक्या दुरूनहि तुझं रूप आठवावं?

आधी मी तुला दूर जायला देतां कामा नये होतं. तूं गेल्यावर तुझ्यामागं यायला हवं होतं. तुझ्यापाशीं कशाहि परिस्थितींत रहायला हवं होतं.

काळ किती कसा अचल असतो पहा!

जें होऊन गेलं तें आतां पटत नाहीं. जें होतं आहे तें व्हायला नको असं सारखं वाटत असतं. जें व्हायला हवं तें नक्की होणार नाहीं याची मनोमन खात्री असते.

• •

पण, आज यांतून माझी अचानक सुटका झाली आहे.

मी तुझ्याकडे यायला निघालों आहे.

मी आतां तुझा विचारच करीत नाहीं.

मी आतां माझाहि विचार करीत नाहीं.

निर्णय घ्यायलाच नेहमीं किती वेळ लागतो पहा!

मनींची मी आज । भुक्त चंद्रावळ
भोगिली अकाळ । हीच साक्ष.

• • •








# कोडगूंच्या प्रदेशांत



—इरावती कर्वे—

*कूर्गच्या रानांत दरवळणारा वास, मधमाश्यांची अविरत गुणगुण, मधाची कडवट चव आणि मायेच्या माणसांची संगत यांची शांत आणि स्निग्ध स्मृति अजूनहि माझ्या मनांत रेंगाळत आहे !*

निघायचं .निघायचं म्हणून सकाळपासून सामान बांधून बसलों होतों. पण ट्रक आली रात्रीं नऊ वाजतां. ट्रकबरोबर जंगलांतला एक छोटासा अधिकारी पण होता. तो म्हणाला, "काय करावं, सकाळपासून वाट पहात होतों. संध्याकाळीं ट्रक लाकडं भरून आला तो खाली केला, ड्रायव्हरचं जेवण झालं, तों ही वेळ आली." मी म्हटलें, "चिंता नाहीं, आमची तयारी आहे." पांच मिनिटांत सामान आंत भरलं, गाद्या अर्धवट पसरल्या व चांगले हात-पाय पसरून बसलों—बसलों कसले, रेललों. आमचं बहुतेक काम जंगलांत चालणार होत व जंगलाच्या मुख्य अधिकाऱ्यानें जंगलखात्याच्या ट्रक रिकाम्या असतील तेव्हां वापरण्याची आम्हांला परवानगी दिली होती. महिनाभर होणाऱ्या ह्या प्रवासांतील हा पहिला प्रवास. जंगलांतून रात्रीच्या प्रवासाची मोठी मौज असते. आणि त्यांतूनहि वरून उघड्या असलेल्या ट्रक-मध्यें रेलून, अर्धवट निजून प्रवास तर फारच रम्य हें आम्हांला सर्वांना पटलें. झाडांच्या भिंतींतून प्रवास चालला होता. झाडें वाऱ्यानें हाललीं कीं, काळ्या भिंतीला भोकें पडत व त्यांतून आकाश दिसे. वरतीं काळ्या निरभ्र आकाशाच्या धीदोटींत तारे चमकत होते. झाडें उंच असलीं कीं, वरचा प्रकाशाचा पट्टा नाहींसा होई व बोगद्यांतून प्रवास केल्या-सारखा वाटे. प्रवासाच्या वाटेवर कळकाचीं बेटें होतीं. त्यांच्या पानांची हलती झालर आका-शाच्या पेट्टीला अधून मधून लागे व काळ्या पण प्रकाशमय अवकाशावर पानांची गडद वेलपत्ती उठून दिसे. थोडा वेळ डोळा लागे. जागं होऊन वरती पाहावें तों पहिल्यांदा पाहि-लेलें नक्षत्र कललेलें दिसे. व नवें सरळ दृष्टीच्या टप्प्यांत येई. आकाशांतल्या मोठ्या घड्याळ्याचे कांटे हलत होते. सबंध रानांत झाडें हलत होतीं. आमची ट्रक पण निर्मनुष्य रस्त्यांतून वेगानें चालली होती. पण ह्या सर्व हालचालींत गडबड नव्हती—एक प्रकारची अगाध शांतता भरून राहिली होती.

• •

मी जागी झालें ती एका बंगल्यांत. माझीं मदतनीस मुलें अजून गाढ निजलीं होतीं. त्यांना हलवून हलवून जागें केलें. तोंड धुवून चहा घेतों, तों जंगलांतील अधिकारी दोन रखवालदारांना (फॉरेस्ट गार्ड) घेऊन आला. "हीं माणसें तुम्हांला वाट दाखवतील" तो जरा थांबला व किंचित् चाचरत म्हणाला, "आज येथें ट्रक नाहीं. पण तुम्हांला ट्रॅक्टर चालत असला, तर त्याच्यामागें एक दोन चाकावरची गाडी लावून तुम्हांला कांहीं मैल जंगलांत जातां येईल. पुढें काहीं मैल चालावें लागेल." मी म्हटलें, "उत्तम. येऊं द्या तुमचा ट्रॅक्टर."

"कुशालप्पा, कुशालप्पा" त्यानें मोठ्यानें हांका मारल्या व एक उंच सडसडीत हसतमुख माणूस आम्हांपुढें आला. ह्याच्या बरोबर आम्ही दोनचार दिवस होतों. व तो अगदीं मूर्तिमंत खुशालपणा होता. त्याचं नांव 'खुशाल + अप्पा + अण्णा' असं मिळून कोडगू भाषेंत 'कुशालप्पा' झालं होतं. कुशालप्पा ट्रॅक्टरच्या मुख्य बैठकीवर बसला. मागें लावलेल्या गाड्यांत एक बाक ठेवलें होतें. त्यावर आम्ही बसलों. ट्रॅक्टरला स्प्रिंग नसते व रानांतील खांचखळग्यां-तून जातांना आमची काय अवस्था झाली हें सांगून कळणार नाहीं. अनुभवच घेतला पाहिजे.

ट्रॅक्टर थांबल्यावर चार मैल चालायचें होतें. बरोबर कोडगू गार्ड. हे लोक उंचच उंच होते. सर्व पांच फूट आठ इंचांच्यावर. अंगानें अगदीं सडसडीत. चालतांना कांहीं विशेष जलद चालतात असें दिसत नसे. पण त्यांचे-बरोबर चालतांना आम्हांला चांगलें पळावें लागे. नंदू गार्डच्या बरोबरीनें चाले. नंदू व मी गार्डच्या मागें दहा पावलें व आमच्यामागें चांगली पंधरा पावलें कमल. बिचारी धांवत येत होती. त्या रात्रीं घरीं आल्यावर ठरवलें कीं, कामकरी मंडळींचे दोन विभाग करायचे. चंदू व कमल घरीं रहाणारे व नंदू व मी चालणारे. एखाद दिवशीं मीसुद्धां फार दमून जाई. मग चंदू किंवा कमल जात असे. चालणाऱ्यांनीं धांवून रक्त आणायचें, घरच्यांनीं तें तपासायचें.

• •

एका मुक्कामावर आम्हाला एक अगदीं तरुण पोरगेलासा अधिकारी आमच्या दिमतीला मिळाला. कुठल्याही झाडाचें, वेलीचें नांव विचारलें कीं, तो चट्दिशीं संबंध लॅटिन नांव सांगे. आम्ही पण मोठ्या हौसेनें आमची जिज्ञासा पुरी करून घेत होतों. चालतां चालतां आतांपर्यंत न पाहिलेलें एक झाड दिसलें. मी विचारलें, "ह्याचें नांव काय?"

त्यानें झाडाचीं पानें पाहिलीं, खोड पाहिलें व मान हलवून म्हणाला, "नाहीं बुवा माहित. पण एस् नाहीं तर टी नें सुरुवात असणार नांवाची."

मी आश्चर्यानें विचारलें, "अहो ज्या झाडाचें नांव माहित नाहीं, त्याच्या नांवाची सुरुवात तुम्हांला कशी माहीत?"

तो मोठ्यानें हंसला. "अहो मी डेहराडूनच्या कॉलेजांत जाण्यासाठीं अभ्यास करीत आहे—"

त्यानें एक भला लठ्ठ इंग्रजी ग्रंथ एका पोतडींतून काढून माझ्यापुढें केला—"ह्या बुकांत भारतांतील झाडांचें वर्णन अकारानुक्रमानें केलें आहे. इंग्रजी आर् पर्यंत माझीं सर्व झाडें पाठ झालीं आहेत म्हणून म्हटलें एस् नाहीं तर टी. नें सुरुवात असेल म्हणून."

तो आम्हाला शेवटला दिसला तो एका ट्रकमध्यें. इंग्लंडमधून कोणी बडा लॉर्ड शिकारीला आला होता. त्याच्या दिमतीला त्याला दिलें होतें. तो लॉर्ड पुढच्या मऊ जागेवर बसला होता. व हा मुलगा होता मागें जोडलेल्या गाड्यांत. आम्हांला जंगलाच्या रस्त्यावर पाहिल्याबरोबर तो उभा राहिला. त्याच्या हातांत तो लठ्ठ ग्रंथ होता. तो ग्रंथ त्यानें हातांत वर धरून हालवला व हंसत हंसत ओरडला, "मी आतां एस् संपवला आहे; पण तें झाड त्यांत नाहीं."

● ●

एक दिवस आम्ही हत्तींच्या कॅंपांत पोचलों. तेथें बरींच माणसें, विशेषतः आदिवासी कामावर असतात. व एकदम बऱ्याच जणांच्या रक्ताचे नमुने आम्हांला मिळतील ही माझी अपेक्षा होती. हत्तीच्या कॅंपांत गेल्यावर माझे सर्व मदतनीस पसार झाले. तेथें पहायला इतक्या गोष्टी होत्या कीं, मला मदत करायला कोणीच तयार नव्हतें. मग मी एक दिवसाची सुट्टी जाहीर केली. व कॅंपांत फिरावयास गेलें.

माणसाळलेले हत्ती कामें करीत होते. एक पिल्लूं—असेल माझ्या कमरेइतकें उंच—तर मुलांच्यांत मिसळून गेलें होतें. बा, बा (ये ये) म्हटलें कीं तें मुलांच्या मागें जाई. मुलांनीं त्याला गूळ दिला. मग तर तें इतकें चिकटलें कीं दुपारच्या फराळासाठीं आम्ही बसलों, तर सरळ आंत येऊन आमच्या पंक्तीला बसलें! एक हत्ती नवा धरून आणलेला होता. तो सारखा आपल्या लाकडी पिंजऱ्याला धडका देत होता. कित्येक मोठे ओंडके त्यानें पार मोडून टाकले होते. त्याच्या रागाचा सपाटा व अचाट शक्ति पाहून जिवाचा थरकांप होई. पण तितकीच त्या रागाची विफलता पाहून मनाला फार वाईट वाटलें. केवढाले प्रचंड हत्ती आम्हीं काम करतांना पाहिले. त्यांच्या डोक्यावर एखादा बेट्टा कुरुबा बसलेला असायचा. हीं माणसें इतकीं लहान असत कीं त्यांचा उघडा हस्तिवर्णी चिमुकला देह पहिल्याप्रथम दिसतसुद्धां नसे. तो बिचारा पिंजऱ्याला धडका देणारा हत्ती कांहीं दिवसांतच एका लहानशा प्राण्याच्या हुकूमतीखालीं काम करायला लागणार होता. हत्तीखान्याच्या एका कोपऱ्यांत कांहीं आजारी हत्ती होते, व एक डॉक्टर मदतनिसांच्या सहाय्यानें औषधं देत होता. एका हत्तीची दाढ दुखत होती. त्याच्या किडलेल्या दांतांत डॉक्टरांनीं एका मोठ्या पिचकारीनें हायड्रोजन





पेरॉक्साइड घातलें व त्यांतून पिपेंच्या पिपें फेस निघत होता. तो हत्तीच्या डोळ्यांत व नाकांत गेला कीं, हत्ती बेचैन होई. मुलें तर आजारी हत्ती व डॉक्टर ह्यांपासून दूर व्हायला तयार नव्हतीं. एका हत्तीला इंजेक्शन द्यावयाचें होतें. हत्तीच्या कातडींतून आंत पोचायला म्हणून सुई चांगलीच दणकट व जाड होती. तिसऱ्या हत्तीला एरंडेल पाजीत होते. एका मनुष्यानें उंच उभा राहून हत्तीच्या तोंडांत एक बांबूचें नळकांडें धरलें होतें. दुसरा त्यांत एरंडेल ओतीत होता. जितकें ओती, त्यांतील निम्में हत्तीच्या घशांत जाई व निम्में बाहेर पडे. हत्तीला पुरेसा डोस जाईपर्यंत डॉक्टर व आसपासचे मदतनीस एरंडेलानें नाहून निघाले! मुलांना आश्चर्य वाटलें कीं, हत्ती सर्व उपचार होईपर्यंत स्वस्थ रहातो कसा! डॉक्टर म्हणाले, "माणसांपेक्षां हत्ती कितीतरी शांत व समजूतदार. मी आज पंधरा वर्षें काम करतों आहें. पण कोणत्याही हत्तीनें कधीं त्रास दिला नाहीं."

• •

आम्ही रात्रींची जेवीत होतों. साडेआठ वाजले असतील. आमचेबरोबर त्या दिवशीं जंगलचे एक अधिकारी होते. एक गार्ड आंत आला व त्यानें खिशांतून कांहींतरी काढून कोपऱ्यांतल्या टेबलावर ठेवलें. आम्ही पाहिलें तों एक वीत लांब व पाऊण वीत उंच असें सोनेरी पट्टे असलेलें हरिणाचें पिल्लूं! गार्ड म्हणाला, जंगलांतल्या पायवाटेवर त्याला एकटें पिल्लूं सांपडलें. जनावर पाठीं लागलें म्हणून आई त्याच्यादेखतच पळून गेली होती. आई परत आली नाहीं म्हणून त्यानें खिशात घालून पिल्लूं आणलें. हरिण होतें बारिक हरिणाच्या जातीचें. मोठें झालें तरी तें फार तर १० इंच उंच होतें. जंगल अधिकारी म्हणाला, पिल्लूं दोन दिवसांत मरेल. पण आम्ही तें मागून घेतलें. लहान कांचेच्या नळीला रबर लावून त्यांतून त्याला दूध पाजलें. पुण्याला आल्यावर तें फारच माणसाळलें. आम्ही त्याचें नांव 'होन्ने' (सोनी) ठेवलें. पण सर्वांना चटका लावून तें तीन महिन्यांचें होऊन मेलें. त्याचे पेन्सिलीएवढे पायाचे खूर फरशीवर वाजायचे, त्याचा आवाज ऐकूं येतो. तें नंदूच्या कुशींत शिरायचें तें आठवतें. त्याच्या चिमुकल्या चेहऱ्यांतले मोठमोठे भावपूर्ण डोळे अजून प्राण ओतून माझ्याकडे बघतातसें वाटतें.

• •

नंदू नि मी उठून भल्या पहांटे कामाला गेलों होतों. कमल सर्व सामान घेऊन बसनें पोन्नमपेटच्या बंगल्यांत जाणार होती. आम्ही काम झालें कीं, तेथें भेटायचें ठरलें होतें. सकाळीं दहाच्या सुमारास चांगले सहा मैल चालून पोन्नमपेटला पोचलों, तों कमल आपली एका झाडाखालीं लांब तोंड करून बसलेली. बंगला म्हणे आम्हाला मिळणार नाहीं. मी तावातावानें बंगल्याकडे गेलें. तेथील माणसाचें आपलें एक म्हणणें, "जंगलच्या अधिकाऱ्याला मी जाणत नाहीं. मिनिस्टरची चिठ्ठी असल्यास बंगला उघडतों." आतां काय करावें? मिनिस्टरला आम्ही भेटलों होतों. त्यानें परवानगी पण दिली होती. पण आम्ही पत्र घेतलें नव्हतें. शेवटीं बऱ्याच अधिकाऱ्यांना भेटून रस्त्यावरच्या एका सरकारी चाळींत एक खोली मिळाली. खोली झाडली, मुलांनीं पाणी आणलें. त्यावर सतरंजी पसरायला घेतली, तों कमल म्हणाली, "काकू, लुगडें कसें फाटलें?"

मी पहातें, तों पुढेंच सबंध वरपासून खालपर्यंत फाटून खालीं लोंबत होतें! मी बंगल्यांत तशीच गेलें होतें, अधिकाऱ्यांना तशीच भेटलें होतें. पोन्नमपेटच्या रस्त्यांतून तशीच भटकलें होतें, फार काय, सहा मैल तशीच चालत आलें होतें!

मी मटकन् खालीं बसलें. लहान लहान गोष्टींचा मला उलगडा लागला. तो बंगल्यांतला नोकर असा चमत्कारिक कां बघत होता? त्या अधिकाऱ्याच्या चपराशानें आंत येण्याची बंदी कां केली? मी इंग्लिश बोलूं लागून कोण हें सांगितल्यावर तो अधिकारी चकित कसा झाला? एक ना दोन, गेल्या दोन तासांचीं चित्रें माझ्या डोळ्यांपुढून गेलीं!

मी परत माझ्या लक्तराकडे पाहिलें. सकाळच्या खेड्यांतून बाहेर पडून रस्त्याला लागून कांहीं तरी चिरल्याचा आवाज झाला, तेव्हांच बहुतेक लुगडें फाटलें असलें पाहिजे. आम्ही अंतर काटायचें म्हणून भराभर चालत होतों. हातांत रक्ताच्या नमुन्याची पेटी. लक्ष गेलें नाहीं! मी लुगडें बदललें. पण पुढचे दोन दिवस पोन्नमपेटच्या रस्त्यांतून जातांना वर मान करून मला चालवलें नाहीं!

• •

*आमचें राज्य!... आमचा राज्यकारभार!... :१२:*

**आसामचें (आक्रांड) तांडव!**



हत्तीचे डॉक्टर आम्हांला मधून मधून भेटत असत. बरेचदां त्यांनीं आमच्याकडे मुक्काम पण केला. आमच्या सर्वांच्या लक्षांत एक गोष्ट आली. ती म्हणजे त्या रमणीय सदानंदी प्रदेशांत हा डॉक्टर तेवढा एक कायम कष्टी दिसायचा. आम्ही चौकशी केली, तर कळलें कीं, त्याला बायकामुलें आहेत. संसारही छान चालला होता. मग त्या माणसाचें दुःख तरी काय? शेवटीं एकदां न राहवून नंदू त्यांना म्हणाली "क्षमा करा, डॉक्टर, तुम्ही नेहमीं काळजींत दिसतां तें कां बरें?"

डॉक्टरांनीं एक भला मोठा सुस्कारा टाकला व म्हणाले, "अहो, या हत्तींची काळजी आहे ना! एखादा हत्ती तरुणपणीं आजारी पडून मेला कीं कौन्सिलमध्यें किती प्रश्नोत्तरें होतात. व शेवटीं डॉक्टरच्या हयगयीमुळें हत्ती मेला कीं नाहीं हें ठरविण्यास कमिशनें नेमतात! हत्तीची किंमत असते दहा हजार रुपये. माझ्यासारख्या जनावरांच्या डॉक्टरला काय किंमत? ह्या एवढ्या प्रदेशांत हत्ती आजारी नाहीं असें सहसा होत नाहीं. व मी कधीं काळजींतून मुक्त होत नाहीं."

• •

कूर्गमध्यें हरिजनांची एक विशिष्ट जात आहे. तिकडे गेलें होतें. गावापासून पाऊण मैलावर मैदानांत एक स्वतंत्र नवी वस्ती आहे. तिचें नांव नेहरूनगर. लहान लहान सुबक घरें होतीं. काम छान झालें. पाहुणचार पण चांगला झाला. पूर्वी हे हरिजन गांवाजवळ होते. आतां ते गांवापासून दूर व बरेचसे स्वतंत्र झाले होते. दुसऱ्या गांवीं असेंच गांधीनगर आहे. निवडणुका जवळ आल्या कीं निरनिराळे पुढारी येथें येतात. एरवीं त्या वस्तीचा गांवाशीं संबंध नाहीं. शाळा स्वतंत्र, देऊळ स्वतंत्र, सभागृह पण स्वतंत्र. ह्यामुळें जातिनिर्मूलन कसें होतें कोण जाणे!

• •

तडियंडमोळो! संध्याकाळच्या गुलाबी प्रकाशांत कूर्गचें सर्वांत उंच शिखर स्पष्ट दिसत होतें. विराजपेटच्या डाक बंगल्याचा जिना चढून धांवतच मी वर गेलें. मागच्या पडवींत बसलें कीं शिखर सहज दिसायचें, तें मागच्या पाळीला मी आलें होतें, तेव्हां मला माहीत झालें होतें. तडियंडमोळोवर चढलें म्हणजे मंगलोरच्या बंदरांतील गलबतें दिसतात. त्याच्याभोंवतीं रान इकडच्यापेक्षां दाट आहे. तेथल्या मळ्यांतून वेलदोडा पिकवतात. त्याच्या पायथ्याशीं कूर्गच्या शेवटच्या राजाचा—वीरराजाचा एक राजवाडा आहे. त्या राजवड्यांत वीरराजाची आई व बायका होत्या आणि त्या एकाकी वाड्यांत, दागिन्यांच्या लोभानें कुणी नोकरानें त्यांचा प्राण घेतला. वीरराजाचा शेवटही फार वाईट झाला. तडियंडमोळोचें लांबून दर्शन झालें कीं, त्या न पाहिलेल्या वाड्याभोंवतीं, पाय न ठेवलेल्या शिखराभोंवतीं माझें मन रेंगाळतें. कूर्गचा राजा टिपूशीं झगडून शेवटीं इंग्रजांच्या साम्राज्यतृष्णेला बळी पडला. पण कोडगू लोकांना त्याची आठवणही नाहीं. त्यांचे सर्व व्यवहार व भाषण कॉफीच्या मळ्यांसंबंधीं व संत्र्यांच्या बागासंबंधीं असतें. हे सुंदर घरांतून रहातात. दर जेवणाला कोंबडी व डुकराचें मांस खातात. यथेच्छ दारू पितात. व मोठमोठ्या मोटारींमधून हिंडतात. ते व त्यांच्या बायका सुस्वरूप असतात. बरेचसे लष्करांत जातात व सर्वच एकंदर युरोपियनांसारखे रहातात. राजकारण, समाजकारण असल्या कटकटी त्यांना माहीत नाहींत. त्याच देशांत, जंगलांत लहान झोपड्यांतून बेट्टाकुरुबा व जेनूकुरुबा रहातात. त्यांना पण वीरराजाचें नांव माहीत नाहीं. ते जंगलांत काम करतात. मिळेल तेव्हां मध खातात, दारू पितात, सण आला म्हणजे रात्रभर नाचतात, गातात, रामायणाचें नाट्य करतात. त्यांत राम काळा चष्मा घालतो, व सीता ओठ रंगवते, तोंडाला गोरें होण्यासाठीं हळद फांसते. ते पण कोंबड्या पाळतात.

सौंदर्याच्या मानसपूजेंत

# शृंगार ही अग्रपूजा नव्हे तर काय ?

बंधु-भगिनींच्या वस्त्रमंदिरांतील

# ४ हुकमी एक्के......

शृंगार

निरनिराळे वाण निरनिराळ्या ठिकाणीं शोधत फिरावे लागते. परंतु सर्व पेठांच्या विविध-साड्या ब्लाऊज पीसेस वगैरे स्त्रियांचे सर्व वस्त्रालंकार एकच ठिकाणीं उपलब्ध असणारे असें ठिकाण—

९४/९७ बुधवार पेठ, लक्ष्मी रोड, पुणें २

कुमार कंपनी

कॅलिको, अरविंद, फिनले, कोहिनूर, खटाऊ, शरॉक, श्रीराम, अंबिका, मफतलाल ग्रुप वगैरे मिल्सचे स्त्री-पुरुषांना आवडणारे सर्व तऱ्हेचें कापड.

१८५/१ बुधवार पेठ, लक्ष्मी रोड, पुणें २

प्रगति क्लॉथ स्टोअर्स

बिन्नी मिलचे वुलन व कॉटन रग्ज्, शॉल्स, मफलर्स, बेड-शीट्स्, तसेंच शर्टिंग, कोटिंग वगैरे विविध कौटुंबिक गरजांसाठीं....

१८४/१ बुधवार पेठ, लक्ष्मी रोड, पुणे २

शंकर मूळचंद आणि कंपनी

भारतांत व परदेशांत तयार होणारे नाना तऱ्हेचे वुलन कापड कीं जें अन्यत्र नाहीं, तें येथें मिळूं शकतें. शिवाय स्टायलिश शिलाई केन्द्र....

१८५/५ बुधवार पेठ, लक्ष्मी रोड, पुणें २

यंदाची दिवाळी व नूतन वर्ष आमच्या सर्व ग्राहकांस, व्यवसायबंधूंस व भारतीयांस सुख-समृद्धी व भरभराटीची जावोत !

परदेशांत जाणारी बहुतांशीं सर्व मंडळी आमचे कडेच आपले सूटस् शिवून घेतात. आप-टु-डेट कट–स्टायलिश शिलाई.

अनुक्रमणिका

राजकारण अजून त्यांच्यापर्यंत फारसें पोचलें नाहीं. पण एक जेनूकुरुचा व एक बेट्टाकुरुचा कोडगू कौन्सिलचे मेंबर असलेले मला भेटले होते. एकजण आपलें घर शाकारीत होता. दुसरा घराभोंवतीं कळकाची वई घालीत होता!

• •

त्या दिवशीं प्रवासांत जाई व जाईचे वडील बरोबर होते. असे प्रसंग क्वचित् येत. आतां तर ते कधींच येणार नाहींत. जाई परघरीं गेली आहे. तिचा जीव तिच्या माणसांभोंवतीं घोटाळतो आहे—आणि माझा पण.

सबंध सकाळ रानांत घालवली होती. कळकांच्या बेटांत, हत्तींच्या कळपांत, कुरुबांच्या झोपड्यांत, कावेरीच्या कांठावर. काम आटपून मोटारच्या सडकेला मिळावला आम्ही चाललों होतों. मला गचाळ काव्य सुचत होतें व जाई मला मदत करीत होती. शेवटीं एकदांच्या चार ओळी झाल्या. व दिनूनें लगेच डायरी काढून त्या टिपून ठेवल्या :

सा रम्या तटिनी मरुन्मुखरितास्ते कीचका उन्नताः ।
वर्षामेघनिभा गजा मदयुतास्ते श्रृंखला-कर्षिणः ।
जल्पन्त्या विविधाः कथा वनगृहे (अर्थात् फॉरेस्ट रेस्ट हाऊस) सार्धं दुहित्रा मया ।
नीतो यो दिवसस्त्वया सह सखे विस्मर्यते सः कथम् ॥

"कशा काय झाल्या आहेत?" तो म्हणाला, "उत्तम." जाई म्हणाली, "दुसरं ग काय म्हणणार?" आम्ही सर्व हंसलों. रस्त्यावर पोचलों. कडेला एक झोपडी होती. तिच्या उघड्या पडवींत मुक्काम केला. सबंध रान सुवासानें भरून राहिलें होतें. कूर्गभर ठिकठिकाणीं हा वास येतो. फुलाला 'कुरुंजी' म्हणतातसें वाटतें. कांहींतरी चमत्कारिक आवाज डोक्यावर घुमूं लागला. म्हणून पाहिलें तों मधमाशांचा भलामोठा थवाच्या थवा वरून चालला होता. पाहातां पाहातां तो काळा ढग गुणगुणत लांब गेला. आम्हांला सपाटून भूक लागली होती, म्हणून पोळ्यांचा डबा व मधाची बाटली काढली. कूर्गच्या मधाला तोच वास येतो. अजूनहि कूर्गच्या रानांत दरवळणारा सुगंध, मधमाशांची दिवसभर चाललेली गुणगुण, मधाची कडवट गोडी व माझ्या माणसांच्या मायेची संगत ह्यांनीं त्या दिवसाची शांत आणि स्निग्ध स्मृति मनांत भरून राहिली आहे.





अनुक्रमणिका



## रसिकहो

# किती चतुर नायिका!

- मं. वि. राजाध्यक्ष
- मो. ग. रांगणेकर
- अनंत काणेकर
- वसंत सवनीस
- बाळ गंगाधर सामंत
- ग. रा. कामत

गतवर्षांच्या अंकातली लेखमालेची गैरहजेरी आमच्या पुष्कळशा वाचकांना बोंचली होती. त्यांच्या दुःखावर हळुवार फुंकर घालण्यासाठीं, यावर्षीं आम्ही सुकोमल हातांचा आणि नाजुक ओठांचा 'विषय' त्यांच्या सेवेस सादर करीत आहोंत.

तसं म्हटलं तर हा विषय जुना. इतका जुना कीं, त्याचा निश्चित उगम शोधून काढण्यांत मानववंशशास्त्रज्ञ, जीवशास्त्रज्ञ आणि तत्सम इतर अनेक शास्त्रांतले 'ज्ञ' सुद्धां अज्ञ ठरले आहेत! लेखणीच्या कुदळी करून हा विषय खणून काढायला निघालेल्या उद्योगवीरांच्या अंगाला फार फार तर विद्वत्तेची माती आणि 'पीएच्. डी.' चं शेंपूट चिकटतं! हातीं कांहींच लागत नाहीं. ऋषीच्या कुळापेक्षां किंवा नदीच्या मुळापेक्षा या स्त्रीच्या खुळाचा धकवा सर्वांना अधिक पडला आहे. त्रिलोकांना पालाण घालून दशांगुळं उरणाऱ्या परब्रम्ह्याप्रमाणें काळ, स्थळ आणि शास्त्रज्ञांच्या फलटणी, या त्रिकूटाला हा विषय पुरून उरला आहे.

पण हें शास्त्रीय संशोधनाचं फेंफरं उतरलं, म्हणजे बाळ-बोध बुद्धीला जाग येते; आणि विषयाचा सरळ सोपा उगम सुचूं लागतो. भूतलावर पहिली स्त्री अवतरली किंवा अगदीं खरं सांगायचं तर पहिला पुरुष अवतरला (केव्हा तें एकट्या परमेश्वरालाच ठाऊक!), तेव्हांच या विषयाची नांदी वाजली; आणि 'होणार, होणार' म्हणून हजारों वर्षें नुसत्याच जाहिराती फडकवणारा तो (कु.) प्रसिद्ध प्रळयकाळ ओढवेल, (म्हणजे केव्हा तेंहि पुनः एकट्या त्यालाच ठाऊक!) त्याच वेळीं या विषयाचं भरतवाक्य म्हटलं जाणार आहे!

पण जुना असूनहि या विषयाचं जुनेर झालं नाहीं. आणि त्याची मौलिकता व आकर्षण सिद्ध करण्यासाठीं 'जुनं तें सोनं'.

या म्हणीलाहि त्याची पाठराखण करावी लागत नाहीं. प्रतिक्षणीं नवनवीन उन्मेष धारण करणं हें कलेंतील सौंदर्याचं लक्षण. आणि स्त्री ही तर विधात्यानं कलानिर्मितींत गांठलेली परिसीमा. सौंदर्याचा अद्वितीय नमुना. आपल्यामधलं तीळ तीळ तेज गोळा करून देवांनीं तिलोत्तमा निर्माण केली; तर यच्चयावत जीवसृष्टींतल्या सौंदर्याचे अंश अंश गोळा करून विधात्यानं स्त्री निर्माण केली. म्हणूनच अनादिकालापासून या सौंदर्याविषयाची धुंदी पुरुषमात्राच्या डोळ्यावर चढली आहे !

हें ' धुंदी ' चं प्रकरण आणखी थोडं लांबवलं, तर असंहि म्हणतां येईल कीं, पुरुषवर्गाला धुंदी आणण्यासाठीं जे जे विषय जगांत उपलब्ध आहेत, त्या सर्वांत जुनेपणाच्या महिमा अधिक ! वस्तू जितकी अधिक मुरलेली, मळलेली, हाताळलेली किंवा चघळलेली, तितका तिचा गुण मोठा. त्यामुळंच विषयाचा जुनेपणा प्रस्तुत लेखमालेच्या सुरसतेला बाध आणणार नाहीं.

पण अज्ञात काळापासून अगणित मंडळींनीं या विषयाचा काथ्याकूट चालवलेला असला, तरी स्त्रीचं कूट अजून पुरतेंपणीं कुणालाच उलगडता आलेलं नाहीं. पाऱ्याप्रमाणें चपळ आणि विजेप्रमाणें दाहक असलेलं हें कूट कुणाच्याच हातीं सांपडत नाहीं; आणि सांपडल्यासारखं वाटलं, तर जीवघेणा चटका देऊन निसटतं ! या कूटाचा जितका विचार करावा, तितकं तें अगम्य वाटूं लागतं, आणि त्यासंबंधीं जितकं लिहावं, तितकं तें अपुरं ठरूं लागतं. कारण या ' बाळा ' चं दर्शनी कर्तृत्व अति दांडगं, आणि त्याच्या अंतरंगाचा पत्ता जिथं विधात्यालासुद्धां लागला नाहीं, तिथं कवि-लेखक-तत्त्वज्ञ-शास्त्रज्ञ म्हणजे कोणत्या झाडाचा पाला !

पण तो शोध घेण्याचा नाद मात्र कुणालाच सुटलेला नाहीं. अनादिकाळापासून चालत आलेला हा उद्योग अनंत काळपर्यंत असाच चालत रहाणार आहे. कारण स्त्रीची साथच पुरुषाच्या चोकांडीं बसलेली आहे ! कधीं ती मातेच्या नात्यांत कडक लक्ष्माची अवतार धारण करते, कधीं बहिणीच्या प्रेमळ आणि मैत्रिणीच्या नाजुक नात्यांत मनसोक्त छळून घेते, तर कधीं सहधर्मचारिणीच्या नात्यात सातजन्म मानगुटीस बसण्याचा धाक घालते—आणि कन्या ही तर बोलून चालून रास संकटांची ! स्त्रीच्या या अनंत स्वरूपातलं फक्त ' गृहिणी सचिवः सखी–' हेंच स्वरूप इथं मुख्यत्वें प्रस्तुत आहे. आणि तें असं आहे :—



# पुरुषप्रधाना, ही तुझी कहाणी!

**—मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष**

पुस्तकसंख्येची वाढ बेसुमार होत आहे; कागदाचा पुरवठा अपुरा पडूं लागणार आणि पुस्तकं ठेवायला जागा नाहीं अशी स्थिति येणार; या जागतिक संकटावर उपाययोजना म्हणून पुस्तक-नियमन ( किंवा नियोजन ) कसें करावें याचा विचार करण्यासाठीं विद्वानांची परिषद भरली होती. कोणत्याहि परिषदेप्रमाणें तेथेंहि पुष्कळ गुळमुळीत, गैरलागू आणि वक्तृत्त्वपूर्ण भाषणें झडलीं, तरी मूळ मुद्दा लोंबकळतच राहिला; तेव्हां कोणी एक निःस्पृह आणि फटकळ विद्वान् निर्भोपणें म्हणाला, " जालीम उपाय एकच : स्त्री हा लेखणीचा विषय म्हणून त्याज्य समजावा. ही बंदी पाळली तर पुस्तकांची निपज खाडकन् उतरेल. " असला निर्वाणीचा निर्णय ह्या परिषदेला पचला नाहीं हें सांगणें नलगे.

आणि तो कठीणच आहे पचायला. तो ऐन गड्ड्यालाच हात घालतो. कोणत्या हाडाचा ललित-लेखक असलें कठोर पथ्य पाळील ? इतर लेखकांचें सोडा. त्यांची निर्मिति खुरटी, आणि तीहि कपाटशोभेसाठीं. अर्थात् त्यांच्यापैकींहि कित्येकजण मागील दारानें लालित्याचा सोस करतात; पण ते सच्चे नव्हेत; सोंगाडे. आजपर्यंतचें साहित्य पहा; कोठेंहि तेंच. युरोपचा वाल्मिकी होमर; त्याचें महाकाव्य ईलिअड म्हणजे ग्रीक सुंदरी हेलन हिची सुरस कहाणी. ' जा जरा पूर्वेकडे '. चिनी आद्य कवि वँग त्से फू ( टोपण नांव : चौ फुयांग ) यानें ख्रिस्तपूर्व एकविसाव्या शतकांत मिंग लू या राजकन्येच्या प्रणय–प्रकरणावर म्हणे " शंभर शब्दफुलें उमलूं दिलीं." एकेक फूल तीन सहस्र ओळींचें. (नायिकेचें पाऊल फक्त पावणे–पांच इंची असल्याचा प्रत्येक ओळींत खुबीदार उल्लेख आहे म्हणतात. ) प्राचीन इजिप्तचें तसेंच काहीं आहे असें ऐकतो. आपल्या आर्यावर्तांत तेंच. रामायण ह शवटीं सीतेचेंच; राम हा वनवासाचा धनी. ( आणि रामकथेचा जो नवीन अन्वय लावला जात आहे, त्यामुळें खलपुरुष रावण कीं तो असा संदेह निर्माण होऊं लागला आहे; राम-राज्याच्या कल्पनेचेंहि जरा हंसेंच होत आहे ! ) महाभारतांतहि कौतुक आहे तें द्रौपदीच्या पंच-भर्तृक योजनेचें ! हीं प्राचीन, प्रातःस्मरणीय, उदात्त महाकाव्यें, मग लौकिक लघु-काव्यांचें काय, आणि तेंहि अर्वाचीन ? त्यांत स्त्रिया जेठा मारून बसणारच. फार मागें जा हवें तर. पुराणांची तीच चालचलणूक आहे. ग्रीक पुराणें तर ओंजळ्यानेंच वाचावीत, आणि आपलीं पुराणं आपण सोवळ्यात गुंडाळून ठेवत असलों,

तरी तीं कांहीं “ लहानथोर स्त्री-पुरुषांनीं एकत्र बसून वाचण्याजोगीं ” आहेतच असें शपथेवर सांगणें कठीण. या सोंवळ्याओवळ्याचे धागे शेवटीं पोंचतात ते पौराणिक स्त्रियांपर्यंत ( म्हणजे देवींपर्यंत ) हें कटाक्षानें सांगावें असें नाहीं.

असो. पण हा पौराणिक, ऐतिहासिक, जागतिक वा वैश्विक व्याप आवरून ठेवावा आणि आपल्या घरा-माजघरापुरतें पाहावें; अगदीं मराठी आणि महाराष्ट्र यांपुरतें, आणि तेंहि आजकालच्या. आपल्या साहित्यांत आणि संसारांत स्त्रीचा कित्ती वडीवार आहे, आणि तो कां, हें स्वच्छ नजरेनें तपासलें पाहिजे. विशेषतः साहित्यांत; कारण त्याचेंच प्रतिबिंब पाहतां पाहतां संसारांत उमटत असतें. छापल्याबरहुकूम संसार करण्याची कसोशी कमीअधिक प्रमाणांत सर्वत्रच आहे......

मनोरंजन मासिकाचें ब्रीदवाक्य “ यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः ” असें होतें, सरसकट आधुनिक साहित्यावर त्याचाच पगडा चालत आला आहे. नारीपूजा हा जणूं स्थायी-भाव; इतका कीं, ‘ नारी ’ हा भुंडा शब्द पूजेचा भाव विघडवूं लागला; ‘ स्त्री ’ चा एकाक्षरी तुटकपणा नकोसा वाटला. म्हणून महिला, ललना, वनिता, असली तलम पैदास सुरू झाली. युवती शब्दाचाहि सैल आणि सर्रास उपयोग होऊं लागला. बोलतांना बाई म्हटलें तरी लिहितांना तिला महिला वा ललना करायचें. पण कां ? आपल्या वृत्तपत्रांतील मथळे आणि बातम्या या दृष्टीनें तरी वाचनीय असतात. “ केळीवाल्या महिलेस अटक ” किंवा “ फणसवाडींत काल संध्याकाळीं दोन युवतींनीं एकमेकींच्या झिंज्या ओढल्या, तें नेत्रदीपक दृश्य पाहाण्यास शेंकडो ललना जमल्या होत्या ” इत्यादि. या शब्द-लालित्याचे परिणाम हंसून विसरण्याइतके वर-वरचे नाहीत. आपला मनःपिंड बाळपणापासून बराचसा भाषाविपर्यावर पोसलेला असतो. शब्द-ब्रह्माचा बाऊ मानगुटीला असतो. तेव्हां शब्द आणि अर्थ यांतील तफावतीचा समज येण्यापूर्वी ( म्हणजे पन्नाशीपूर्वी ) आपली अशी हिरवट निष्ठा असते कीं, ज्या प्राणिविशेषाला ‘ ललना ’ इत्यादि नाजुक साजुक नांवें आहेत, ती अतीव मधुर आणि त्रिकाळ भक्ति करण्यासारखी असतो. भावबंधनांतील महेश्वर हा कांहीं जगावेगळा खुळा नव्हे. कथा-काव्यादींच्या अतिरिक्त आणि भाविक वाचनामुळें नादावलेल्या कल्पनेनें स्त्रीकडे पाहा-णारा हा प्रेमी गल्लोगल्लींत आढळेल. त्या नशेत कोणतीहि स्त्री त्याला देवीसमान भासते, आणि तिच्या सेवेंत आपल्या जिण्याचें साफल्य आहे अशी त्याची श्रद्धा असते. स्त्री-शरण साहित्याच्या असल्या कारवाईस आतां चित्रकलेनेंहि चिथा-वणी आणि मदत असते. सुमार कल्पनाशक्तीच्या प्रेमिकाला देवी-रूपाची जमवाजमव करण्याची मानसिक यातायातहि नको. दलाल–मुळगांवकर त्या देवींचा लहान-मोठा स्वर्गीय तपशील रंगा-रंगांत खुलवतात; संपूर्ण नग समोर हजर. महेश्वर चाळीस वर्षांमागचा; त्याच्या बॅगमध्यें फार तर एखादा दुसरा फोटो असेल ( त्याच्या तापलेल्या डोक्यांतील गरगरता मीनाबाजार सोडून द्या ! ); आजच्या महेश्वरापाशीं मुख-पृष्ठांची चळत असते. किंबहुना त्याची वाचन-लालसा मुखपृष्ठापाशींच थबकते, आणि त्याभोंवती पिंगा घालते. या स्त्रैण प्रवृत्तीला शह म्हणून पुण्याच्या एका सोज्वळ मासिकानें वर गाईचे चित्र दिलें, पण युगमहिमा असा कीं, ती तिरंगी गाय अकारण पुष्ट आणि रेखीव होऊन अगदीं ‘ युवती ’ सारखी दिसूं लागली.



अनुक्रमणिका

साहित्याचा हा स्त्री-गंड तसा सनातन आहे; आतां तो चेकाळला आहे, इतकेंच. नायका-शिवाय कादंबरी होऊं शकते म्हणे, नायिके-शिवाय नव्हे. प्रा. ना. सी. फडके तंत्राचे प्रयोग सांगूनसवरून करीत आले आहेत; पण नायिके-शिवाय कादंबरी किंवा कथा, किंवा कांहींहि, लिहिण्याचें ते धाडस करतील असें वाटत नाहीं. निदान नायिकेइतकें नायकाचें त्यांनीं वर्णन केलें तरी खूप झालें. 'राजकीय' कादंबरी हट्टानें लिहिणाऱ्यांचें काय झालें? त्यांतील बाईला (किंवा ललनेला) निराळें मखर दिलें फक्त. कोणी, नवाईसाठीं 'ग्रामीण' साज चढवला. आतां, जीवनाचा सखोल शोध घेणारी, अंतर्मनाची बित्तंबातमी सांगणारी, अनुभवाच्या विविध पातळ्यांचें 'कांहींसें' करणारी नवी कथा घ्या. तिच्याहि शोधाचें वळण स्त्रीच्या अंगाचेंच अधिक असतें. आणि तें वास्तव नाहीं असें कोण म्हणेल? महिला-मंडळांसाठीं पुरुष-पात्रविरहित, अथवा शाळकरी मुलांसाठीं स्त्री-पात्रविरहित नाटिका; त्याप्रमाणें पुरुषांसाठीं 'स्त्री-पात्रविरहित' कादंबरी कोणी लिहिली, तर वाङ्मयाच्या नवतेंत भर पडेल. एरव्हीं, आपलें बरेचसें ललित वाङ्मय स्त्रियांविषयीं, जणूं स्त्रियांनीं आणि बीवजा पुरुषांसाठीं लिहिलेलें असावें अशी कधीं कधीं टीका येते. नाटकांचें आठवलें. आपल्या कित्येक जुन्या श्रेष्ठांचीं नाटकें नायिकेवरच बेत-लेलीं नाहींत का? कित्येक नव्यांचीहि. फरक इतकाच कीं त्या जुन्या नायिका 'स्त्री-पार्टी', नव्या खुद्द स्त्रियाच! एकूण, साहित्याचेंच महिला-मंडळ होत आलें!

हें कथाकादंबरींचें. मग काव्याचें काय पुसावें? थोडे अपवाद सोडल्यास, असें दिसेल कीं विषय कोणताहि असो, अंतीं ब्रह्म एकलेंच—स्त्रीब्रह्म. त्याचेंच स्तोत्र वाजत असतें. कधीं सरळ, कधीं आडवळणानें. सरळसोट (कंकण घाटाची) प्रेम-कविता, किंवा राधा-कृष्णाची आध्यात्मिक डूब देऊन बनविलेली, किंवा प्रतिमांच्या गुंतवळ्यांत छपविलेली. रूपकाचा पायघोळ बुरखा आहेच. गोविंदाग्रजांच्या वृक्षाच्या नशिबीं 'इष्काचा जहरी प्याला' आला तो विजेसाठीं. माधवे जूलियनांचा डोह नदीसाठीं मुक्त होता कुसुमाग्रजांच्या पृथ्वीनें सूर्यासाठीं जीव टाकला, तर मर्ढेकरांच्या डांबरी फलाटदादानें चक्क आगगाडीसाठीं. असल्या पडदानशीन प्रेमाच कांहीं हवाला देता येत नाहीं. या सगळ्या साहित्यांतील गृहीततत्त्व हेंच कीं, स्त्री ही निष्पाप प्रेमळ, कोमळ, विनयशील. कधीं कठोर झालीच तर ती अजाणपणें वा अगतिकतेनें—निदान हुलकावण्या दाखविण्याच्या अल्लडपणामुळें. ती प्रेमळपणाचीच दुसरी बाजू!

ही स्त्री—प्रशस्तीहि क्षणभर स्वीकारतां येईल; पण तिचा उपसिद्धांत तेवढा साधा भोळा नाहीं. तो म्हणजे पुरुष हा पापी, स्वार्थी, दुष्ट आणि अरेराव. पाजीपणाचें कंत्राट त्याच्याकडे. साहित्यांत खल-पुरुषांची लंबीचौडी फौज खडी आहे. पण समस्त खल-स्त्रियांचें हळदीकुंकू करायचें म्हटलें, तर मुंबईच्या चाळींतल्या खोलींतहि दाटी होणार नाहीं. पतिव्रतांची भक्कम यादी हरएकाच्या नित्यपाठांत; सच्छील पुरुषांची नांवनिशाणी उरली नाहीं. किंबहुना, पतिव्रता याला विरुद्ध—लिंगी शब्दच भाषेंत नाहीं! पु. भा. भाव्यांसारखा पुरुषांचा पाठीराखा भाषाप्रभुहि तसा शब्द आजवर बनवूं शकला नाहीं! पवाडे काय ते स्त्रीच्या पुण्याईचे, पुरुषाच्या फार तर शौर्याचें; पण त्या शौर्यालाहि तिचीच पुण्याई आणि स्फूर्ति कारणीभूत हा बुळा संकेत आहेच! सिंधूच्या सद्गुणांचें दळण आणि रडगाणें तीन पिढ्या गाजत आलें. सुधाकर केवळ तिला विरोधानें उठाव देण्यासाठीं, सबब—त्रजा! त्याच्या दुर्दैवाची तमा नाहीं. वसुंधरेच्या मानानें भूपालाचा कांहींच गाजावाजा नाहीं. जणूं स्त्रीचें पावित्र्य क्रियाशील (active) आणि पुरुषाचें क्रियाशून्य (passive); पापांत मात्र उलट. तेथें पुढाकाराची मिरास पुरुषाची; स्त्री ही सत्तीची सोबतीण. ती फसते, तो फसवतो. अशी ही पापपुण्याची लिंगभेदानें वांटणी—सोपी आणि सुटसुटीत.

स्त्रियांविषयीं बोलतांना गहिंवर चढवायचा एक जुना खात्रीचा गुणकारी उपाय आहेच. तिच्या विविध रूपांपैकीं मातृरूपाविषयीं गळा दाटून बोलणें हा तो उपाय. 'हे माते' (अथवा आई) हा नाटकी हंबरडा अजूनहि कोणीतरी नव्या उमाळ्यानें फोडीत असतोच. "स्त्री ही अनंत कालची माता असते" असा अत्र्यांनीं विनोद केला. तो धूर्त स्त्रिया आणि भोळसट पुरुष या युतीच्या प्रभावानें बोधवचनांत जाऊन बसला. "पुरुष हा अनंत कालचा पिता असतो" असें अत्रे म्हणाले असते, तर जो तो खदखदून हंसला असता. वस्तुतः दोन्ही विधानें सारखींच मौजेची; पण पुरुषांच्या लाचारीमुळें पहिल्याचें भाग्य फळ-फळलें. "पुरुष हा क्षणाचा पति असतो" हें मात्र पुष्कळसें खरें; पण तें बोलायचें नाहीं! असो. आईप्रमाणें बापावर कोणी कविता रचीत नाहीं; पितृप्रेमावर कधीं परीक्षेंत प्रश्न पडायचा नाहीं. मातृदिनाची मुलांना सुटी आणि त्या दिवशीं सभासमारंभ. पितृदिन कोणाच्या ऐकिवांत आहे? पितृपक्ष असतो, पण तो सुतकी सोहळा. ही पित्याची पुल्लिंगी परवड. तीच विषमता बंधु-भगिनी संबंधांत; भगिनीचा भाव चढा.

दैवाची वक्रगति अशी अजब कीं, न्याय हवा, समता हवी ही आरोळी स्त्रियांच्या बाजूनें होत आली आहे; त्यांतहि उपरोध असा कीं, त्या ओरडींत सर्वांत अधिक आणि सर्वांत मोठे आवाज पुरुषाचे असतात. स्त्रियांचे पुजारी ही पुरुषाची दुरवस्था निसर्गाच्या दाबानें होतें असें म्हणतां येईल; पण स्त्रियांचें कैवारी ही शंकास्पद अवस्था केवळ मानसिक पोकळीमुळें होत असावी. हें कुऱ्हाडीचे दांडे जाणूनबुजून आपल्या गोताचे काळ होत असतील हें खरें वाटत नाहीं.

पन्नास पाऊणशें वर्षांपूर्वीं अशी आवई उठली कीं, स्त्रीवर्गावर घोर अन्याय होत आहे. त्यापूर्वीं शतकानुशतकें स्त्रियांच्या छळाचीं करुणरम्य कवनें आपण ऐकलीं होतीं; त्या साध्वींबद्दल आदर बाळगून होतों. पण आतां संपूर्ण स्त्रीवर्गच चिरडला जात असल्याची भाषा होऊं लागली. तीहि अतिशयोक्तीच्या भडक अलंकारासाठीं नव्हे, तर वस्तुस्थितीचा उच्चार म्हणून. आणि तेथून या विक्षिप्त वर्गविग्रहाला आरंभ झाला आहे. एका यमूचें दुर्दैव ओढवलें, म्हणून समस्त स्त्रियांनीं केविलवाणें दिसण्याचें काय कारण? पण लक्षांत कोण घेतो? मला वाटतें, यमूचें दुःख एकाग्रतेनें समजून घ्यायचें, त्याऐवजीं आपली सहानुभूति सगळ्या स्त्रीजातींत पांगून टाकल्यामुळें तिची आबाळ होते. त्यानें ती अधिक कष्टी होत असेल बिचारी. शंकरमामंजी पुरवले, पण हे पढत-रसिक नकोत.

यमूचें कमनशिब तेथेंच थांबलें नाहीं. तिचें नांव सांगणारी पुस्तकी प्रजा वाढूं लागली; तिला अजून खंड नाहीं. स्त्रियांचा उद्धार करण्याच्या एकुलत्या कार्यासाठीं त्यांनीं अवतार घेतलेला असतो. अशा अवतारी पुस्तकांच्या पुण्याईनेंच समाज सुधारल्याचें आपण ऐकतों. स्त्रियांचा उद्धार ही अव्वल सुधारणा. (या स्त्रिया देखील खरोखरच सर्व मराठी स्त्रिया नव्हेत—हा पांढरपेशांतील एक गट—म्हणजे पोटवर्ग!) उद्धार आणि रक्षण करायचें कोणापासून? अर्थात पुरुषांपासून. खल तोचि! तिच्या सर्व खऱ्या-खोट्या व्यथांची जिम्मेदारी त्याची. अक्षर-ओळख झाल्यापासून हें बाळकडू मिळाल्यामुळें पुरुषद्वेष रक्तांत भिनतो. स्त्रीपेक्षा पुरुषाच्या अधिक


थोड्याशा सनलाइटनें पुष्कळच कपडे धुवून निघतात!
—ही त्याच्या जादा फेसाचीच करामत!
छोट्या हातीं मोठें काम : एवढ्या कपड्यांना इस्त्री करायची – अर्थात् आपल्या मुलींची–कुंदाची नी मंदाची मदत उषाताईंना घ्यावीच लागली। कपडे तरी किती हे! पण थोड्याशा साबणातच उषाताईंनी काढले हे धुवून। धुतले अर्थात्च सनलाइटनंच। आपट-धोपट न करता कपड्यांतील मळाचा कणन् कण त्याच्या फेसानें बाहेर पडून निघून जातो. आपले सारे कपडे धुण्यासाठी सनलाइटच वापरायचा, असा नियम करा ना।
SUNLIGHT SOAP
सनलाइट साबणानें कपडे शुभ्र व लख्ख धुवून निघतात
S. 263-X52 MA
हिंदुस्तान लिव्हर लिमिटेड, यांचे उत्पादन

कारणें त्याच्या रक्तांत कोण्या एके काळीं आपल्या रानटी पूर्वजानें ( स्व ) स्त्रीशीं केलेल्या दंडेलीची धूसर स्मृति आणि त्याबद्दलची उपरति या आलटून पालटून चाळवत असतात. लेखणीशीं लगट जमत असली, तर तो परतफेडीच्या उदात्त आवेशात स्त्रीदास्यविमोचनाच्या गर्जना करतो आणि तिच्या वेदनांनीं कण्हतो.

हरिभाऊ आपट्यांपासून आजतागायत हें स्त्री-रक्षण व्रत अनेक पुरुषांनीं नेकीनें पाळलें आहे. त्यांत स्त्रियाहि आहेत. विभावरीचे कढत निःश्वास अजून निवले नाहींत. " न स्त्री स्वातंत्र्यमर्हति " असें कोठें मनू चुकून बोलून गेला, त्यावर केवढा गहजब. तो डाग मनूच्या पुत्रांना अजून चिकटून आहे; ही समाजरचना म्हणे पुरुषांची. स्त्रीला त्यांत स्थान नाहीं. तिचा स्वाभिमान जागृत झाला ( १९३४ मध्यें ) आणि ती तरातरा घराबाहेर पडली. ती ज्या बाहुलीच्या चिथावणीनें, ती नॉर्वे देशांतील नोरा मराठी पेहरावांत आणखी कांहीं वर्षांनीं अवतरली. त्याच सुमारास रांगणेकरांची 'कुलवधू' हि अशीच गातो गातां बाहेर पडली. बाहेर पडून या बहाद्दर स्त्रियांनीं काय केलें असेल बरें ?

घराचा कोंडवाडा झाला एकूण,--म्हणजे फक्त स्त्रीसाठीं ! नाहीं तरी स्त्रीला गाय म्हणण्याचा प्रघात आहेच. गायच कां ? ती गरीब, निरुपद्रवी, (आखुडशिंगी) आणि उपयोगी असते अशी कांहींशी या चतुष्पाद, दुभत्या रूपकाची संगती लावावी लागते. पुढची पायरी म्हणजे पुरुष हा म्लेंच्छ –अगदीं कसाई. तेव्हां गो-प्रतिपालक शिलेदार लेखण्या परजावीत ठाकलेच. खऱ्या गाईवरची श्रद्धा आतां मावळली, पण या अलंकारिक ( आणि अलंकृत ) गाईचें माहात्म्य ओसरलें नाहीं. तिच्या वतीनें अजूनहि कित्येकजण हंबरत असतात ! तिला चारा घालण्याचें सुकृत मोठें लोकप्रिय आहे.

गाईच्या पोटांत सगळ्या देवांची वस्ती असते म्हणतात; ( मानवी ) शरीर शास्त्राच्या तक्त्यासारखें गाईच्या उघड्या उदराचें चित्र पाहिल्याचें आठवतें. त्याला वीक-एंडला पुण्याला जाणाऱ्या 'जनते' ची कळा होती, अशी देवांची झुंबड ! स्त्रीमध्येंहि अशीच सद्गुणांची खेंचाखेंची असते असाहि त्या रूपकाचा अर्थ असावा. मनुष्ययोनींत जे जे सद्गुण शक्य आहेत, ते ते तिच्यांत जन्मतःच असतात. त्यांची यादी कितीहि लांबवली, तरी पांच दहा गुण राहाणारच. स्त्री-निष्ठ पुरुषांची कल्पना एकदां पेटली कीं, तिला मर्त्यलोकांत नसलेले गुणहि स्त्रीठायीं दिसूं लागतात. " स्त्रीसुलभ " हा छान शब्द फक्त गुणांनाच लावतात, नाहीं कां ?

स्त्रीच्या विविध भूमिकांचा ओझरता उल्लेख वर आलाच आहे; त्या भूमिकांत या गुणांची वांटणी करण्याचा प्रघात आहे; सर्वांत अधिक अर्थातच मातेला. तिच्या हातीं पाळण्याची दोरी असते. ( मग ती खेचो कोणीहि ) म्हणून तिच्याकडे जगाच्या उद्धाराचा मक्ता. तिला 'मंगल' वगैरे विशेषणें लावायचीं असतात. आई म्हणजे श्यामची. सगळ्या खस्ता तीच खाते ( त्यामुळेंच तिची कीर्ति एवढी पुष्ट झाली ), निःस्वार्थ माया करते, ( चांगलें ) वळण लावते, तसेंच स्फूर्ति ( आणि कवितेला व निबंधाला विषय ) देते. आपल्या आवतीभोंवती पोरांना बदडणाऱ्या, त्यांची आबाळ करणाऱ्या, त्यांच्यांत भेदभाव करणाऱ्या, शेजाऱ्यांचें खुसपट काढावयास लावणाऱ्या व तसल्या लाख्या-लाख्यांकडे प्रेमळपणें कानाडोळा करणाऱ्या मातामाऊली हव्या तेवढ्या असल्या, तरी त्यां अपवाद समजायच्या,--पुस्तकांतील नियमाला.

भगिनी ही त्या माऊलीची छोटी आणि शिकाऊ आवृत्ति. तीहि आपल्या कुवतीप्रमाणें बंधुराजाला हिडिसफिडिस करते., चहाड्याचुगल्यांचे धडे देते, " माझें-तुझें " चे हेवेदावे उगाळीत बसते. पुन्हां भाऊबीजेच्या हळवेपणांत हे सगळें पुसून टाकण्याची सोय आहेच. तिला एकच डांचतें: नणंद या भूमिकेंत नायिकेच्या छळाची थोडी जबाबदारी तिला उचलावी लागते. पण त्या अपकीर्तीचा अर्धा वांटा तिला भावाकडे लोटतां येतो. त्याचप्रमाणें आईच्या ' सासू ' या जोड भूमिकेंत तसलें किल्मिष आहेच. पण तिच्या खाष्टपणाचा संबंध नवऱ्याच्या मेंदपणाशीं लपतां येतोच !

स्त्रियांच्या आधुनिक कैवाऱ्यांत मामा वरेरकरांचा मान मोठा;—म्हणजे पुरुषांच्या वैऱ्यांत. पुरुष ही स्त्रीच्या संसार-सुखाच्या मार्गांतील धोंड आहे असा कांहींसा त्यांचा दावा आहे. दुर्गुणांची कडक यादी करून त्यांनीं ती पुरुषजातीच्या पाठीवर चिकटवून दिली. इतकेंच कीं त्यांच्या नायिका कजाग, भांडखोर आणि तोंडाळ असतात. यांतील वास्तवतेबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत !

शेवटीं, स्त्रीची प्रमुख भूमिका: पत्नीची. तीहि गुणांची खाणी असा तिचा कथा-काव्य-लौकिक; व्यवहारांतील लौकिक मात्र तसा नाहीं. म्हणून असेल कदाचित्, पण आपल्या प्रेमाच्या कादंबऱ्या या सहसा विवाहापाशींच विराम पावतात. विवाहपूर्व ( किंवा विवाहान्त ) सुख हाच त्यांचा विषय. फडक्यांच्याच पाहा. पुढील सगळे गृहित धरायचें: म्हणजे कोवळा, अजाण, वाचक असेल तर नायक-नायिकेच्या भावी सुखाच्या कल्पनेनें तो स्वतःच गुदमरून जातो बापडा. जाणता असला तर कादंबरी खालीं ठेवून म्हणतो, " संपलें ! आणखी एकाचें सुख संपलें ! " —हें तो सावधपणें, स्वतःशींच म्हणतो, किंवा एखादा सम-सुखी असेल त्याच्यापाशीं. त्याला ठाऊक असतें त्या नायकाचें पुढें काय होणार तें.-त्याविषयीं अनेकांनीं लिहिलेंहि आहे—कथा नाटकांतून. पण, दुर्दैवानें, तें विनोद म्हणून खपतें. ' गांजलेला नवरा ' हा हंसण्यावारी विसरला जातो. स्त्रियाहि हंसून बिलंदरपणें प्रसंग साजरा करतात, आणि खाजगींत, त्याचें उट्टेंहि काढतात. एकूण लहानपणीं आई हिडिसफिडीस करते, वाढत्या वयांत जोडीला वहिणहि, ' मोठे ' पणीं बायको. ती तें हक्कानें करते; तन्हातन्हांनीं करते. हा सगळा जाच आजवर पुरुषानें कां सहन केला ? आणि वर स्त्री-पूजेच्या सोंगांत तो कां सामील झाला ?... उंदरालाहि आपण, निदान आपले बापजादे, एकेकाळीं सिंह असल्याचीं स्वप्नें पडतात; आणि जागेपणीं त्या आधारावर तो नसती आयाळ झटकून ' चीं चीं ' करतो. आणि आपण ज्याला ' रोमान्स ' हें नांव दिलें आहे, त्या गुळगुळीत परंपरेंत पुरुषाकडे सिंहाची व स्त्रीकडे शेळीसारखी मऊ भूमिका असते. हें नाटक चालू ठेवणें त्याच्या हिताचें असतें. छळाचा विसर पडायला, आणि छळवादिनीला खूष ठेवायला......

या सत्यस्वरूपांतील स्त्रीचें संपूर्ण साहित्यांत कधीं फारसें दर्शन होत नाहीं; झालेंच तर तिकडे दुर्लक्ष होतें. तेथें हरघडी डोळ्यांत भरणारी स्त्री सुंदर, नाजुक, आणि प्रेमळ असते. तीहि तिची एक भूमिका आहे हें मान्य केलें पाहिजे. ती प्रणयिनीची-म्हणजे क्षणिक, तात्पुरती, भूमिका आहे. त्यावेळीं ती कलावती असते; तिचे रसरंग उठून दिसतात. श्रीमंतांच्या मठ्ठ मुली विवाहासाठीं ' तयार ' केल्या जातात; त्या तयारींत नृत्य संगीतादि कलांचा अंतर्भाव असतो. पण तसें पाहिलें तर सर्वच ' युवती ' आपल्या अंगच्या सर्व कला, त्यांच्या अत्यंत मधुर रूपांत, त्यावेळीं दाखवतात; ते डावपेंच उपजत येतात; शिकवावे लागत नाहींत. तेव्हां वाणी मंजुळ होते, हालचाली अकारण बांकदार होतात, पळभर बुद्धीलाहि धार येते. ती यायचीच. कारण सावज सांपळ्यांत येण्याचा तो मोका असतो. ता साधला कीं हे पळाचें लावण्य वैभव विखरून जातें; पुन्हां रखरखीत उजेड पडतो. स्त्री-पूजेचा सगळा दव्हारा त्या निस त्या पळावर आधारलेला असतो. म्हणून " स्त्री ही क्षणाची प्रणयिनी आणि अनंत काळची पत्नी असते " असें म्हटलें तर तें सत्याला अधिक जवळ होईल.

हें सत्य ठसविलें पाहिजे; विनाकारण, स्त्री म्हणतांच भक्तीची कवाईत नको. तिच्या दुःखाचें नाटकी अवडंबर नको. तें डोळ्यांतून पाणी काढायला सोपें आहे खरें; तोंपी फिरवितांच लागलें वाहायला. पुरुषांचींहि दुःखें आहेत, तीं अधिक बिकट आहेत आणि त्यांतील कित्येक स्त्रीनिर्मित आहेत. हें उघड्या डोळ्यांनीं पाहिलें पाहिजे. स्त्रीगौरवाच्या दीर्घ परंपरेमुळें तिच्याच स्वतःबद्दल अवास्तव कल्पना झाल्या आहेत. हा दोष केवळ तिचा नव्हे, कांहींसा पुरुषांचाहि. पण तो निपटून काढला नाहीं तर पुरुषजातीचें भविष्य खडतर आहे. आतां पुरुषांचा उद्धार करण्याची वेळ आली आहे. त्यांना कैवारी हवा. तसा कोण मामा निघेल तो निघो...तोंवर ' पुरुषजन्मा, ही तुझी कहाणी ' म्हणून, निदान काय झालें व काय होत आहे याची स्वच्छ जाणीव ठेवली पाहिजे. तरच त्या दलित वर्गाला कांहीं तरणोपाय आहे.



# स्वामी तिन्ही जगाचा, बाईविना भिकारी!

—मो. ग. रांगणेकर

काय हो संपादक ! यंदा तुमची—आणि तुमच्यावरोवर आमचीहि दिवाळी सुखांत जाऊं नये, अशी तुमची इच्छा आहे काय ? दिवाळीसारख्या आनंदाच्या सणांत घरोघर धुसफूस सुरू व्हावी आणि दिवाळीचा शिमगा व्हावा, ही काय तुमची जगावेगळी लालसा ! यंदाच्या दिवाळी अंकांत वायकांवर लिहिलले लेख छापण्याचें तुमचें धाडस तर दांडगेंच म्हटलें पाहिजे; पण ते लेख लिहायला तयार होण्याची आमचीहि छाती अफाट म्हटली पाहिजे. आम्हांला ओळखणाऱ्या बायकांना, स्त्रीजातीबद्दल आमचें खरें मत काय आहे, तें या लेखामुळें अखेर कळून येणार; आणि आजपर्यंत हंसण्यारडण्याचीं अनेक नाटकें करून टिकवून ठेवलेले संबंध दिवाळीपासून संपुष्टांत येणार, हेंच या लेखाचें सार !

यापेक्षां तुम्ही आम्हांला अणुयुगाबद्दल लेख लिहायला कां सांगितलें नाहीं ? मराठी व्याकरण आणि शुद्धलेखन हा रसाळ विषय तुम्हांला कसा सुचला नाहीं ! फोर्मोसा, कोरापुटमधील ग्रामनिर्माण कार्य, मोहेंजोदारो व हरप्पा येथील उत्खनन, साहित्य आणि संस्कृति, पंजाबांतील भाषिक आंदोलन या विषयांवर काय आम्ही लेख लिहूं शकलों नसतों ? आणि विषयच सुचवावयाचे, तर जरा सोपे विषय तुम्हांला सुचले नसत काय ? उदाहरणार्थ, संगीतांतील मार्क्सवाद, नवकाव्य आणि न्यूमोनिया, भूदानाचें रंगभूमीवरील स्थान यांसारखे विषय आम्हांला सुचवले असते, तर आम्ही फर्मास लेख लिहिले असते. गेला बाजार भारताच्या पंचवार्षिक योजना, द्वैभाषिकाची फलश्रुति, गलिच्छ वस्तीचें उच्चाटन, पाकिस्तानांतील अंतःस्थ यादवी हे विषय तरी दिवाळी अंकांत शोभून दिसले असते. पण 'बायका' हाच विषय नेमका तुम्हांला सुचावा, हें तुमचें दुर्दैव; आणि त्या विषयावर लिहायला नेमके आम्हीच तुमच्या डोळ्यापुढें उभे राहिलों, हें आमचें दुर्दैव ! असो. आयुष्य ही पुष्पशय्या नसून तें खडकाळ माळरान आहे, असें कोणीसें—(कोणीसें कशाला ? खांडेकरांनींच म्हटलें असेल !—) म्हटलें आहे. तेव्हां आयुष्यांत ओढवणाऱ्या अनेक आपत्तींपैकीं हीहि एक आपत्ति समजून आम्ही तिला तोंड द्यायला तयार आहों.

प्रथमच मला एक गोष्ट स्पष्ट करून सांगितली पाहिजे, कीं हे अनुभव प्रत्यक्ष माझ्या वांट्याला आले नसून, मी ते माझ्या सभोंवतालच्या आप्तेष्टमित्रांच्या आयुष्यांतून गोळा केले आहेत. एकटा पुरुष अनेक स्त्रियांच्या वाटेला सहसा जाऊं शकत नाहीं. याचा अर्थ, एखाद्या स्त्रीशीं गांठ पडल्यावर तिच्या कचेंतून सुटून दुसऱ्या स्त्रीपर्यंत तो सहसा पोंचत नाहीं. कारण एव्हांना तो अर्धमेला झालेला असतो; व पुन्हां नव्या स्त्रीवरोवर सामना करण्याचें त्राण त्याच्यांत उरत नाहीं. तेव्हां स्त्रीजातीचे सुरस आणि चमत्कृतिपूर्ण नमुने एकाच पुरुषाला गोळा करणें सर्वस्वी अशक्य आहे. इतकेंच काय, पण माझ्याप्रमाणें आणखी पन्नास लेखकांकडून तुम्ही वायकांवर लेख लिहून घेतले, तरी त्यांनीं वर्णन केलेल्या नमुन्यांखेरीज आणखी कित्ती तरी नमुने शिल्लक उरले आहेत, असें आढळून येईल. कारण, परमेश्वराप्रमाणें स्त्रियाहि अवर्णनीय आहेत. या जगांत एका माणसासारखा दुसरा माणूस जसा दिसत नाहीं (हमशकल सोडून !), तशी एका स्त्रीसारखी दुसरी स्त्री आढळत नाहीं. नुसता प्रेमापुरताच विचार केला, तरी असें दिसून येईल कीं, एक स्त्री आपल्या नवऱ्यावर खूप प्रेम करते, दुसरी मुळींच करीत नाहीं, तिसरी केल्यासारखें भासवते, चौथी करण्याचा प्रयत्न करते, पांचवी इतकें करते कीं, नवऱ्यालासुद्धां अजीर्ण व्हावें, सहावी उठल्याबसल्या कादंबऱ्यांतील नायक-नायिकांच्या प्रेमाचीं वर्णनें नवऱ्याला ऐकवून तसें प्रेम तो करीत नसल्याबद्दल सदोदित कुरकुर करते, सातवी त्याच्या प्रेमाबद्दल संशय बाळगते, आठवी—

नुसत्या प्रेमापुरतेंच पाहिलें, तर पाकशास्त्रांतील हजार क्रियाप्रमाणें स्त्रियांचे हजार प्रकार आढळतात. भोपळ्याची भाजी, भरीत, चटणी, भजीं, वड्या, कोशिंबीर, सार, भरलेला भोपळा, दह्यांतला भोपळा असे जसे अनेक प्रकार पुस्तकांत वाचायला मिळतात, तसे भरलेलें प्रेम, उकडलेलें प्रेम, तळलेलें प्रेम, गाळलेलें प्रेम, पाकांतलें प्रेम—असे प्रेमाचेहि अनेक नमुने चाळीचाळींत सांपडतात आणि गंमत ही कीं, प्रत्येक पुरुष शेजाऱ्याच्या संसारी जीवनाचा हेवा करीत असतो ! ज्याला ऑफिसांतून घरीं आल्यावर प्रेमाचा एक शब्द मिळत नाहीं (फक्त चहा मिळतो), तो पलिकडच्या ब्लॉकमधल्या गोविंदरावांवर प्रेमाचा वर्षाव होत असलेला पाहून सुस्कारा सोडतो; आणि गोविंदराव, बायकोच्या अतिरिक्त प्रेमानें कासावीस होऊन त्यांच्या पलिकडच्या ब्लॉकमध्यें स्वस्थ पुस्तक वाचीत बसलेल्या माधवरावांचा व चष्मा लावून तांदूळ निवडीत बसलेल्या मालतीबाईंच्या सोज्वळ संसाराचा हेवा करीत असतात

पुरुषांना नेहमीं शेजाऱ्याचीच बायको कां आवडते, हा प्रश्न जसा बायकांना सुटलेला नाहीं, तसा पुरुषांनाहि सुटलेला नाहीं. माझ्या ओळखीच्या एका गृहस्थाची बायको इतकी देखणी होती कीं, शेजारच्यापाजाऱ्यांचे डोळे नेहमीं तिच्याकडे वळलेले असत आणि आश्चर्य हें कीं, तिचा नवरा मात्र नेहमीं गॅलरींत उभा राहून समोरच्या बिल्डिंगमधल्या एका सुमार स्त्रीला डोळ्यांत पंचप्राण आणून धुंडाळीत असे. मिठाईवाल्याची नजर समोरच्या भजीवाल्याच्या दुकानांत खिळलेली असावी, त्यांतलाच हा प्रकार. उलट, मला असा एक इसम माहीत आहे कीं, आपली बायको चारचौघींसारखी असतांहि तिच्याबद्दल साशंक होऊन, ऑफिसांत जातांना तो बाहेरून दरवाजाला कुलूप ठोकून जातो. "स्त्रीजात तेवढी निमकहराम !" असा 'पुण्यप्रभाव' नाटकामुळें त्याचा समज होऊन बसला आहे कीं काय कोण जाणे ! पण एकंदरीत स्त्रियांबद्दल पुरुषांचीं जीं मतें झालीं आहेत, तीं मोठीं वैचित्र्यपूर्ण आहेत.

नुकताच मिशी व दाढी फुटलेला तरुण शाळा-कॉलेजें सुटण्याच्या वेळीं कुठेंतरी रस्त्याच्या कोपऱ्यावर टेहेळणी करीत उभा असलेला दिसतो, तो स्त्रीजातीबद्दल वाटणाऱ्या आकर्षणामुळेंच. रद्दड्यांची कादंबरी 'गाइड' म्हणून खिशांत ठेवून तो एखाद्या मुलीवर प्रेम करूं लागतो. नंतर अडथळे उत्पन्न होऊन त्याचा तिच्याशीं विवाह होतो, नंतर ओघानेंच मुलें होतात, मुलें झाल्यामुळें साहजिकच फी, पुस्तकें, कपडे वगैरे खर्च सुरू होतात, आणि अशारीतीनें आयुष्याचा प्रवास करीत अखेर तो वैतागतो आणि या सर्व दुःखांचें मूळ जी स्त्री, तिचा द्वेष करूं लागतो. त्याच्या दृष्टीनें स्त्री ही प्रथम अवस्थेंतच—म्हणजे शाळा सुटण्याच्या वेळीं कोपऱ्यावरून टेहेळणी करतांना—विलोभनीय असते. पण ती प्राप्त झाल्यावर जीं दुःखें सुरू होतात, तीं आयुष्याच्या अखेरपर्यंत पाठ सोडीत नाहींत. या मधल्या काळांत, सुरुवातीला खिशांत ठेवलेल्या कादंबरीचीं पानें त्याला हळुंहळुं फाडून टाकावींशीं वाटूं लागतात. स्त्रीजातीबद्दल आपल्या मनांत भलत्याच भावना निर्माण करणाऱ्या लेखकाच्या जातीबद्दल त्याच्या मनांत सूडाची भावना निर्माण होते. "स्त्री ही क्षणाची मुखशुद्धि आणि अनंत काळची पोटदुखी," असा त्याचा ठाम ग्रह होतो. प्रेमासाठीं जवळ केलेली स्त्री संसारांत त्याला दूर लोटावीशी वाटते. कुमारिकेचा शृंगार मातृत्वानंतर ओसरून जातो. आणि जी स्त्री सुरुवातीला त्याच्या डोळ्यांना प्राजक्ताच्या फुलासारखी भासते, ती अखेरीअखेरीस डोळ्यांत पडलेल्या फुलासारखी त्रासदायक वाटूं लागते.




मग इतकें असूनहि कालिदासापासून काणेकरांपर्यंत सारे कवी आणि लेखक स्त्रियांचें जें काव्यांतून आणि कादंबऱ्यांतून स्तोम माजवतात तें कां, असा एखादी स्त्री सवाल टाकील. याला उत्तर एकच. प्रत्यक्ष संसारांत अपूर्ण राहिलेल्या वासनांचीं आणि भावनांचीं चित्रें, त्यांची अतृप्त लेखणी काव्यांत आणि कादंबऱ्यांत रसभरितपणानें रेखाटूं लागते. जसं, क्रिकेटची बॅट उचलतां येत नसलेला माणूस क्रिकेटवर शास्त्रीय लेख लिहितो अगर भसाड्या आवाजाचा माणूस संगीतावर गुळगुळीत लेख लिहीत असतो! त्यामुळें बायकांनीं, आपल्याबद्दलचीं कविजनांनीं केलेलीं रसभरित वर्णनें वाचून हुरळून जाण्याचें कारण नाहीं. स्वयंपाकघरांत गालाला पीठ व नाकाला कोळसा लागलेल्या व लुगडें गुडघ्यापर्यंत व पोलकें पाठीपासून एक वीत पोकळ असलेल्या सुग्रण स्त्रीनें स्वतःला शकुंतला समजण्यांत काय अर्थ? आणि पुष्कळशा बायकांचा स्वतःच्या सौंदर्याबद्दल गैरसमज झालेला असतो. तो अर्थातच पुरुषांना तापदायक होतो. सौंदर्याच्या बाबतींतच नव्हे, तर बाजारांत खरेदीला गेल्यावर नवऱ्याला गप्प बसायला सांगून त्या दुकानदाराशीं घासाघीस करून सत्तावीस रुपयांचें लुगडें साडेबावीस रुपयांना घेऊन आपलेंच व्यवहारचातुर्य दाखवतात; रविवारचा 'सकाळ' पुढ्यांत ठेवून, नाहीं नाहीं ते पदार्थ तयार करून आपल्या सुग्रणपणाचा टेंभा मिरवतात; हार्मोनियमच्या क्लासांत जाऊन घरीं आल्यावर कलेच्या नांवाखालीं ऑफिसांतून थकून आलेल्या नवऱ्याला आणखी थकवतात; चूल आणि मूल एवढेंच आपल्या जीवनाचें साध्य नव्हे, असें समजणाऱ्या कांहीं बायका एखाद्या महिलामंडळांत जाऊन, घरांतल्या पुरुषांना ऑफिसांतून आल्यावर, स्टोव्हवर चहा करून घ्यावयाचा निरोप ठेवतात; (पण त्यावेळींहि एका कपाला दीड चमचा साखर आणि एक चमचा चहा घालण्याबद्दल सूचना दिल्याशिवाय रहात नाहींत।)

आधींच कविजनांनीं चढवून ठेवलेल्या आणि त्यांत समान हक्काच्या कल्पना कांहीं अदूरदर्शी पुरुषांनीं डोक्यांत भरवून दिल्यामुळें बेफाम झालेल्या स्त्रियांना आतां आवरणं मुश्किल झालें आहे. पुरुषांचें एकहि कार्यक्षेत्र त्यांनीं शिल्लक ठेवलेलें नाहीं. पण यामुळें जर कोणी असें समजेल कीं, स्त्रिया पुरुषांप्रमाणेंच हुषार झाल्या आहेत, तर त्या बाबतींत मात्र मतभेद संभवतो. शंभरांत नव्याण्णव स्त्रिया मूर्ख आढळतात असें मी म्हटलें, तर शंभरावी स्त्री माझ्याशीं नक्की सहमत होईल! पुष्कळशा स्त्रिया स्वतःला हुषार, चतुर समजतात; पण खरें म्हटलें म्हणजे त्या अगदींच बावळट असतात. नवरा आपल्याशीं घरांत हंसून खेळून गप्पा मारतो, यामुळें त्याच्याबद्दल फार चांगल्या कल्पना करून घेतलेल्या स्त्रीला, घरांतून बाहेर पडल्यावर तो किती बायकांकडे जातो, याची कल्पना नसते. मग त्यानें मित्राला भेटण्यासाठीं जाण्याचें निमित्त केलें तरी तिला तें खरें वाटतं आणि उशीर झाला, तर त्यानें तयार करून सांगितलेल्या गोष्टीवर तिचा चटकन विश्वास बसतो. हें वाचून इतर स्त्रिया म्हणतील कीं, या बाबतींत तिच्या पतिप्रेमाचें कौतुक केलें पाहिजे. पण मी म्हणतो, हा स्त्रियांचा बावळटपणा आहे आणि पुरुषांना त्याचा भरपूर फायदा घेतां येतो. पुरुषांवर इतका विश्वास ठेवायला त्यांना सांगितलं आहे कोणी? जो नवरा आपल्याशीं लग्नानंतर दहा वर्षांनींहि चांगुलपणानें वागल्यासारखें दाखवतो, तो नक्की डांबिस असला पाहिजे, असें आजपर्यंत एका स्त्रीला तरी वाटलें आहे काय? आतां आम्ही पुरुषांनींच आपलें रहस्य स्त्रियांना सांगूं नये; पण आमची बाहेर कुठें भानगड असली कीं, आम्ही घरांत बायकोशीं लाडीगोडी लावतो आणि हव्या-नको त्या विषयाबद्दल वाजवीपेक्षां जास्त जिव्हाळा दाखवून बडबड करीत असतो.

पण हें कळण्याचें चातुर्य बायकांत आहे कुठें? सरसकट नव्याण्णव बायका सुमार बुद्धीच्या असतात. कुठें काय बोलावें, हें तर त्यांना कधींच कळत नाहीं.

माझ्या माहितींतली एक स्त्री नेहमीं आपल्या थोरामोठ्यांशीं ओळखी असल्याचें संधि मिळेल तेव्हां सांगत असते आणि स्वतःचा बावळटपणा प्रकट करीत असते. दुसऱ्या एका सरकारी हुद्देदाराच्या बायकोला चारचौघांत आपल्या नवऱ्याचा 'दिनू' अगर 'दत्तू' असा एकेरी उल्लेख करून त्याच्या पगाराचें आणि इतर गोष्टींचें कौतुक करण्याची हास्यास्पद खोड आहे. तिसरी एक श्रीमंत स्त्री आपल्या श्रीमंतीचा बडेजाव मिरवतांना, घरीं ऐकलेल्या राजकारणांतल्या बातम्या स्वतःच्या डोक्यांतून निघाल्याची ऐट आणून, नेहरूंचें चुकलें कुठें आणि

पंचवार्षिक योजनेंत काय उणिवा आहेत, यावर आपलें मत सांगते आणि हंसें करून घेते त्यामुळें स्त्रियांना आपल्या बरोबरीनें मान देण्याचा पुरुषांचा प्रयत्न त्या आपल्या बावळटपणानें नेहमीं हाणून पाडतांना दिसतात.

पण इतकें असूनहि जगाच्या सुरवातीपासून आम्हां पुरुषांना बायकांबद्दल जें आकर्षण वाटत आलें आहे, तें मात्र कमी होण्याचें चिन्ह दिसत नाहीं. त्या अशिक्षित असोत, बावळट असोत, कजाग असोत, फाजील व्यवहारी असोत,-- कशाहि असोत, आमच्यापैकीं कुठलो तरी पुरुष तिचा कजागपणा अगर मूर्खपणा स्वीकारून तिच्याशीं रममाण झालेला दिसतो. म्हणजे पुरुषांच्या जीवनांतील स्त्री ही नैसर्गिक, पण हवी-हवीशी वाटणारी आपत्ति आहे, असें म्हणायला हरकत नाहीं. जगांत स्त्री नसती, तर पुरुषाला जगावेंसें वाटलें नसतें, असें म्हणण्यापर्यंत आम्हां बहुतेक सर्व पुरुषांची मजल गेली आहे. घरोघर नवराबायकोचें पटत नाहीं, आणि तेंच एकमेकांचें आकर्षण होऊन बसलें आहे. कदाचित् पटत असतें तर एकमेकांचा कंटाळा आला असता कीं काय कोण जाणे!

अशी ही स्त्री पत्नीच्या, आईच्या, बहिणीच्या, मैत्रिणीच्या अशा निरनिराळ्या रूपांनीं पुरुषाच्या लाडाचा विषय होऊन बसली आहे. आजपर्यंत पुरुषांनीं जितके स्त्रियांचे लाड केले आहेत, तितके स्त्रियानीं पुरुषांचे केलेले कुणी पाहिले आहेत? (यांत खाजगी संबंध विचारांत घेतलेले नाहींत!) अशा वेळीं वाटूं लागतें कीं, आम्ही स्त्रियांना बावळट आणि मूर्ख म्हणतों, पण आम्ही पुरुषच तर बावळट नाहीं? खुशाल आपले स्त्रियांना डोक्यावर घेऊन नाचतों आहों. त्यामुळें आपणच त्यांना स्वतःबद्दल भलत्याच समजुती करून घ्यायला मदत करतों आहों. आणि वर त्याच्यावर लेख लिहून त्यांच्या स्वभावांतील दोष सांगतों आहों!

खरेंच, आम्ही पुरुषच जास्त मूर्ख आहों! आणि 'सिंह आणि माणूस' या इसापनीतींतील गोष्टीप्रमाणें स्त्रियांना पुरुषावर लेख लिहायला सांगितलें, तर त्या हेंच म्हणतील!

• • •



# किलवर राणी, चौकट गुलाम!

—वसन्त सबनीस

'ईश्वरसाक्ष खरें सांगीन' ह्या पिंजऱ्यांतील साक्षीदाराच्या बाणीनं आज मी लिहिणार आहे. परंतु साक्षीदाराला न्यायालयाचं जें अभय आणि प्रसंगीं संरक्षण मिळतं, तें मला मिळणार नाहीं हें माहीत असूनहि मी आज सत्य सांगणार आहे.

नुसतं बायकोबद्दल बोलायचं म्हटलं तरी हिमालयाएवढं धैर्य लागतं. मग खरं बोलायचं म्हणजे केवढं धैर्य लागेल हें तुलनेनं सांगायला पर्वत शिल्लक नाहीं! बायको म्हणजे आपलेच ओठ! कोणत्या ओठानं सांगायचं? परंतु बायकोबद्दल खरं बोलायचीहि संधि माणसाच्या आयुष्यांत येते यावर माझा आजपर्यंत विश्वास नव्हता! पण इंग्रजी म्हणींतील कुत्र्याप्रमाणें प्रत्येक नवऱ्यालाहि एकादा दिवस सोन्याचा होऊन भेटायला येतो. आयुष्यांत एकदांच येणारी ही पर्वणी आहे. कारण घरांत बायकोबद्दल बोलण्याचा आत्मघातकीपणा कोणी करील असं वाटत नाहीं. आणि बाहेर इतरांच्या बायकांबद्दल इतकं ऐकावं लागतं कीं, त्यांत आपल्या बायकोचं घोडं पुढं दामटणं सर्वथैव अशक्य असतं. अशा परिस्थितींत कुणी स्वतःच्या बायकोबद्दल मोकळेपणानं चार शब्द सांगा असा प्रेमळ आग्रह केला, तर हर्षवायूनं त्याची वाचाच बसायची! ब्रह्मानंद ब्रह्मानंद म्हणतात, तो यापेक्षां वेगळा असूंच शकत नाहीं, याबद्दल माझी खात्री आहे.

आज मी बायकोबद्दल खरं बोलणार असलों, तरी त्याच्या आधींची खरी गोष्ट सांगायची, म्हणजे बायको या चीजेबद्दल लग्नाच्या आधीं माझी भलतीच कल्पना होती हें सांगितल्याशिवाय मी पुढं जाऊं शकत नाहीं. ही चीज गळीं उतरायला इतकी अवघड असेल असं मात्र वाटलं नव्हतं. एका पुरुषाला सुधारून त्याचा उद्धार करण्यासाठींच आपला अवतार आहे अशी तिची कां व कशी समजूत झाली हें मी सांगूं शकत नाहीं. परंतु नवऱ्याची सुधारणा करूं पाहण्याऱ्या आर्य स्त्रियांमध्यें तिचा नंबर बराच वरचा लागेल. तिच्या आयुष्यांत वरचा नंबर फक्त एवढ्याच बाबतींत आहे! अंतरपाठ दूर झाल्यापासून ती ह्या एकाच ध्येयानं प्रेरित झाली आहे. आतां घरोघ दोनाचे चार पाट झाले, तरी तिच्या ध्येयांत फरक पडलेला नाहीं. मी पान खातो, तंबाखू खातो हें खरं आहे. पण 'पान खाल्लंच पाहिजे का?' 'नाहींच खाल्लं तर जीव जाईल कां?' या तिच्या प्रश्नांचीं उत्तरं मी देऊं शकत नाहीं. माझ्या लग्नाला आतां नाहीं म्हटलं तरी आठ वर्षे झालीं. पण हे प्रश्न तिनं विचारले कीं, मी पान गिळून गप्प बसतो. लोणाऱ्यानं आपल्या कपड्यांना कोळशाचा रंग लावला, म्हणून तक्रार करणं जितकं हास्यास्पद, तितकंच पान खाणाऱ्याच्या कपड्यांवर पानाचे चार दोन शिंतोडे उडाले, म्हणून त्याला दोष देणंहि हास्यास्पद आहे. पण हें माझ्या बायकोला कळत नाहीं आणि पटतहि नाहीं. माझ्या कपड्यावर पानाचा सुईच्या अग्राएवढा (महाभारतांतील सुईचं अग्र) डाग दिसला, तर जणुं काय माझ्या चारित्र्याला कलंक लागला आहे अशा आवेशानं ती माझा पाण(न)उतारा करते. माझ्या तोंडांतलं पान चघळून संपून जातं. पण तिच्या जिभेवरनं ती डाग हलत नाहीं. आजपर्यंत ती पान ह्या विषयावर जेवढी बोलली असेल, तेवढी आपल्या माहेराबद्दलहि बोलली नसेल! जिवाभावाच्या बायकांपेक्षां (हे शब्द तिचे आहेत. असलं बोलायचं मी मागंच सोडून दिलं आहे!) मी चंचीची अधिक काळजी घेती

असं तिचं म्हणणं आहे. त्यांत असत्य कांहींच नाहीं. मला चंचीची अधिक काळजी घ्यावीच लागते. कारण ती बंचांत जाण्याची भीति असते. बायकोबद्दल तशी भीति वाटत नाहीं! मला असा एकहि दिवस आठवत नाहीं, कीं ज्या दिवशीं ती पानावर बोलली नाहीं. अंगणांत पानाचा डाग दिसला कीं, तिच्या शब्दांच्या आडकित्यांत माझा भुगा होऊं लागतो. मोरींत पान खाऊन चूळ टाकली कीं, फुटलेल्या नळासारखी शब्दांची धार लागते. पान खातांना देठ खुडून जमिनीवर टाकलेले दिसले कीं, पानाच्या शिरा काढतात तशी माझीं सालं काढायला सुरुवात होते. भरल्या पानावर बसल्यावर सुद्धां पानाबद्दल ऐकून घ्यावं लागतं! रोज सकाळीं केर काढायला सुरुवात झाली कीं, मी घरांतून बाहेर जातो. कारण त्या केरांत पानांचे देठ, सुपारीचे बारिक तुकडे, लवंगांचीं भुसभुशीत डोकीं आणि तंबाखूच्या काड्या यांचें प्रमाण जास्त असतें; आणि मग केर संपला तरी शब्द मागं राहतात.

लग्न झाल्यावर बायकोनं गोड गोड बोलावं अशी कांहींतरी गाढवासारखी त्यावेळीं कल्पना असते. कारण तोपर्यंत गुळाची चव माहीत नसते. उगाच बायकोशीं बोलण्याची उत्सुकता असते. तिनं खूप खूप बोलावं—मग तें आचरटपणाचं असलं तरी हरकत नाहीं—असं वाटत असत. (अर्थात् आतां तिनं खूप खूप गप्प रहावं असं वाटतं ही गोष्ट वेगळी!)—अशा त्या रोमांचकारी क्षणांत माझी बायको कोणते अमृतमय शब्द बोलली असेल? 'पान थुंकून या अगोदर' हे बायकोचे पहिले शब्द! या शब्दांनीं सुरू झालेला माझा संसार कसा रंगला असेल हें सुज्ञांस सांगणें नलगे!

मी गबाळा व अजागळ आहे आणि नीटनेटकेपणाची मला संवय नाहीं अशीहि तिची ठाम समजूत आहे. त्यामुळं मी बाहेर जायला निघालों कीं, टांकसाळींतला कामगार जसा पहारेकऱ्यापुढं तपासणीसाठीं उभा रहात असेल, तसें मला तिच्यापुढं उभं रहावं लागतं. तिनं कपडे पास केले, तरच मला घराबाहेर पडतां येतं. तिच्याबरोबर बाहेर पडायचं म्हणजे तर मला नोकरीच्या इंटरव्ह्यूला निघाल्याचा भास होतो. माझ्या कपड्यांची नाडी तिच्याच हातांत आहे!

शिवाय तिच्याबरोबर बाहेर जाणं हीहि माझ्या संसारसोपानाची एक अवघड पायरी आहे. रस्त्यानं जातांना सारख्या सूचना—'जरा ताठ चाला', 'दुकानाच्या पाट्या काय वाचतां?', 'फूटपाथवरनं नाहीं चालतां येत?' मी तर हैराण होऊन जातो. 'ती अंजिरी रंगाची साडी त्या बाईला मुळींच शोभत नाहीं', 'घोट्याच्या वर साडी नेसलेली मला मुळींच आवडत नाहीं', 'इश्श! नऊ वारी नेसून लिपा लावायच्या नाहींत म्हणजे काय?' ही रनिंग कॉमेण्टरी मला घरीं येईपर्यंत ऐकावी लागते. मी हुं हुं म्हणत असतो. मला अंजिरी साडी दिसलेली नसते, घोटा दिसलेला नसतो किंवा कुणाच्या कर्दळीसारख्या पिंड्याहि दिसलेल्या नसतात. फक्त कांहीं चेहेरे तेवढे माझ्या लक्षांत असतात. पण मी बोलत नाहीं. ती वेळ मौनाची असते!

संसारांत पैसा कमी पडला तरी जेवढी कुचंबणा होत नसेल, तेवढी बायकोची उंची कमी पडली तर होते, ही गोष्ट माझ्यासारखी फार थोड्या लोकांच्या लक्षांत आली असेल. माझी बायको बुटकी आहे. प्रसंगीं मी तिला हरबऱ्याच्या झाडावर चढवतो, प्रसंगीं ती डोक्यावर चढून बसते. पण तरीहि तिची शारीरक उंची वाढूं शकत नाहीं. कुठल्याही घराचीं दारं चार फुटांपेक्षां उंच असूं नयेत आणि खिडक्या तीन फुटांपेक्षां वर असूं नयेत असं माझं मत झालेलं आहे. सगळ्या दारांच्या कड्या व खिडक्यांच्या खिट्या वर असल्यामुळं घराच्या दारां-खिडक्यांशीं मलाच झगडावं लागतं. दुर्दैव असं कीं मी ज्या घरांत राहतो, त्या घराला भिंतीपेक्षां दारं-खिडक्याच जास्त आहेत. त्यामुळं रोज रात्रीं सगळीं दारं-खिडक्या बंद करतांना 'हा नको नको संसार' या ओळीशिवाय दुसरी ओळच सुचत नाहीं. त्या दारं-खिडक्यांतून येणाऱ्या प्रकाशानें व हवेनें माझी तब्येत सुधारली आहे कीं, त्या बंद करण्याच्या श्रमानं ती खालावली आहे हें सांगणं कठीण आहे.

पोटमाळ्यावरचे आणि कळ्यांवरचे डबे रोज चढवून आणि उतरवून मला एवढा आत्मविश्वास आला आहे कीं एकादं जहाज भरण्याचं व उतरविण्याचं काम मी एकटा सहज करूं शकेन! वास्तविक डबे, पुरण्या त्या वस्तू वर ठेवण्याच्या नव्हेतच. आणि जरी ठेवल्या तरी रोज सकाळीं एकदा काढल्यावर संध्याकाळीं पुनः वर ठेवल्या कीं काम होतं. पण तसं चालत नाहीं. मी नेमका एकच डबा खालीं काढला पाहिजे. कुठल्या डब्यांत काय आहे हें मला माहीत नसतं. त्यांच्या ठरलेल्या जागा माझ्या लक्षांत रहात नाहींत. त्यामुळं एका डब्यासाठीं मला किमान सहा डबे खालीं काढून वर ठेवावे लागतात आणि लोक मला बेधडक विचारतात, "तुमचा सकाळचा वेळ कसा जातो?" कांदे बटाट्यासारख्या निरुपद्रवी वस्तूसुद्धां उंचावर टांगून ठेवण्यांत मला त्रास देण्याखेरीज दुसरा कांहीं उद्देश असेल असं मला वाटत नाहीं. माझ्या संसारांत चढउतार जास्त आहेत ते असे!

त्यांत दर रविवारीं घर साफ करण्याचा जुलमी कार्यक्रम असतो. भिंतींच्या वरच्या कोपऱ्यांतील कोळी समाजाची वस्ती उठविणें, चिमण्यांनीं घरटीं बांधण्याचा केलेला खटाटोप हाणून पाडणें, पालींना घराबाहेर हुसकणें हीं

सगळीं ‘ उंचीं ’ कामं मलाच करावीं लागतात. त्यामुळं त्या बिचाऱ्या मुक्या प्राण्यांची अशी कल्पना झाली आहे कीं, आमच्या सबंध घरांत मीच एकटा नीच आणि दुष्ट मनुष्य आहे. या जन्मांत तरी माझी बाजू त्यांना कळणार नाहीं, याचं वाईट वाटतं.

तुम्ही कल्पना करा. बऱ्याच दिवसांनीं घरांत जुनी मित्रमंडळी जमली आहेत. गप्पा आणि पान रंगत चाललं आहे. तेवढ्यांत खिळीवरनं निरोप येतो—‘ तेवढी टरणी काढून पाहिजे ’— असं वाटतं कीं घरांतल्या सगळ्या वरण्या वरून खालीं ढकलून द्याव्या. तरी मी घरांतली कुठ-लीहि वस्तू चार फुटांपेक्षां अधिक उंच जाऊं नये अशी खबरदारी घेतच असतो. बाय-कोच्या बुटकेपणामुळंच माझ्या संसाराची उंची निदान एक फुटानं तरी खालीं आली आहे. बऱ्याच वेळां मी बोललेले बायकोच्या डोक्यावरनं जातं याचं कारणही हेंच आहे !

ती हरिणाक्षी नसली तरी हरिणाच्या जवळ-पास पोंचूं शकेल. तिचे डोळे चांगले आहेत असं मलाही कांहीं गाफील क्षणीं वाटतं. पण ते स्वाभाविक अवस्थेंत फार थोडा वेळ असतात. सबंध रात्र आणि दिवसाचे चार सहा तास ते मिटलेले असतात आणि उरलेल्या वेळांत एकतर वटारलेले असतात किंवा पाणावलेले असतात. चांगल्या डोळ्यांचा उपयोग चांगल्या गोष्टी पाहण्याकडे करावा हें सांगूनसुद्धां तिला पटत नाहीं. तिचे डोळे पहाण्याचं काम न करतां पहाऱ्याचं काम करतात. एक डोळा नेहमीं माझ्यावर पहारा करतो आणि दुसरा डोळा मुलींच्यावर ( आमच्याच ) पहारा करतो. माझ्या पहाऱ्यावर असलेला डोळा तीक्ष्ण आहे. माझी कुठलीही गोष्ट त्या डोळ्यांतून सुटत नाहीं. रस्त्यानं चालतांना सुद्धां एक डोळा आपल्या पहाऱ्यावर आहे हें मी विसरूं शकत नाहीं. रस्त्यावरच्या इतर डोळ्यांची नसली तरी त्या डोळ्याची कणखर भाषा माझ्या डोळ्यांना चटकन समजते व ते स्वतःला सांवरून चालतात. तथापि मला घरीं यायला जेव्हां खूप उशीर होतो, तेव्हां माझ्या वाटेकडे लागलेले डोळे अत्यंत स्वाभाविक असतात, अतिशय सौम्य असतात. परंतु अंधारांत ते मी पाहूं शकत नाहीं आणि पाहतो तेव्हां माझ्या उशीरां येण्यामुळं त्यांचं रूप बदललेलं असतं.

तिच्या डोळ्यांप्रमाणें नाकही तीक्ष्ण आहे. गुणांनीं आणि आकारानं आणि म्हणूनच ती त्याचा कांदे सोलण्याकडेच अधिक उपयोग करीत असावी. माझ्या कानांच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनं तिच्या कानांबद्दल न बोललेलंच बरं. तिच्या जिभेची रुची वेगळी आहे. अन्नाची आणि शब्दांची ! तिच्या जिभेवर बसलेल्या कांहीं शब्दांच्या अर्थापर्यंत मी पोंचूं शकत नाहीं. इतकीं वर्षे तिच्या सहवासांत राहूनही मी अजून ‘ डोम्बल ’ या शब्दाचा अर्थ सांगूं शकत नाहीं. ती रागावली असतांना ‘ काय झालं ? ’ म्हणून विचारलं, तर त्याचं उत्तर मिळतं, ‘ झालंय डोम्बल ! ’ एकादा पदार्थ जास्त करायला सांगितला, तर लगेच सवाल येतो, ‘ कुणाच्या डोम्बलावर नेऊन घाला-यचंय इतकं ? ’ आपल्याजवळ याला जवाब नाहीं. कारण ‘ डोम्बल ’ म्हणजे नक्की काय तें कधींच कळत नाहीं. ‘ डोम्बल ’ जसं माझ्या डोक्यावरून जातं, तसंच ‘ मेलं ’ही ! ‘ मेलं ताक लौकर होत नसतं ’, मेलं पाणी कधीं वेळेवर येत नसतं ’ तर कधीं ‘ मेला दांत काढून हंसत असतो. ’ यांतलं काय मेलं आणि कोण मेला हें मला समजत नाहीं. कारण तिची भाषाशैलीच वेगळी आहे. मुली खेळायला गेल्या, तर ती ‘ कुठं कार्ट्यो तडफडायला गेल्या आहेत कुणास ठाऊक ’ असं म्हणते. घरांत थोडा केर झाला कीं, तिच्या हिशेबीं ‘ घराचा उकिरडा ’ होतो.

तिच्या भाषेप्रमाणेंच तिच्या कांहीं समजुतीही स्वतंत्र आहेत. घरांत मी आणि माझ्या दोन मुली केर करतात ही जशी तिची ठाम समजूत आहे, तशीच मी कुठलीही वस्तू आणतांना डोक्याचा वापर करीत नाहीं अशीही तिची खात्री आहे. वास्तविक दर महिन्याला वाण्याकडील सामान उरावरून आणतांना माझे काय हाल होतात, तें ओझं वाहणाऱ्या गाढवालाच माहीत ! माझ्या आयुष्यांत वाणसामान आणण्याइतकी मोठी शिक्षा दुसरी कोणतीच नाहीं. वाण-सामानाची यादी विधानसभेंतील बिलासारखी तीनवेळां वाचन होऊन पास व्हावी लागते. दर खेपेला त्यांत दुरुस्त्या होतात. इतकं होऊनही पुन्हां आठदहा जिनसा तींत घालायच्या राहि-लेल्याच असतात आणि प्रत्येक जिनसेसाठीं एक याप्रमाणें मला हेलपाटे घालावे लागतात. हें प्रकरण एवढ्यावर संपत नाहीं. वाण्याकडून आण-लेले सर्व पुडे उघडून होईपर्यंत मी रामरक्षा म्हणत असतो. कारण प्रत्येक पुड्यागणिक माझ्या अजा-गळपणाची कमान चढत असल्याचा भास ती निर्माण करते. पण एकादवेळीं तिनं आणलेल्या वस्तू जेव्हां खराब निघतात, तेव्हां मात्र व्यापारी-वर्गाची नैतिक पातळी खालीं गेलेली असते !

काटकसर हा आणखी एक गंड ! ती स्वतःला अत्यंत काटकसरी म्हणविते. त्याला आधार कुणीतरी गाफीलपणानं लिहिलेलं वाक्य : ‘ स्त्रिया जात्याच काटकसरी असतात. ’ काटकसर करून लोक घरं बांधतात अशी तिची समजूत आहे. तिला असं सांगून कुणी बनवलं हें मला माहीत नाहीं. पण ती हरतालिकेच्या श्रद्धेनं काटकसर करण्याचा आव आणते एवढं मात्र खरं ! तिनं पोस्टांत दोन रुपयांचं स्वतःच्या नांवाचं खातं उघडलं आहे. पण या दोन रुपयांच्या खात्यानं तिला दोन हजार रुपयांचं समाधान मिळवून दिलं आहे. त्यामुळं साहजिकच उधळ्या मी आणि काटकसरी ती अशी विभागणी झाली आहे !

ती कलेच्या प्रांतांतही पाऊल टाकून आली आहे. त्याचा पुरावा म्हणजे माझ्या घरांत फ्रेममध्यें असलेलं पिवळ्या रेशमानं भरलेलं बदक. त्याशिवाय गुलाबी अंगरखा घातलेलं एक बाळ आणि व्हेल्वेटवर वेलबुट्टींत जिगानं भरलेलं ‘ सुस्वागतं ’ आहे. हिला दाखवायचा कार्यक्रम झाला, त्यावेळीं हें भरतकामही मला दाखवण्यांत आलं होतं. तें स्त्रीधन म्हणून तिच्याबरोबर माझ्या घरीं नांदायला आलं. पण लग्न झाल्यापासून मात्र तिच्या भरतकलेंत सुधारणा झाली. तिनं एकही भरतकाम केलं नाहीं ! लोकरीचं विणकाम आणि गाणं हेहि दाख-विण्याच्या वेळीं मला सांगितले गेलेले तिचे छंद. आतां विणकाम गेलं; फक्त लोकर राहिली आहे आणि ती मुली केस बांधायला आगवळ म्हणून उपयोगांत आणतात ! अजूनही तिला मधून मधून मोठ्यानं गाणं म्हटल्याशिवाय चैन पडत नाहीं आणि ती मोठ्यानं म्हणायला लागली कीं मला चैन पडत नाहीं ! तिचं ऐकून मुलीही गाणं म्हणतात आणि कित्येकदां तिघींचं समूहगीत सुरू झालं कीं माझ्या संसाराचं कला-पथक होऊन जातं.

माझा घातवार म्हणजे ऋषिपंचमी ! पंचमीच्या आधीं आठ दिवसापासून माझे हाल सुरू होतात. ‘ ऋषीचं सामान मिळवायला लागा. आयत्या वेळीं कांहीं मिळायचं नाहीं ’ या वाक्यानं माझं ऋषिपंचमी-श्रमदान सुरू होतं. मी मग रोज एकेका शेजाऱ्याच्या बागेंत नजर टाकून कुणाकडे भोपळा आहे, कुणाकडे काकडी आहे, कुणाच्या बागेंत टमाटो लागले आहेत याचा अंदाज घेतो. मग एक यादी तयार करतो. प्रत्येकाला घरीं आणून चहा पाजतो, पान खायला घालतो आणि भोपळा, काकडी, वगैरे भाज्या रिझर्व करतो. कारण ऋषिपंचमीला जास्तींत जास्त भाज्या करण्याचा बायकोचा नवस असतो. या सर्व वस्तू ऋषिपंचमीच्या आदल्या दिवशीं घरांत आणून ठेवाव्या लागतात.


मीहन्माईट मेटल डिव्हिजन ऑफ कूपर इन्जिनिअरींग लि.
धी अॅक्मे मॅन्युफॅक्चरींग कंपनी लि.
वालचंदनगर इंडस्ट्रीज लि.
धी रावळगांव शुगर फार्म लि.
दिपावली शुभचिंतन...
दुरिताचे तिमिर जावो ।
विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो ।
प्राणि जात ॥
या नूतन संवत्सरी, सर्व भारती-
यांस, सुख, समाधान आणि
समृद्धीचा लाभ होवो.
वालचंद समूह-उद्योगधंदे
देशाच्या प्रगतींत आपलें
कर्तव्य बजावीत आहेत.
धी हिंदुस्थान कन्स्ट्रक्शन कंपनी लि.
धी इन्डियन ह्यूम पाईप कंपनी लि.
वालचंद उद्योग समूह
कन्स्ट्रक्शन हाऊस, विटेट रोड,
बॅलार्ड इस्टेट, मुंबई - १
धी प्रिमिअर ऑटोमोबिल्स लि.
कूपर इन्जिनीअरींग लि.
धी प्रिमिअर कन्स्ट्रक्शन कंपनी लि.

एवढ्या श्रमावर ऋषिपंचमी होत नाहीं. कुठल्या तरी भार्गीरथीबाई हिला घेऊन सांगतात कीं, फलाण्याच्या दुकानांत ऋषींचे तांदूळ, मीठ व मिरची अस्सल मिळते. तें दुकान नेमकं साडेतीन मैल लांब असतं. सबंध वर्षात मला संन्यास घ्यावा असं तीव्रतेनं वाटतं तें ह्या आठ दिवसांत! बैलांच्या श्रमाच्या नसतील अशा वस्तू गोळा करण्यासाठीं मला मात्र रेड्यासारखे श्रम करावे लागतात.

कांहीं बायका रागावल्या कीं अधिक सुंदर दिसतात. कांहीं एकदम अबोल होतात. पण माझी बायको रागावली कीं अधिक क्रियाशील होते. तिच्या रागाला चटकन् नादमय रूप येतं. हें रूप लांबूनही श्रवणेंद्रियाच्या सहाय्यानें समजूं शकतं. संसार सुरू झाल्यापासून ती किती वेळा आणि किती प्रमाणांत रागावली, हें आमच्या घरांतील भांड्यांचीं बुडं पाहून कुणालाही सांगतां येईल. दोन्हीं मुलींना कळायला लागल्यापासून मात्र रागाची अभिव्यक्ति त्यांच्या पाठीवर होते. फायदा एवढाच कीं आतां भांडीं शाबूत राहतात! तसा मी बायकोला एरवीं भीत नाहीं. पण ती अशी रागावलेली असली म्हणजे चार हात दूर राहाणं मला सोयीचं वाटतं.

आमच्या घरांत माझें स्थान काय आहे हें मी चटकन् सांगूं शकणार नाहीं. पण माझ्या संसारांत बोहारणीला फार महत्त्वाचं स्थान आहे हें मी बेधडक सांगूं शकतो. इतकंच काय माझ्या घरांत तिच्या नांवाची ट्रंक आहे. बोहारणीची ट्रंक म्हणून ती प्रसिद्ध आहे. ह्या ट्रंकेला कुणीही हात लावायचा नाहीं अशी सक्त ताकीद आहे. दागिन्याच्या ट्रंकेपेक्षां बोहारणीच्या ट्रंकेची काळजी अधिक घेतली जाते. घरांत नवा कपडा आल्याबरोबर त्याची भाडयांत मोड करून कोष्टक मांडून ठेवलं जातं. माझीं कोष्टकं शाळेपासून कच्चीं असल्यामुळं हें कोष्टकही माझ्या लक्षांत रहात नाहीं. ती या बाबतींत इतकी तरबेज आहे कीं, आळींत बोहारणीशीं सौदा करायला आणि भांडायला तिला सतत आमंत्रणं येत असतात. पुण्याच्या विद्वानालादेखील अध्यक्ष-पदासाठीं इतकीं आमंत्रणं येत नसतील. तिला कपड्यांतून भांडीं दिसतात. तिच्या हिशेबानं मी रोज बाहेर जातांना एक उभा डबा आणि एक दांड्याची पातेली घालून जातो. ज्या दिवशीं अंगावर कोट असेल, त्या दिवशीं लोणच्याच्या बरणीची भर पडते. पातळावर गंज, शर्टावर सट, पॅण्टवर ओघराळें ही भाषा इतकी कानवळणीं पडली आहे कीं, कुणी शर्टावर ढेकूण म्हटलं कीं मी बावरून जातो. कानाला कससंच लागतं?

बोहारणीच्या ट्रंकेमुळं मला माझ्या कपड्यांना फार जपावं लागतं. कपडा फाटला आहे असं मोठ्यानं म्हणण्याची सोय नसते. माझे कपडे आगीलाही भीत नाहींत; पण बोहारणीच्या ट्रंकेला फार भितात. माणूस मरणाला भितो तसे. कारण बोहारणीची ट्रंक हें त्यांचं अन्त्य विश्रांति-स्थान आहे!

तिसऱ्या गल्लींतील बोहारणीचा आवाज तिला स्वयंपाकघरांतही कसा ऐकूं जातो हें मला न उलगडलेलं रहस्य आहे. बोहारीण आली कीं, आमच्या घरांतलं वातावरण एकदम आनंदी होतं. ती खुदकन स्वतःशीं हंसते आणि हंसतां हंसतां घरांतील कपड्यांवर शोधक नजर फिरवते. मी अंगावरचे कपडे सांवरून बसतो. हळदी-कुंकवाला आलेल्या सवाष्णीसारिखं बोहार-णीचं स्वागत होतं; आणि मग जिवाभावाच्या मैत्रिणींचीं खलबतं चालावींत, तसा दोन तास सौदा चालतो. दोन साड्या व एक शर्ट (त्या शर्टावर माझं फार प्रेम असतं!) यावर एक पेंचाची पितळी बरणी व एक सट देण्याची मागणी करून बायको डावाला सुरुवात करते. एवढ्या कपड्यांवर एक तपेली आणि एक वाटी देऊं करून बोहारीण बायकोला शह देऊं पाहते. कपड्यांच्या आणि भांड्यांच्या इतक्या बेरजा आणि वजावाक्या होतात कीं, शेवटीं काय देऊन काय घेतलं हें मला कळतच नाहीं. पेंचाची पितळी बरणी हवी असतांना बायको शेवटीं एक पातेलं आणि गंज कां घेते हें मला समजत नाहीं. मी वेंधळ्यासारखा बघतच राहतो. बोहारीण गेल्यावर मला कळतं कीं, बायकोला पातेलं आणि गंजच घ्यायचा असतो; पण तें घेण्यासाठीं पेंचाच्या बरणीपासून सौदा सुरू करायचा असतो आणि वळणं घेत घेत शेवटीं पातेल्यावर यायचं असतं. हीं वळणं जशीं माझ्या आवाक्याबाहेरचीं आहेत, तसंच ह्या सौद्यांत फायदा झाला का तोटा झाला हें सांगणंही माझ्या बुद्धीपलीकडचं आहे. पण एवढं खरं कीं, बोहारणीला बनवल्याचं समा-धान बायकोला मिळतं आणि वामणिनींवर आपण मात केली या खुषींत बोहारीण परत जाते. पण बायकोचं समाधान शतपटीनं वाढतं, तें शेजारणी जमतात तेव्हां. 'दोन साड्यावर कां हें पातेलं घेतलंत तुम्ही? कमाल आहे बाई तुमची!' असं शेजारणीनं म्हटलं कीं बायकोचा जीव घेतलेल्या पातेल्याहूनही मोठा होतो.

या बोहारणी इतके कपडे गोळा करून त्यांचं काय करतात हें जसं मला माहींत नाहीं, तसंच कपड्यांवर भांडीं घेण्यांत बायको काय मिळविते हेंहि मला कळत नाहीं. पण यामुळं घरांतील भांड्यांची संख्या इतकी वाढली आहे कीं, मी संसाराच्या आणखी दोन शाखा काढल्या तरी पुरून उरतील! बायको जग विसरेल, पण भांडीं विसरणार नाहीं. लहान तोंडाचा टोप, बिनकां-ठाची पातेली, ठोक्याची तपेली, पोच्याचं तसराळं, निकल्हईची वाटी—असे तीनशें तरी प्रकार असतील आणि ते सगळे तिच्या बिनचूकपणें लक्षांत राहतात. इथं माझा माथा न कळत नमतो!

इतक्या यातना मी सहन करतो, त्या केवळ अन्नासाठीं. मी जशी पोटासाठीं नोकरी करतो, तसाच पोटासाठीं संसारही करतो. मी तिचं पाणिग्रहण केलं असलं, तरीसुद्धां स्वयंपाकांत मात्र तिचा हात धरूं शकत नाहीं. तिच्या हातचा स्वयंपाक हाच तिच्या माझ्यांतील महत्त्वाचा दुवा आहे. तिच्यांतील हा आणखी एक रुचकर भाग. केवळ एवढ्या एकाच कारणासाठीं मला संन्यास घ्यावासा वाटत नाहीं. तिच्या स्वयंपाकासाठीं तिला दोन खून (माझा सोडून) माफ आहेत. तिच्या हातचं जेवण पोटांत जाऊन मी तृप्त झालों, म्हणजे तिच्यासारखी देवता नाहीं असं क्षण दोन क्षण नकळत वाटून जातं आणि जन्मोजन्मीं हीच किंवा थोडी सुधारलेली पण अशीच रुचकर बायको मिळावी असं जेवणा-नंतरच्या गुंगींत वाटल्याशिवाय रहात नाहीं. कारण चूल मांडल्यापासून कायम राहिलेला असा हाच एक गुण आहे. बाकीचे गुण तिच्या भाषेत 'चुलींत' गेले आहेत.

आतां यापेक्षां मी अधिक कांहीं लिहिण्याचं धाडस केलं, तर माझं अन्न तुटण्याची भीति आहे आणि तें परवडणार नाहीं. तिच्या इतरही कांहीं लोभस गुणांबद्दल लिहिण्याची माझी इच्छा आहे. पण असं वाटतं कीं ते गुण 'उजेडां'त न आणलेलेच बरे!

● ● ●





# रात्रंदिन आम्हां, युद्धाचा प्रसंग !

—बाळ गंगाधर सामंत

बायको या विषयावर मनमोकळेपणानें लिहिणं हें जरा दगदगीच खटलं आहे 'अनिवर्णनीयं परकलत्रम्' असं बिचारा कालिदास सांगून चुकला असला, तरी आजच्या जमान्यांत दुसऱ्याच्या तर राहूं द्याच, पण स्वतःच्या बायकोचं वर्णन करणं ही अवघड आणि नाजुक बाब आहे. कारण आपला नवरा जरी प्रत्यक्ष ब्रह्मदेव असला, तरी त्याला काडीइतकी अक्कल नाहीं असें माझ्या बायकोचें स्पष्ट आणि प्रामाणिक मत आहे. हायकोर्टांत फाडफाड बोलणारा बालिष्टर हा आपल्या बायकोसमोर माफीचा साक्षीदार होतो. कोर्टांत निदान दोन्ही पक्षांच्या बाजू विस्तारानें मांडल्या जातात. पण इथं तेंहि नाहीं. चोवीस तास फक्त विरुद्ध पक्षाची बाजूच मोठ्या हिरिरीनें मांडली जाते.

'यांना कांहींच कसं कळत नाहीं' अशी नांदी झाली कीं खुशाल समजावं—हाणामारीच्या नाटकाचा पहिला सीन होणार आहे! अशा अटीतटीच्या वेळीं मी धूतपापेश्वराच्या सूचीपासून तों सेंट्रल रेल्वेच्या जाडजूड टाईमटेबलापर्यंत जो मिळेल तो थोर ग्रंथ हातीं धरतों. पण मंडळी चवताळलेली असल्यामुळें तो मान्यवर ग्रंथ खिडकीबाहेर भिरकावला जातो आणि मी अक्षरशः निःशस्त्र होतों. आमच्या सौभाग्यवतीला महात्माजींबद्दल आदर वाटत असला, तरी तिचा अहिंसेवर फारसा विश्वास नसल्यामुळं माझ्या निःशस्त्र प्रतिकाराच्या सर्व वल्गना व्यर्थ ठरतात.

अशा संकटसमयीं आपला एखादा रिकामटेकडा मित्र दत्त म्हणून समोर उभा राहावा किंवा शेजारच्या वागळीणबाई किंवा गोखलीणबाई चार कोथिंबिरीच्या काड्या अगर मासिकाचा अंक पळविण्याच्या निमित्तानें त्या ठिकाणीं अवतीर्ण व्हाव्या अशी मी देवी जगदंबेची प्रार्थना करतों. पण उपासतापासाच्या बाबतींत मी जरा ढिला असल्यामुळें आणि आमची बायको कडक देवभक्त असल्यामुळें देवी जगदंबा माझ्या नवसाला पावत नाहीं.

पैसा हा आमच्या संसारांत भांडणं निर्माण करणारा कलिपुरुष आहे. माझ्या बायकोचं स्पष्ट आणि प्रामाणिक मत असं कीं, आपल्या नवऱ्याला पैसे मिळवायची मुळींच अक्कल नाहीं, आणि मिळाले तर सांठवून ठेवण्याचा शहाणपणाहि नाहीं. या उनाड माणसानें आपल्या बरोबर लग्न केलं नसतं, तर हा खात्रीनें भुकेकंगाल होऊन रस्तोरस्तीं वणवण करीत हिंडला असता. आपला नवरा आणि पैसा या विषयावरचं तिचं व्याख्यान ऐकण्यासारखं असतं. मॅट्रिकची परीक्षा ती जेमतेम पास झाली असली, तरी महाराष्ट्रभाषेवर तिचं असामान्य प्रभुत्व आहे. तिची वाणी स्वच्छ, उच्चार स्पष्ट आणि वक्तृत्वांत आवेश आहे. या वक्तृत्वाला हातवारे आणि इतर अभिनय यांची सुरेख झालर आहे. अशा वक्तृत्वाची अखेरी मुसमुसण्यांत होत असली, तरी त्याची गंमत न्यारीच. आपल्या नवऱ्याच्या हातून पैसा सांठविला जाणं निदान या जन्मांत तरी शक्य नाहीं अशी तिची बालंबाल खात्री झाली आहे. या गृहस्थाचा स्वभाव भयानक खर्चिक आणि तशांत व्यसनग्रस्त त्यामुळें त्याच्या उद्धाराची कांहीं आशा नाहीं. याचं मुख्य व्यसन म्हणजे चहा आणि सिगारेट. माझ्या तोंडांत सिगारेट जळूं लागली कीं इकडे बायकोचा अक्षरशः जळफळाट होतो. ही 'जळ्ळी मेली सिगारेट' म्हणजे आपल्या संसारावरचा निखारा आहे अशी तिची मनोमन भावना आहे. सकाळीं चहा पिण्यापेक्षां प्रातःकाळीं उठून कडुलिंबाचा रस, काडेचिराइताचा काढा किंवा धण्याचं पाणी या नानाविध पेयांपैकीं कोणतंहि पेय अवश्य प्राशन करावं; नवऱ्याचं डोकं वाजवीपेक्षां जरा जास्त गरम असल्यामुळें त्यानें रात्रीं झोपण्यापूर्वी वाटीभर खोबरेल डोकीला थापावं आणि सकाळीं ऑफिसांत जातांना तोंडांत अधूनमधून चघळायला आलेपाकच्या वड्याहि खिशांत ठेवाव्यात अशी तिची इच्छा असते. दर शनिवार रविवार हा उनाड माणूस रमी किंवा ब्रिजमध्ये पैसे घालवतो ही कल्पना तिला बिलकूल नापसंत आहे. पत्ते खेळण्याच्या नादाबरोबर मधूनमधून पुस्तकं विकत घेण्याची आपल्या नवऱ्याला जी दुष्ट संवय लागली आहे याचा माझ्या बायकोला फार खेद होतो. 'या मेल्या पुस्तकांपायीं जीव विटला' हा मंत्र मला रोज सकाळ-संध्याकाळ ऐकावा लागतो. माझ्या ग्रंथसंग्रहांतील पाऊणशें टक्के ग्रंथ निकालांत कसे काढावेत याचे नवे नवे प्लॅन्स ती माझ्यासमोर ठेवते. प्लेगच्या उंदरासारखे पुस्तकहि चिमटींत धरणं, माहेरच्या माणसांना श्रेष्ठ ग्रंथराज उशीं म्हणून वापरायला देणं इत्यादि अनुचित आणि अश्लाघ्य प्रकार माझ्यासमोर करून ती आपला ग्रांथिक संताप व्यक्त करते. या पुस्तकांच्या संग्रहाच्या विटा जरी जमवल्या असत्या, तरी त्याचा एक बंगला बांधतां आला असता असें तिचं स्टॅटिस्टिकल मत आहे.

हें व्यवहारज्ञान यांच्याकडे थोडं तरी असतं तरी आजच्यासारखे आपल्या संसाराचे तीनतेरा वाजले नसते. यांच्या अव्यवहारीपणाचा मुख्य विशेष म्हणजे वाटेल त्या माणसावर चटकन विश्वास ठेवणें. 'आतां मी इतकीं वर्षं मर मर मरतेंय पण विश्वास मात्र भलत्या माणसावर' याचं तिला अंतःकरणपूर्वक वाईट वाटतं. विशेषेंकरून मित्र म्हणवून घेणारे जे कोणी प्राणी घरीं येतात, या प्राण्यांवर तिचा फार दांत आहे. हे प्राणी गतजन्मीं चोर लुटारू किंवा दरोडेखोर असले पाहिजेत असा तिचा खास तर्क आहे. कारण त्यांतला एखादा उपटसुंभ घरीं उपटला कीं 'मेला चहा उकळल्याशिवाय हलायचाच नाहीं' अशी तिची खात्री असते. यांतल्या कांहीं भंपक लोकांना जेवणखाण झाल्यावर घरीं येऊन गप्पा मारायची वाईट खोड असते. या भंपक किंवा फडतूस मंडळींत माझी बायको माझ्या साहित्यिक मित्रांची गणना करते. आपल्या नवऱ्यानें महान साहित्यिक होण्याचा नाद सोडून घरांतले हिशेब नीट



अनुक्रमणिका

ठेवायला शिकावं असा ती धडा देते. कॅलेंडरवर दूधवाल्याचे किती खाडे झाले, मोलकरीण तीन दिवस आली नाहीं तर तिचे किती पैसे कापायचे, या कौटुंबिक साहित्यांत त्यानें लक्ष टाकावें आणि समाजहितापेक्षां घराचें हित साधावें अशी तिची रोज कटकट असते. पण संसारांत लक्ष असेल तर शपथ !

वास्तविक पाहतां मी अष्टौप्रहर संसारांत गुरफटलों असतांना माझं संसारांत लक्ष नाहीं हा नाहक खोटा आरोप. पण मीच काय, माझ्या द्वाड मित्रांचींहि संसारांत लक्ष नाहीं असा तिचा आरोप आहे. एकदां ही मंडळी घराबाहेर पडली कीं घरीं नीट परतण्याची आशा नाहीं—केव्हां येतील तो सुदिन—असा तिचा उघड उघड दावा आहे. या मंडळींना आठवण ती कसली मेली नाहींच—याच तिला राहून राहून नवल वाटतं. असा विसरभोळा अक्कलशून्य माणूस एम्. ए. पर्यंत शिकतो आणि पास होतो याचा अर्थ मुंबई विद्यापीठांतहि मुंदडासारखी कांहीं तरी गफलत असावी असा तिला दाट संशय येतो. उदाहरणार्थ, ऑफिसांतून परत येतांना दोन वार रिबन घेऊन या असं ती मला फर्मावते. मी जिना उतरतों न उतरतों ताच दुसरा निरोप येतो कीं, दरबार गंधाची एक बाटलीहि आणा. दोन वार रिबन–दरबार गंध या अलौकिक वस्तूंशीं आणि त्याचा सौदा करणाऱ्या "स्त्रैण पुरुषाशीं" आपला कधींच संबंध आलेला नसल्यामुळें तो सत्पुरुष आपल्याला हातोहात बनवतो. दोनाऐवजीं सहा वार रिबन आणि दरबार गंधाऐवजीं शाही दरबार गंधाची बाटली तो माझ्या हवालीं करतो. आज आपण एक निर्दोष खरेदी केली या आत्यंतिक समाधानांत मी घरीं येतों.

पण घरीं आल्यावर 'फायरिंग' !

'फायरिंग' म्हणजे जबरदस्त 'फायरिंग!' अगदीं मशिनगनचा मारा.

"दोनच वार सांगितली असतां ही महागडी रिबन सहा वार कां आणलीत? एवढं कसं लक्षांत राहात नाहीं?" वगैरे वगैरे.

ह्या रिबनप्रकरणांतून मुक्त झाल्यावर दरबार गंध प्रकरणाचा फैसला. दरबारगंध सांगितलं असतांना 'शाही दरबार' कां आणलंत या प्रश्नाला जगांतल्या कोणत्या नवऱ्यापाशीं उत्तर आहे? अशा वेळीं तोंडांत मारल्यासारखा चेहरा करून स्वस्थ बसण्याखेरीज दुसरा उपाय कोणता? कारण कांहीं बोललं कीं आपल्या विसराळू स्वभावावर एक साग्रसंगीत कीर्तन. एखादी वस्तु हरवली कीं आमच्या बायकोचा जीव टांगल्याप्रमाणें होतो. या वस्तूच्या शोधापायीं घराला रणमैदानाचें स्वरूप प्राप्त होतें. गेल्या आठवड्यांत माझ्या बायकोच्या हातून एक नया पैसा हरवला. तो शोधण्यापायीं माझ्या दाढीचा आरसा फुटला, पार्कर पेनचे दोन तुकडे झाले. अलार्म क्लॉक खालीं पडलं आणि कपाटाच्या मागें तो पैसा पडला असेल या समजुतीनें आमच्या मंडळींनीं कपाटापाशीं जी झटापट केली, त्यांत तिच्या डोक्याला एक टेंगूळ आलं,

हातांत असलेल्या अर्धा डझन कांकणांचा चक्काचूर झाला व या सर्व नुकसानीपायीं झालेल्या खर्चाचें बिल १२५ रु. आलें (या बिलांत डोक्याचें टेंगूळ उतरविण्यासाठीं डॉक्टरनें दिलेल्या इंजेक्शनच्या बिलाचाहि समावेश आहे !) इतकं करूनहि तो द्वाड नया पैसा कांहीं गवसला नाहीं. तिच्या या स्वभावाच्या उलट माझा स्वभाव आहे. हरवणं हा माझी स्थायीभाव आहे. फौंटनपेन, रुमाल, छत्री, गॉगल आणि पैसे या वस्तू हरवण्यासाठींच असतात असा माझा समज आहे. या वस्तु हरविण्याचं प्रमाण कमी व्हावं म्हणून बायको म्हणते मी जानवं घालावं. जानव्यामुळं शुचित्व येईल आणि त्याला एक रुमाल अडकावतां येईल. जानव्याची कल्पना मी धिक्कारलेली पाहून तिनें चांदीच्या करगोट्याची कल्पना आतां विचारार्थ समोर ठेवली आहे.

आपल्या विसरभोळ्या नवऱ्याच्या लक्षांत कांहींच राहात नाहीं या दुर्गुणापेक्षां त्याचें संसारांत लक्ष नाहीं ह्या दुर्गुणावर मंडळींचा बराच कटाक्ष आहे. त्याचें संसारांत लक्ष नसल्याचा पुरावा म्हणजे आपलीं दोन बेशिस्त मुलें. मुलें अगदीं 'ह्यांच्या' वळणावर गेलीं आहेत, हा तिचा आवडता सिद्धांत आहे. त्यामुळें मुलांच्या अगोदर ती मला शिस्त लावण्याचा प्रयत्न करते. पहांटे उठण्यामुळें मन प्रसन्न रहातं आणि प्रकृति ठणठणीत होते हा आचरट नियम कुठल्यातरी पुस्तकांत वाचून आपल्या नवऱ्यानें रोज पहाटे पांचला उठावं असा तिचा आग्रह असतो. परंतु गेलीं तीस वर्षें (जन्मल्यापासून) मा सूर्यदर्शन कटाक्षानें टाळलेलें असूनहि माझी प्रकृति धडधाकट आहे. त्यामुळें अजूनहि तिच्या आग्रहाला मी दाद दिलेली नाहीं. असा बेशिस्त आदर्श समोर असतांना मुलं बिघडणार नाहींत तर काय? केव्हां केव्हां ती इरेस पेटून मला अभ्यासाला बसवते (मुलांच्या). पण अलिकडे या पोरांचे अभ्यास इतके कांहीं चमत्कारिक झालेत कीं मी आतां परीक्षेला बसलों तर मॅट्रिकच काय पण मराठी पहिलीच्या परीक्षेंत देखील पास होणं अशक्यच आहे.

पोरांच्या अभ्यासाच्या धांवपळीपेक्षां माझी अधिक धांवपळ आमच्या कौटुंबिक सहलीच्या प्रसंगीं होते. मला वाटतं, फिरायला जाण्याची हौस नाहीं अशी बाई शोधून सांपडायची नाहीं. बायकांनीं फिरायला जाण्याबाबत आमची कांहींच तक्रार नाहीं. त्यांनीं खुशाल आपल्या चार मैत्रिणींना घेऊन जग पालथं घालावं. पण तें नाहीं जमायचं. जाईन तर नवऱ्याबरोबरच असा आमच्या बायकोचा पणच आहे. संध्याकाळीं आपण नटून थटून, नवऱ्याला आणि मुलांना सजवून रस्तोरस्तीं चार एक तासांची भ्रमंति केली कीं तिला स्वर्गसुखाचा आनंद होतो. आज आमच्या लग्नाला तब्बल दहा वर्षें झालीं, पण फिरायला जात ना नवऱ्याला खेटून चालण्याची तिची वाईट संवय कांहीं जात नाहीं. आम् जनतेला जाहीर झालं पाहिजे कीं, हा बावळट माणूस केवळ आपलीच प्रॉपर्टी आहे, याच मागसाशीं आपण लग्न करून त्याला कायमचं उपकृत केलं आहे. पण रस्त्यावरून हिंडत असतांना तिचं लक्ष असतं माझ्यावर. अगदीं पहारा म्हणानात ! कारण मी वृत्तीनें सौंदर्योपासक असल्यामुळं रस्त्यांतील सुंदर सुंदर वस्तूंकडे टक लावून पहाण्याची मला संवयच आहे. अर्थात् माझी ही 'मेली जन्माची खोड' तिला पूर्णतया नापसंत असून नवऱ्यानें केवळ आपल्याकडेच चोवीस तास पाहात रहावं अगर दुकानावरच्या पाट्यांचं संशोधन करावं, अशी तिची ताकिद असते. फिरायला निघण्यापूर्वी आमच्या बायकोचा उद्देश फिरण्याचाच असतो आणि बाहेर पडतांना 'असू दे आपली हातांत' म्हणून पिशवी घेतली जाते. या चार तासांच्या रस्तेफेरींत डोकीच्या पिना, पॉडस् क्रीम, चहाचं गाळणं, सुया (या कशाकरितां याचा अजून पत्ता लागलेला नाहीं !) एवढेंच किरकोळी सामान सुरवातीला घेतले जातात. पण आजकाल मुंबईत कापडधंदा उर्जितावस्थेंत असल्यामुळें कापड-दुकानांची उणीव नाहीं. 'तुम्हांला बुशशर्टचं कापड घेऊ या' असा पुकारा करीत मंडळी एका नामवंत स्टोअर्समध्यें शिरते आणि आपल्यासाठीं एक पातळ, कल्पनेच्या फ्रॉकसाठीं सहा वार (हा म्हणे डान्सिंग फ्रॉक), एक 'बेडशीट' ही माझ्या दृष्टीनें ट्रॅजिक खरेदी व्हायचीच. यांत आपल्या धाकट्या बहिणीसाठीं ब्लाऊजचं कापड जमलं तर कल्याणच. या सगळ्या भानगडी मला पाठ असल्यामुळें मी फिरायला जाण्याचा विषय टाळतोंच.

'आता, फिरायला नाहीं तर मग, आईकडे जाऊन येऊं या' अशी उपसूचना प्रसंगीं मांडली जाते. मला वाटतं, माझ्या खालोखाल

*आमचें राज्य !.... आमचा राज्यकारभार !.... : १३ :*

**आंध्रांतली आपटी !**



किंवा माझ्यापेक्षां जास्त, आमच्या बायकोची आपल्या माहेरच्या माणसांवर माया आहे. अर्थात् यावर माझा कोणताच आक्षेप नाहीं. पण तिचा हट्ट असा कीं तिच्याप्रमाणं मीसुद्धां माहेरच्या माणसांवर प्रेम करावं. आजकाल या माहेरच्या माणसांनीं आमच्या घरांत नसता धुमाकूळ माजवलाय. आमच्या घरांत कोणतीहि गोष्ट त्यांच्या सल्ल्याशिवाय पार पडत नाहीं. आमचे वडिल शंकराचार्य असून, चार भाऊ बृहस्पती आणि तीन बहिणी गार्गी, मैत्रियी आणि कात्यायनी यांचा अवतार आहेत असं मला वारंवार बजावलं जातं. रविवारीं यांच्यापैकीं एक जण तरी आमच्या घरावर स्वारी करतोच. अशा-वेळीं घरांत चहा-चिवडा-केळी-वेफर्स, सुपारीच्या पुड्या यांची दंगल उडते. मेव्हण्यांचीं पोरं जरा जादा असल्यामुळें त्यांच्या शुभ आगमनानंतर रेडियो नादुरुस्त होतो, कपबश्यांचे कान जातात, माझ्या पुस्तकांचीं पानें सुटीं होतात. यावर मी जरा कांहीं 'कॉमेंटरी' केली कीं 'रेडियो' मेला सदान्कदा नादुरुस्तच असतो, कपबशा फुटा-यलाच आल्या होत्या इ. मुक्ताफळें ऐकावीं लागतात. पळवापळव करण्यांत हे मेव्हणे पटाईत असतात. माझी टाय, कोरी करकरीत चपलांची जोडी, या वस्तू मला न विचारतां नेण्याचा आपला जन्मसिद्ध हक्कच आहे असें ते मानतात. गार्गी मैत्रियी ह्या विदुषी आमच्याकडे आल्या-वर सिनेमा पाहण्याचा बूट काढणार हें आतां ठरल्यासारखंच आहे. सुधाताई शिवाय सिनेमा पाहायला मज्जा नाहीं आणि बाळासाहेब हवेंतच (कशाला—मुलें सांभाळायला?) असं गोड गोड बोलून या पोरी चक्क दहा रुपयांचा फन्ना उडवतात. नवसासायासानें एखाद्या महि-न्यांत कुठल्यातरी मासिकांत माझा एखादा लेख आला कीं—"परवांचा लेख फारच छान होताय. अय्या—बाळासाहेबांना अशा कल्पना सुचतात तरी कशा!" अशी साखर पेरून माझ्या भोळसर बायकोला फसवून "सुधाताई आतां आयस्क्रीम पार्टी दिली पाहिजे" अशी चक्क मागणी करतात. आईस्क्रीम पार्टीच्या मागणीनें मी तर गांगरून जातों.

या आईस्क्रीम पार्टीमुळें मी थंडगार होत असलों तरी महिन्यांतून एकदां हा कार्यक्रम झालाच पाहिजे. आमचे सासरचे लोक खाण्यांत पटाईत. त्यांच्या नादाला लागून आमच्या सौभाग्यवतीहि आईस्क्रीमचा प्रमाणाबाहेर समा-चार घेतात आणि त्यांची मुळांतच तोळा-मासा असणारी प्रकृति बिघडते. तुमच्या कुंडलींतल्या राहूमुळें बायकोची प्रकृति बरी राहाणार नाहीं असें एका भामट्या ज्योतिष्यानें ठोकून दिलें.

या ज्योतिष्यावर आमच्या बायकोचा विश्वास बसायचा कारण असं कीं माझी कुंडली पाहून त्यानें स्पष्ट सांगितलें 'साहेब, यांच्याशीं लग्न केल्यापासून तुमची भरभराट झाली.' हें ऐकतांच आमच्या बायकोनें मुकाट्यानें दहा रुपये त्या ज्योतिष्याच्या हातावर ठेवले. तो लेकाचा लबाड पुढें म्हणाला, "बाईंची प्रकृति बरी नाहीं; चांगले उपाय करा. स्वैपाकासाठीं माणूस ठेवा. अजून साडेसाती संपलेली नाहीं." ज्योतिष्यानें प्रकृतीबाबत केलेलं निदान सौभाग्यवतीला पूर्ण पटलें. लगेच किरकिर सुरु. 'मला चागल्या डॉक्टरला दाखवा!' आठ दिवस तीच तीच कटकट ऐकून कंटाळून मी मोठ्या डॉक्टरला दाखवलं त्यानें वीस रुपये तपासायचे घेतले आणि ७० चीं औषधें लिहून दिलीं. त्यांतलीं निम्मी औषधें मिळालीं तीं मी घरीं आणून टाकलीं. पण घेणार कोण? त्या गोळ्यांचा वास चम कारिक आहे, तर तें औषध फार कडू आहे, या सबबीवर सगळीं औषधें कपाटांत धूळ खात पडलीं. आतांपर्यंत माझ्या कपाटांत या औषधांचा एवढा सांटा झाला आहे कीं आर्यांग्ल औषधांचं एक दुकानच मला काढतां येईल.

पण इतकं करुनहि तुम्हांला माझ्याबद्दल माया नाहींच म्हणून रोज रडारड. लग्न झाल्यानंतर सुरवातीला कसे छान वागत होतां, आतां असे कसे बिघडलांत, तुम्हांला माझ्याबद्दल कांहीं वाटत नाहीं, ही तक्रार रोजचीच. याच्या भरीला गेल्या दहा वर्षांत मला किती दागिने घेतलेत असा निरुत्तर करणारा प्रश्न असतोच. अशा प्रसंगीं गप्प राहाणं हें हिताचं असतं हें जाणून मी चूपचाप बसलों की विचारते, "कां आतां कां गप्प बसलात? बोलायला तोंड आहेच कुठं" असें तोंड चालूं लागतें. अशा प्रसंगीं एखाद्या नाटकांतल्या अजागळ हीरोप्रमाणें मी माझं तुझ्यावर फारच प्रेम आहे अशी घोषणा केली कीं रागाचा पारा आणखीनच वर चढतो. आणि गेल्या दहा वर्षांत, तुमच्यासाठीं आणि तुमच्या मुलांसाठीं मी कशा खस्तो खाल्ल्या याचा पाढा वाचला जातो. या पाढ्यानंतर एकदम 'डाऊन' होऊन डोळ्याला पदर आणि ओक्साबोक्शी भोंकाड. याच पार्श्वसंगीतावर "एवढी मी मर मर मरतेंय, पण आहे का कुणाला त्याची कदर?" हें सणसणाटी वाक्य. हा हल्ला उघड उघड आमच्या वडिलांवर असतो. सासरा आपलं कौतुक करीत नाहीं, त्याला आपल्या लेकीचं फार कौतुक—या ठरलेल्या फेरी वाजायला लागतात.

आमच्या बायकोच्या मतें आपण म्हणजे रसना-राणीच. 'सुधाताईच्या हाताची गोडी वेगळीच' असं माहेरच्या माणसांचं सर्टिफिकेट असतंच. हे लोक बालंबाल खोटं कां बोलतात याचा मला अर्थच कळत नाहीं. भांडीं दहा वेळां तांदूळ उकडणें, गरीब बिचारे बटाटे होरपळणें आणि डाळ करपून टाकणें—म्हणजे आमचं लंच. रात्रीच्या डिनरला पक्वान्न म्हणजे कोणत्याहि जातीचा स्वस्त भोपळा किंवा खाप असलेलं अळू. भोपळा या वस्तूवर माझा भयंकर राग आहे, तर त्याच्यावर आमच्या बायकोचं फार प्रेम. (शालेय जीवनांतच तिच्या मास्तरांनीं तिला भोपळ्याविषयीं प्रेम निर्माण केलं.) आतां तुम्हीच सांगा, भोपळा या वस्तूची जीव आपटून प्राण दिला तरी चांगली भाजी होणं शक्य आहे काय? पण नाहीं. ती बोळकट भाजी मी निटक्या मारुन खाल्लीच पाहिजे. आमच्या घरांत 'चेंज' म्हणजे शेवग्याच्या शेंगा घालून केलेलं पिठलं. म्हणजे एक दिवस भोपळा आणि एक दिवस पिठलं या दगदणीत

आहारानें माझी प्रकृति कशी सुधारणार? आमचीं पोरं आणि बायको दिवसभर कांहीं ना कांहीं तरी चरत असल्यामुळें लंच-डिनर हा त्यांचा साईड बिझनेस! पण त्यांत माझे जे हाल होतात ते विचारूं नका. अशा परिस्थितींत मी दुसऱ्याच्या पार्ट्या-जेवणाचं कौतुक करून आपली परिस्थिति सुधारण्याचा 'इन्डायरेक्ट' यत्न केला कीं—"'माझ्या हातचं कसें गोड लागेल? हॉटेलांत पंचपक्वान्न खाण्याची संवय झालीय! लग्नापूर्वी काय जेवत होतां तें मी डोळ्यानें पाहिलंय! लग्नानंतर काटकुळे होतात आतां पहा किती वजन वाढलंय! जरा माणसांत आलांत!" हा जुना इतिहास ऐकावा लागतो.

त्यामुळें हा लेख आमच्या बायकोच्या हातीं पडला, तर "दोन खून, दोन आत्महत्या, एक प्रदीर्घ खटला, एक इमारत आगीच्या भक्ष्य-स्थानीं, रद्दीच्या बाजारांत एका उत्तम खाजगी ग्रंथालयाचा लिलांव–" अशा सामाजिक आपत्ती निर्माण होण्याचा संभव आहे. पण ईश्वराच्या कृपेनें जगांतल्या सर्व सुगरिणींप्रमाणें आमच्या घरांतहि 'लेखन–वाचन' या विषयाबद्दल प्रेम, आस्था आणि कळकळ नसल्यामुळें असा प्राणघातक अपघात होण्याची ९९.९९ टक्के शक्यता नाहीं.

● ● ●



# असून अडचण, नसून खोळंबा!

—ग. रा. कामत

कुण्या एका बादशहाची गोष्ट सांगतात. आम्रफळाची बरीच कीर्ति ऐकल्यामुळं एकदांतरी तें अमृतफळ चाखून पहावं अशी अनिवार इच्छा त्याला झाली. आंबे आणण्याच्या कामगिरीवर लगेच एक खास दूत रवाना करण्यांत आला. पण तो बेटा निघाला अगदींच सांगकाम्या. सारासारविचार न करतां त्यानं पूर्ण तयार झालेलीं फळं खरेदी केलीं आणि तो राजधानीकडे जाण्यासाठीं परत फिरला. त्या काळांतला प्रवास अत्यंत दगदगीचा आणि दीर्घसूत्री. त्यामुळें वाटेंतच तीं फळं सडलीं आणि निरुपयोगी झालीं. त्याच्यापुढं मोठा पेंच पडला. माघारी फिरून पुनः फळं खरेदी करावी म्हटलं, तर आंब्याचा मोसम संपला होता. आणि हात हालवीत बादशहासमोर गेलं, तर आपलं डोकं मारण्याचा हुकूम सुटणार! पेंच अवघड होता हें तर खरंच.

पण त्यानं एक अजब युक्ति शोधून काढली. त्यानं आपली दाढी चिंचगुळाच्या मिश्रणांत बुडवली, चांगली वाळवली आणि तो शहासमोर गेला. प्रवासांत घडलेली दुर्घटना सांगून बादशहाची करुणा भाकण्याचा खटाटोप त्यानं करून पाहिला, पण त्यांत यश येत नाहीं आणि आपलं डोकं मारलं जाण्याचीं चिन्हं दिसूं लागतांच, समयसूचकता बाळगून त्यानं आपली दाढी पुढं केली.

आम्रफळाची लज्जत चाखण्यासाठीं उतावीळ झालेल्या त्या हावऱ्या बादशहानं जिभल्या चाटीत 'आ' वासला आणि मागलापुढला कांहींहि विचार न करतां त्याच्या दाढीचा ग्रास घेतला! आणि—

नंतर बादशहाचा चेहेरा कसा झाला असावा हें पहायचं असेल, तर कोणत्याहि विवाहित पुरुषाला आपल्या वैवाहिक जीवनासंबंधीं विचारावं आणि त्याच्या चेहेऱ्याकडे टक लावून पहात बसावं! कारण शाही आंबटशौक केल्यासारखा लाचार रूबाब ही प्रत्येक नवऱ्याची लग्नसिद्ध कमाई असते!

लग्न ही माणसाच्या आयुष्यांतली अटळ घटना आहे असं प्रत्येक तरुण मानतो. त्यामुळं आपलं जीवन अपूर्ण आहे आणि केवळ बायकोमुळंच त्याला पूर्णत्व येऊं शकेल अशी त्याची भाबडी समजूत असते. सहाजिकपणें तो मिसरूड फुटण्याआधींच बोहोल्यावर उभं रहाण्याचे मनसुबे रचूं लागतो. शाळाकॉलेजच्या रस्त्यावर गस्त घालून तो दृष्टि-ज्ञान मिळवतो. कथा–कादंबऱ्या त्यांत पुस्तकी भर घालतात, नाटकसिनेमा दृश्य ज्ञान पुरवतात आणि कांहीं केलेसवरलेले मित्र बाष्कळ गप्प गोष्टींतून त्याला श्रुतिज्ञानाचे पाठ देतात. एवढ्या जुजबी आणि आडगिऱ्हाइकी भांडवलावर तो आपल्या भावी पत्नीचं चित्र डोळ्यापुढं रंगवूं लागतो. एकाद्या गाफिलक्षणीं कुणीतरी अशिक्षित पटु मुलीला तो सहजासहजीं विकेट देतो. आणि ब्रह्मवृंद 'सावधान' असा इशारा देत असतांनाहि तो घाईघाईनं आपलं 'शुभमंगल' उरकून घेतो!

कांहीं दिवस जातात. लग्नाची नवी नव्हाळी संपते, बायकोसंबंधींचं कुतूहल ओसरतं आणि 'ट्रान्सफर सीन' सुरू होतो. एके सकाळीं तो कुठंतरी घाईघाईत निघालेला आपल्याला दिसतो. आतां त्याच्या अंगावरले कपडे पूर्वींसारखे नीटनेटके नसतात. बिनइस्त्रीचा लेंगा किंवा पुंगळी झालेली पँट, मळका शर्ट आणि दोनतीन दिवसांची वाढलेली दाढी असा त्याचा नवा अवतार असतो. चालतांना पोक काढण्याची नवी लकब त्यानं आत्मसात केलेली असते. हातांतल्या पिशवीवरून तो भाजी मार्केटांत किंवा वाण्याच्या दुकानाकडे निघाला असावा हें अचूक अनुमान काढतां येतें. आणि हालचालींतल्या बावरेबावरेपणामुळं हेंहि अचूक ओळखतां येतं कीं, बायकोनं सांगितलेल्या खरेदीपैकीं कांहीं जिनसा तो विसरणार; आणि त्याची प्रेमळ आणि कर्तव्यदक्ष बायको त्याला व्यवहार कळावा म्हणून ती त्याच्यावर सदैव तोंडाची तोफ डागीत असते. त्या भावी संकटाच्या कल्पनेनंच एव्हांपासून त्याच्या पोटांत भीतीचा गोळा उठलेला असतो.

अशा प्रसंगीं त्याला विश्वासांत घेतलं आणि सहानुभूति दाखवली, म्हणजे तो कावऱ्याबावऱ्या नजरेनं आजूबाजूला पहातो, आपलं बोलणं बायकोच्या कानावर पडणार नाहीं ना त्याविषयीं खात्री करून घेतो आणि मग आपलं दुःख भडाभड ओकतो. दुःखाचा सूर टरलेला.



अनुक्रमणिका

अपूर्णाला पूर्ण करण्याच्या नादांत किंवा असह्य झालेला एकाकीपणा कायमचा नाहींसा करण्याच्या उद्योगांत तो आपलं सुख, शांति, समाधान आणि झोंपहि गमावून बसलेला असतो.

अनुभवाअंतीं त्याला आतां पुरतेपणीं कळून चुकलेलं असतं कीं, बायको ही नवऱ्याच्या आयुष्यांतली झोंपमोड आहे. लग्न झालेलं नसतं तेव्हां रात्ररात्र तो टकटकत बसलेला असतो. जगांत इतक्या फडतुस माणसांचीं लग्नं होतात, मग आपण एकटेच तेवढे कमनशिबी कसे ? हा प्रश्न त्याला झोंपूं देत नाहीं. आणि लग्नानंतर, कुठून दुर्बुद्धि सुचली आणि आपण या नसत्या फंदांत पडलों हा पश्चात्तापाचा विचार त्याची झोंप उडवतो !

कारण बायको ही अशीच कांहीं अद्‌भुत वल्ली आहे कीं, जी असतांना नकोशी होते; आणि नसतांना हवीहवीशी वाटते. हें केवळ लग्नापूर्वींच वाटत असतं असं नव्हे, तर लग्नानंतरसुद्धां वाटत असतं. ती घरांत असतांना नवरा जास्तींत जास्त वेळ बाहेर कसा काढतां येईल किंवा कोणतीं कारणं दाखवून तिला माहेरीं पिटाळतां येईल याचे बेत रचीत असतो. आणि ती माहेरीं असली म्हणजे आजारपणाचं सोंग काढून किंवा जेवणखाणाची आबाळ होत असल्याचा कांगावा करून तिला परत बोलावून घेण्याच्या खटपटींत असतो !

एका गोष्टीचं मला विलक्षण आश्चर्य वाटतं. दोन बायकांचं क्षणभरसुद्धां एकमेकींशीं पटत नाहीं. असं जरी असलं तरी नवऱ्याविषयींचीं त्यांचीं मतं आणि त्याच्याशीं वागण्याची त्यांची पद्धत याबाबतींत मात्र त्यांचं पूर्ण एकमत असतं. एरवीं बघितलं, तर जगांत एक बाई दुसरी सारखी नसते. चेहेऱ्यांचीं नाना तऱ्हेचीं शिल्पं आणि शरिराचे वेगवेगळे घाट पदोपदीं आढळतात. पण ते सारे दर्शनी. नवऱ्याचं मोजमाप करणारं आणि त्याला काबूंत ठेवूं पहाणारं अंतरंग मात्र पूर्ण साचेबंदी. हें कसं ?

प्रत्येक बायकोच्या आपल्या नवऱ्यासंबंधींच्या समजुती इथूनतिथून सारख्या. लग्न करून आपण नवऱ्यावर अगणित उपकार करून ठेवले आहेत ही तिची ठाम समजूत. या उनाड माणसाशीं लग्न करायला जगांतली दुसरी कोणतीहि मुलगी तयार झाली नसती ही तिची प्रामाणिक भावना; आणि आपला नवरा हा उधळ्या, अव्यवहारी, भोळा आणि पर्यायानं अक्कलशून्य आहे हें तिचं नवऱ्याविषयींचं लाडकं मत. त्यामुळं

साहजिकच त्याला सुधारण्याची आणि सुखी करण्याची अवजड जबाबदारी ती आपल्या चिमुकल्या शिरावर वहात असते. वाघीण आपल्या बछड्यांचं संरक्षण ज्या दक्षतेनं आणि हिरीरीनं करीत असते, तीच दक्षता आणि तीच हिरीरी नवऱ्याचं रक्षण करतांना बायको दाखवते. फरक इतकाच कीं, ज्यांच्यापासून रक्षण करायचं, तें बापडे प्रायः निरुपद्रवी असतात आणि स्वतःचं संरक्षण करायला नवरा पूर्णपणें समर्थ असतो! पण हें कांहींहि लक्षांत न घेतां ती कुणाच्याहि अंगावर गुरगुरते. नवऱ्याचे जीवश्चकंठश्च मित्र आणि शाळा-कॉलेजांतल्या त्याच्या किंचित् मैत्रिणी यांच्याशीं तर तिचं हाडवैर. त्यांना सदैव तिच्या पंज्यांचा आणि नख्यांचा प्रसाद मिळतो.

बायकोची ही क्रियाशील वाचाळता म्हणजे नवऱ्याच्या जीवनांतला अत्यंत अपमानास्पद प्रसंग. झाली एवढी फजिती पुरे झाली, चारचौघांत आणखी शोभा व्हायला नको असा पोक्त विचार करून नवरा अशा प्रसंगीं राग गिळून, खालीं मान घालून आणि तोंड मिटून बसतो. या समंजसपणाचा ' जितं मया ' असा सोयीस्कर अर्थ करून ती अधिकच शेफारून जाते.

हे झाले बाहेरचे शत्रू. नवऱ्याचं ज्यांच्यापासून रक्षण केलं पाहिजे असे अंतःस्थ शत्रूहि तिला असतात. हे शत्रू म्हणजे नवऱ्याचीं व्यसनं!

खरं सांगायचं तर व्यसन ही पुरुषाची नैसर्गिक प्रवृत्ति आहे. एकाकीपणांत कुणाची तरी सोबत असावी म्हणून लग्नापूर्वी आणि जन्माची चालती बोलती सोबत लाभल्यानंतर तिचा अनेकविध ताप विसरण्यासाठीं लग्नानतर, तो मोठ्या निष्ठेनं एकाद्या व्यसनाची उपासना करतो. आपल्या आद्य-पित्याला ज्ञानवृक्षाचं फळ चाखतांक्षणींच दिसलेल्या त्या सुप्रसिद्ध ' पाना 'ची आठवण आदामच्या पुल्लिंगी वंशजांनीं अजूनहि इमानें इतबारें जतन केली आहे. त्यामुळं पान या वस्तूला आणि क्रियेला प्रत्येक पुरुषाच्या जीवनांत पहिल्या पानाचा मान मिळत असतो. पान हें जितक्या चवीनं तो चघळतो, तितक्याच आस्थेनं तें तो हातांत धरतो; मग तें पत्त्याचं पान असो कीं एकाद्या मासिक पुस्तकाचं असो. धूम्रपानासारखं जाहीरपणें करतां येणारं आणि सुरापानासारखं निवडक मंडळींत (आणि तेंहि आतां चोरून) करावं लागणारं पानहि त्याला अत्यंत प्रिय. पानाचा आणखी एक मोठा लज्जतदार प्रकार आहे. घायकुतीला आलेली मंडळी चोरट्या प्रश्नकांची पर्वा न करतां भर चव्हाट्यावर तो उरकतात. पण एकांत हें त्या

पानाचं शिष्टसंमत स्थळ. या पानाशीं मात्र बायकोचं शत्रुत्व नसतं! त्यांत सहभागी व्हाय-लाहि ती सदैव तत्पर असते. फक्त भूमिका मालकी हक्काची आणि आग्रह एकनिष्ठेबद्दल. इतरहि कांहीं तक्रारी कुरबुरी असतात, पण पुरुष त्या गोड मानून घेतो!

नवऱ्याच्या इतर साऱ्या पानांशीं बायकोचं हाडवैर असतं. त्यानें पान खातांच तिचं तोंड लाल होतं. त्यानं सिगारेट पेटवतांच ती आंतल्या आंत जळूं लागते. आणि चुकूनमाकून कधीं त्याच्या पोटांत दोन पेग गेले, तर जन्मभर तिचा चेहेरा लालीलाल आणि नजर तारवटलेली होऊन रहाते. संसारांतली किंवा प्रेमांतली सह-संवेदना म्हणतात ती हीच!

नवऱ्याला व्यसनमुक्त करण्यासाठीं बायको जो आटापिटा करते, त्यापुढं भगीरथ-प्रयत्नसुद्धां थिटे पडतात. साम, दाम, भेद आणि दंड या चतुरंग दळाच्या माऱ्यानं ती शत्रूला नेस्त-नाबूत करूं पहाते. घोर संग्राम होतो. शत्रुपक्षां-तलं बरंच बुणगं गारद होतं, अतिरथी महारथी जायबंदी होतात. आतां नवराच लेचापेचा निघाला, तर शत्रूचाहि नाइलाज होतो; पण स्त्री ही क्षणाची, व्यसनं मात्र अनंत काळचीं एवढा विवेक नवऱ्याला असला, तर शत्रूपक्ष नामोहरम होत नाहीं. त्याला वेगळंच अवसान येतं. भूमिगत होऊन तो चोरटे हल्ले चढवूं लागतो. आणि सरतेशेवटीं त्याच्या गनिमी काव्यापुढं बायकोलाच हात टेकावे लागतात!

या क्षेत्रांतला माझा अनुभव तर अत्यंत उद्बोधक आहे. कळत्या वयाबरोबरच सिगरेटहि माझ्या जीवनांत आली आणि लग्न होईपर्यंत अत्यंत निष्ठेनें तिनं मला साथ केली. लग्नाचा घाट जुळून येऊं लागल्यापासूनच बायकोनं तिचा दुःस्वास सुरू केला, तिला सवतीसारखं लेख-ण्यास प्रारंभ केला. तिची हकालपट्टी करण्याचं मागणंहि तिनं गौरीहर पूजतांना मागितलं

असावं. लग्न झाल्या दिवसापासूनच तिची सिगरेटविरोधी मोहीम सुरू झाली. एकांतांत करायचे सारे थेर करून झाल्यावर तिनं सिगरेटच्या पेट्या लांबवायला आणि वेळ-प्रसंगीं बंबांत टाकायला सुरवात केली. पण त्याचा माझ्यावर कांहींहि परिणाम होईना. मी नव्या पेट्या आणूं लागलों. थोड्याच दिवसांत सिगरेटचा खर्च भलताच वाढूं लागल्याचं तिच्या लक्षांत आलं आणि तिनं पवित्रा बदलला. थोडं नमतं घेतलं, माझ्या प्रकृतीविषयीं काळजी दर्शविली आणि मला चांगल्या सिगरेटचं आमिष दाखवून त्यांची संख्या तोडण्याचा डाव टाकला. सिगरेटची तलफ वारंवार येऊ नये म्हणून तिनं कुणाच्या तरी सल्ल्यानं मला 'च्युइंग गम' चघळण्याचा गुरुमंत्र दिला. मी तो मोठ्या आनंदानं मानला आणि सिगरेटबरोबर च्युइंग गमच्याहि पेट्या आणूं लागलों. या नव्या नादांत सिगरेटची संख्या मात्र मुळींच कमी झाली नाहीं; उलट मला आणखी एक व्यसन जडलं! पण याहि पराभवामुळं माझी बायको मुळींच डगमगली नाहीं. तिनं आणखी एक नवं अस्त्र उपयोगांत आणलं. तिनं पानाचा डबा विकत घेतला आणि 'जाफरानी पत्ती' सह माझ्या पुढ्यांत ठेवला. पुनः सबब प्रकृतीची काळजी; आणि तंबाखू ओढण्यापेक्षां ती खाणं कमी अपायकारक असतं हा सल्ला.

मी प्रथम बरेच आढेवेढे घेतले. बाय-कोशीं बरीच खडाजंगी करून पाहिली आणि सरतेशेवटीं नेहमींप्रमाणें हार खाल्ली! पुष्कळसा त्रास आणि अनंत अडचणी सोस-ल्यावर मला पानाचं रहस्य उमगलं; आणि सिगरेटच्या संगतींत पानाचा रंग चांगला जमतो व पानामुळं सिगरेटची लज्जत वाढते असा नवा शोध मला लागला. सहाजिकच थोड्याच दिवसांत मी सिगरेटमबरोबर पानाचाहि डबा जवळ बाळगूं लागलों.



पण बायकोनं हा दुसराहि पराभव न कचरतां स्वीकारला आणि नवा व्यूह रचला. नंतरच्या काळांत तिची-माझी बरीच झटापट आणि अनेक वेळां वरखालीं होऊन आजमितीस माझ्या तोंडांत सिगरेट कायम राहिली आहे, माझं तोंड सदैव रंगलेलं असतं, इतकंच नव्हे तर माझ्या नाकपुडीखालीं तपकिरीचीं पुटं दिसतात, आणि अधूनमधून रात्रीच्या वेळीं मी रस्त्याची लांबीरुंदी मोजीत डगमगत जात असलेला दिसतो.

—आता माझ्या व्यसनांबद्दल बायको तक्रार करीत नाहीं; आणि तिच्या व्यसनांबद्दल मीहि.

होय. माझी बायकोहि व्यसनी आहे. सग-ळ्याच बायका तशा असतात म्हणा! अखेरीस व्यसन हें फक्त मानण्यावर असतं. शिष्टसंमत आणि सर्वमान्य गोष्टींना व्यसन म्हणायचं धाडस आपण करीत नाहीं इतकंच. नाहीं तर पुरुषां-पेक्षां बायकाच अधिक व्यसनी असतात यांत कांहींच शंका नाहीं.

माझ्याच बायकोचं उदाहरण घ्या.

माहेर हें तिचं आद्य आणि सर्वांत मोठं व्यसन. मला दर पांच मिनिटांनीं या मुज्ञाग,

सुशील, सुखी (आणि इतर अनेक 'सु'नं सुरू होणाऱ्या विशेषणांनीं युक्त) कुळाविषयीं कांहींतरी ऐकावं लागत; आणि त्यांच्या तुलनेंत आपण प्रत्येक बाबतींत कमी पडतो हा बोध मनावर ठसवून घ्यावा लागतो. त्यामुळं आईबाप, बहीणभाऊ, कुळीकुणीहि नसलेल्या एकाद्या मुलीशीं आपण लग्न केलं असतं, तर फार बरं झाल असत असा उद्वेगाचा (पण चोरटा) विचार मनांत डोकावतो. पण तो दाबून ठेवून वरकरणीं हस्तिदंती दाखवीत मला सगळे सोहाळे पार पाडावे लागतात.

कला हें माझ्या बायकोच दुसरं व्यसन. फक्त पाक-कला वगळली, तर जगांतल्या झाडून साऱ्या, पौरुषेय आणि अपौरुषेय कलांचा तिला छंद आहे. कलेचं तिचं व्यसन इतकं पराकोटीला गेलेलं आहे कीं, अ कलेशीं तिनं जन्माचं वैर आरंभलं आहे! तिची कला ही सदैव प्रयोगावस्थेंत असते आणि तिचे सारे प्रयोग माझ्या अंगावर बेततात. माझ्यासाठीं ती 'आई, पाणी घाल' थाटाचा शर्ट शिवते आणि त्याची वारेमाप स्तुति करून मला तो (पँटमध्यें लपवून) घालावाच लागतो. माझ्या हातरुमालावर ती 'मधू कीमत' हीं जगाकडे डोळे वटारून पहाण्याइतकीं बटबटीत अक्षरं 'भरते' आणि माझ्या खासगी नांवाचा सर्वांना शोध लागतो. भोंगळ विणलेला स्वेटर, बुशशर्टवर विविधरंगांच्या सुतानीं भरलेलं बदक, अपुरे पडणारे टेबलक्लॉथ, सोफा सेटवरले रुमाल आणि त्यांच्यावर जमलेलं प्राणी संमेलन इ. अनेक कलाकृती माझी आणि घराची शोभा करतात!

काटकसर हें माझ्या बायकोचं आणखी एक व्यसन. मी उधळ्या, पैसे सांठवण्याची मला अक्कल नाहीं अशी तिची ठाम समजूत असल्यामुळं, कोट माझ्या अंगांत असला, तरी पाकीट तिच्या हातांत असत. पगाराचा दिवस ही भानगड माझ्या जीवनांत नाहीं हें माझं दुर्दैव. कारण त्यामुळं करारमदार करणं, हप्त्यांच्या तारखा ठरवणं, त्यांची वसुली करणं इ. व्यावहारिक गोष्टींत वेळोवेळीं ती जातीनं लक्ष

घालते; आणि मला बाजूला ठेवून आपल्या व्यवहारदक्षतेचे तडाखे माझ्या संबंधित व्यावसायिकांना देते. ताकभात जेवून बंगला बांधणं आणि त्यातल्या फक्त २ खोल्यांत आपण राहून बाकीच्या खोल्या भाड्यानं देणं ही पुणेरी नीति तिच्या अंगवळणीं पडलेली आहे. त्यामुळं तिचे काटकसरीचे प्रयोग सदैव चालू असतात. बस-रिक्षाचे पैसे वांचवण्यासाठीं तिनं मला सायकल शिकणं भाग पाडलं; भाजी आणा-दोन पैशांनीं स्वस्त मिळते म्हणून ती रोज मला दोन मैलांवर असलेल्या मंडईत पिटाळते. इतकंच नव्हे तर रद्दीचा भाव जास्त असतो, म्हणून ती मला 'सकाळ' ऐवजीं 'टाइम्स' वाचायला लावते; आणि भांडीं ध्यायला बरे पडतात म्हणून माझ्यासाठी वारंवार, भरपूर कपडे शिवून आणते. तिच्या काटकसरीचा हा अजब प्रकार पाहून मी थक्क होतों. पण स्वतःच्या व्यवहार-चातुर्याविषयीं तिला भलताच आत्मविश्वास वाटत असल्यामुळ मी तोंड बट्ट मिटून घेतों!

आणखीहि अनेक व्यसनं तिला आहेत. आणि तशीं तीं सगळ्याच बायकांना असतात. नवऱ्यांच्या व्यसनांचा त्रास बायकोला फार फार तर रात्रीं होतो, पण बायकोच्या व्यसनांचा त्रास नवऱ्याला क्षणोक्षणीं आणि पदोपदीं होत असतो. नवऱ्याच्या व्यसनांबद्दल बायको गांवभर डांगोरा पिटीत हिंडते, पण तिच्या व्यसनांबद्दल तोंडांतून ब्र काढण्याचीहि नवऱ्याला चोरी होते. बिचाऱ्याला तोंड बांधून आयुष्य कंठावं लागतं.

मग तो हें सारं सहन कां करतो? आणि हें आधीं ठाऊक झालेलं असलं तरी लग्न कां करतो? प्रत्येक माणूस स्वतःला फार्जील शहाणा समजतो; दुसऱ्यानं ऐकून शिकायला तो मुळींच तयार नसतो. आणि आपलं आयुष्य अपूर्ण आहे व फक्त बायकोमुळंच तें पूर्ण होऊं शकेल अशी त्याची भंगड कल्पना असते. अनादि कालापासून चालत आलेली ही कल्पना अनंतकालापर्यंत चालत रहाणार आहे आणि तोंपर्यंत प्रत्येक पुरुषाला बायको ही असतांना नकोशी आणि नसतांना हवीहवीशी वाटत रहाणार आहे!

त्याला कांहीं इलाज नाहीं!

● ● ●



# कारण तो आम्हां, स्त्रियांचा सहवास!

— अनंत काणेकर

*स्थळ : बाळासाहेबांचा दिवाणखाना.*
*वेळ : संध्याकाळीं ४ चा सुमार.*

[पडदा वर गेल्याबरोबर स्टेजच्या एका विंगमधून एक मुलगा एक भला मोठा फलक घेऊन दुसऱ्या विंगकडे हळूंहळूं जातो. त्या विंगमधून एक मुलगी तसाच एक भला मोठा फलक घेऊन समोरच्या विंगकडे हळूंहळूं चालली आहे. मुलाच्या हातांतल्या फलकावर 'पुरुष बायकांसारखे—' अशीं अक्षरें आहेत. मुलीच्या हातांतल्या फलकावर, '—पत्ते खेळूं लागले तर—' अशीं अक्षरें आहेत. तीं दोघें स्टेजच्या मध्यावर आल्याबरोबर दोन्ही फलक एकमेकांना लावून प्रेक्षकांनीं नाटिकेचें संबंध नांव, 'पुरुष बायकांसारखे पत्ते खेळूं लागले तर—' सलग वाचावें, अशा रीतीनें मिनिट दीड मिनिट उभीं रहातात; आणि मग आपापल्या दिशेनें दोघें दोन विंगामध्यें निघून जातात.

दिवाणखान्यांत पत्ते खेळायचें टेबल मध्यें ठेवलें आहे. त्यावर पत्त्यांचे जोड आहेत. जवळच एका लहान टीपॉयवर सिगारेट्सचा डबा, काड्यांची पेटी वगैरे मांडून ठेवलीं आहेत. टेबलांवर, खुर्च्यांवर, टीपॉयवर भरतकाम केलेले सुंदर रुमाल टाकले आहेत. दिवाणखाना एकंदरींत व्यवस्थितपणें सजविला आहे.

**विशेष सूचना :** नटांनीं आपलें बोलणें चालणें, कपडेलत्ते, हालचाली मुळींच बायकी वाटूं देतां कामा नये; पुरुष पुरुषी थाटांत बोलताहेत, चालताहेत असेंच वाटलें पाहिजे. बोलण्याचा आशय बायकी आहे इतकेंच.

पायजम्याच्या पायाच्या चुण्या नीट करीत बाळासाहेब पलीकडल्या खोलींतून बाहेर दिवाणखान्यांत येतो. येतांयेतां मागें वळून तो खोलींतल्या आचाऱ्याशीं बोलतो आहे—]

**बाळासाहेब :** आणि हें पहा. चहा आणशील, तेव्हां किटलीवर ती नवी रेशीम काम केलेली कोझी घालायला विसरूं नकोस, बरं का! (खोलीचें दार ओढून घेतांना पुन्हां कसली तरी आठवण होऊन) सहा साडेसहाला पुन्हां चहा पाहिजे का म्हणून बाहेर येऊन विचार, म्हणजे मग खेळ आम्ही आवरता घेऊं.

[दरवाजा ओढून घेऊन दिवाणखान्यांत येतो. खिडक्यांचे पडदे, कोपऱ्यांतल्या कुंड्यांतलें पानचें झाड, फ्लॉवरपॉटमधलीं फुलें वगैरे दिवाणखान्यांतल्या वस्तू ठाकठीक आहेत का म्हणून इकडे तिकडे नजर फिरवतो. मधल्या टेबलावर बोट फिरवून धूळ झाटली आहे याची खात्री करून घेतो. टेबलाजवळची एक खुर्ची एक इंच बाजूला सरकवतो. तेवढ्यानें खुर्च्यांची मांडणी ठीक झाली आहे, असें त्याचें समाधान होतें. इतक्यांत बाहेरच्या दरवाज्यावर टकटक ऐकूं येते.

बाळासाहेब एकदम कोपऱ्यांतल्या मोठ्या आरशाकडे धांव घेतो. पायजम्याच्या चुण्या नीट करतो. केसांवरून फणी फिरवतो, आणि दरवाजा उघडायला जातो. दरवाजांतून बाबू आंत येतो.]

**बाळा :** ये ना आंत, बाबू.

**बाबू :** काय रे, झाली वाटतं तयारी सर्व? मी जरा लवकरच आलों. म्हटलं, चहा शिरा करायला तुला थोडी मदत करावी.

**बाळा :** लवकर आलास तें ठीक झालं. पण आतां करायचं कांहीं उरलेलं नाहीं. शिऱ्यांत तूप घालतांना आचाऱ्याजवळ मी स्वतः उभा राहिलों. नाहींतर लेकाचे वाटेल तसं तूप ओततात!—अरेच्या, तुझी टाय् नवी दिसतेय्!

**बाबू :** छेः, नवी कुठली? तुझ्या लक्षांत नाहीं वाटतं, बाळासाहेब? गेल्या दिवाळींत

बोफर्ट कंपनीच्या सेलमध्यें नाहीं का ही घेतली ! सध्यां स्रयवर रेशमी वेलबुट्टया काढायची फॅशन आहे. तेव्हां त्याच टायवर मी ही फक्त वेलबुट्टी काढलीय—म्हटलं नवी कशाला घ्या ? जुन्या-वरच वेलबुट्टी काढली कीं झाली नवी ! तूसुद्धां फसलासच कीं नाहीं ! आवडली का तुला ?

**वाळा :** काय छान दिसते रे—मला कशी दिसेल कुणाला ठावूक.

**वावू :** बघ ना लावून. (काढून देतो.)

**वाळा :** (आरशापुढें जाऊन स्वतःच्या गळ्याला बांधतो. कॉलर ठीकठाक करतो. केसावरून फणी फिरवतो.) कशी दिसते ?

**वावू :** झकास ! तुझ्या गोलसर चेहेऱ्याला छानच दिसते. (मध्यें मांडलेल्या पत्त्यांच्या टेबलाकडे पहात) कुणा कुणाला बोलावलंय्‌स आज खेळायला ?

**वाळा :** विनायकला बोलावलाय्‌—नी सबनासहि येईल ?

**वावू :** विनायक येणार आहे का ? (टेबलाजवळच्या खुर्चीवर बसत) अलिकडे विनायकच्या तोंडावर सुरकुत्या किती दिसतात ! तुझ्या नाहीं लक्षांत आलं ?—काय झालंय कुणाला ठावूक. त्याचं नी कमाचं पटत नाहीं म्हणे. कांहीं नवीन कळलं का ?

**वाळा :** नवीन कांहीं नाहीं—पण हल्लीं फारच फाटलंय्‌ म्हणे—लवकरच घटस्फोट—

**वावू :** बाकी कमानं तरी लग्न करतांना त्याच्यांत काय पाहिलं होतं कुणाला ठावूक.

(दारावर टक टक ऐकूं येते.)

**वाळा :** या या आंत.

(विनायक येतो.)

**विनायक :** (अगदींच अनपेक्षित लोक पाहिल्यासारखा चेहेरा करून) अरे वा—बाबू !

**वाळा :** म्हणजे ? बाबूला बोलावलाय्‌ म्हणून सांगितलं नव्हतं मी तुला ?

**वावू :** (उठून विनायकचा हात हातांत घेत) विनायक किती दिवसानीं पहातोय्‌ तुला मी—किती टवटवीत दिसतोय्‌ चेहेरा तुझा—दाढीहि किती छान झालीय्‌ !

**विना :** (गडबडीनें) तुम्हांला बातमी कळली का ? आत्तां वाटेंत मला विठ्ठल भाटे भेटला. तो म्हणाला, त्याला गजा म्हाळकरानं सांगितलं कीं लोणंदकराची बायको काडीमोड घेणार आहे !

**वावू :** (खुर्चीवर अंग टाकीत) छेः, कांहीं तरीच !

**विना :** आतां काय सांगावं—आगखीहि एकदोघांनीं मला तेंच सांगितलं. (आजूबाजूला नजर फिरवीत) बाळासाहेब, खोली तर सुंदर सजवली आहेस, गड्या! हें आरशाचं कपाट पूर्वी या कोपऱ्यांत नव्हतं, नाहीं का? मला कांहीं फारसं समजत नाहीं, पण मला वाटतं ती पामची कुंडी या कोपऱ्यांत ज्यास्त बरी दिसली असती. (बारीक नजरेनें न्याहाळीत) आगखी हें पहा, या चेस्टरफील्ड सेट्चा तूं निळी कव्हरं घाल, बाळासाहेब, हिरवीं बरीं दिसत नाहींत.

**बाळा :** हँडलूम हाऊसमधून तें नव्या डिझाइन्चंच कापड आणणार आहे मी या आठवड्यांत.

**विना :** हँडलूम हाऊसमध्यें कव्हरांचीं सुंदरच कापडं मिळतात. बरं का, बाबू, तुला एक अगदीं खास बातमी सांगायचीय. खूप होऊन जाशील.

**बाबू :** कसली बुवा, खास बातमी?

**विना :** आम्हांला आइस्क्रीम् पार्टी दिली पाहिजे ही बातमी दिल्याबद्दल!

**बाबू :** ती देऊं रे—पण बातमी काय ती सांग ना लवकर.

**विना :** त्या दिवशीं सांगलीकरांच्या लग्नाला तूं बंगाली पद्धतीचा लांब मलमली सदरा आणि सोगा सोडलेलं तलम धोतर नेसून मुद्दाम आला होतास ना?

**बाबू :** हो.

**विना :** त्या कपड्यांत तूं इतका सुंदर दिसत होतास. सांगलीकरांचा बन्या म्हणाला—

**बाबू :** खरंच?

**बाळा :** बरं, विनायक, तुझ्या छोट्या कसा काय आहे?

**विना :** रात्रीचा रडरड रडतो—पांच मिनिटं झोंपूं देत नाहीं. मला वाटतं त्याला दांत येताहेत. दिवसा फारसा रडत नाहीं. (पत्त्यांच्या टेबला जवळील खुर्चीवर बसत) आगखी कोण येणार आहे खेळायला?

**बाळा :** सबनीस.

**विना :** (ओंठ वक्र मिटून 'हूं' करतो. कुत्सित स्वरांत) सबनीस येणार आहे? तुम्हांला त्याची अलिकडील भानगड कळलेली दिसत नाहीं. मला सर्व कांहीं इत्थंभूत कळलंय्. पुण्याची ती प्रख्यात सुनीता खान्—तिला घेऊन सबनीस अलिकडे फिरतो म्हणे.

**बाबू :** आम्हांला सर्व माहीत आहे. कालच संध्याकाळीं दरळीच्या कॉफी हाऊसमध्यें त्या दोघांना पाहिल्याचं मला पेठ्यांचा भाऊ सांगत होता.

**बाळा :** पेठे म्हणजे ते दोन बायकावाले?

**बाबू :** त्यांना दोन बायका आहेत? मला नाहीं माहीत.

**बाळा :** पहिलीला टाकली आहे त्यांनीं दहा वर्षांपूर्वीच. पुण्यांत असते म्हणे ती.

**विना :** त्या पेट्याचा एक डोळा कांचेचा आहे—पुष्कळांना माहीत नाहीं.

**बाळा :** मला माहीत आहे. (दारावर टकटक ऐकूं येते.) या या आंत—दार उघडंच आहे.

(सवनीस येतो.)

**सवनीस :** अरेच्या, सर्व आलेत कीं! मला जरा उशीर झाला हं.

**विना :** जाऊं द्या रे, सवनीस. उशीर कसला—आम्ही हे आत्तांच आलों.

**सवनीस :** झालंय काय—तो नवीन नोकर ठेवलाय ना—तो भारीच रेंग्या आहे. झटपट कामं आटोपतांच येत नाहींत त्याला.

**बाळा :** सगळे गडी तसेच—विनायक, बाबू, सवनीसाच्या नव्या बुशकोटाकडे तुमचं लक्षच गेलेलं दिसत नाहीं. कापड सुंदर आहेच, पण कट किती छान आहे. मला वाटतं हें नायलॉन्—

**सवनीस :** नायलॉन् नाहीं रे डेक्रॉन्—

**विना :** पाठीवरहि किती फिट बसलाय्—जरा असा वळ ना, सवनीस.

(सवनीस वळतो. बाळासाहेब, विनायक, बाबू, बुशकोटचें कापड, कॉलर, शिवण बारकाईनें तपासतात.)

**बाबू :** आंतला गंजिफ्रॉकहि नवाच दिसतोय्—बघूं या रे.

(बाबू आणि विनायक त्याच्या बुशकोटाचीं बटनं काढायला मदत करतात. बाळासाहेब आणि ते दोघे सवनीसाचें गंजिफ्रॉक ओढून, ताणून, हात फिरवून पहातात.)

**बाळा :** फारच मऊ आहे गंजिफ्रॉक तुझं, सवनीस!

**सवनीस :** (बुशकोट पुन्हां अंगावर चढवीत) आवडलं तुम्हां सर्वांना?

**विना :** छानच आहे—पण थांब हं—(कॉलरकडे बाहेर आलेलं एक सूत पटकन् तोडतो.) बुशकोट तर फारच छान.

**सवनीस :** आमच्या शेजारी एक शिंपी येतो त्यानं शिवून दिलं. दरहि अगदीं माफक आहेत त्याचे. बुशकोटचे फक्त सहा रुपये.

**बाळा :** थोडा वेळ पत्ते खेळूं या का?

**सवनीस :** (खुर्चीवर बसत) खेळूं या कीं पण बाळासाहेब, त्या आधीं मला थोडं पाणी पाहिजे बुवा.

**बाळा :** देतो की आणून—

(बाबू आणि विनायकहि आतां टेबलाजवळ येऊन बसले आहेत.)

**सवनीस :** अरे तूं बस, बाळासाहेब. मला सांग कुठून आणायचं तें—मी घेऊन येतों.

**बाळा :** तूं बस रे. मी आणतों सर्व कांहीं.

(बाळासाहेब जातो. किंचित स्तब्धता. तिघेहि डोकीं जवळ आणून एकमेकांकडे अर्थपूर्ण नजरेनें पहाताहेत.)

**सवनीस :** बाळासाहेबाचा चेहेरा फार उतरलेला दिसतो. गाल पण आंत गेलेत नाहीं?

**बाबू :** आणि केंस किती पांढरे झालेत. तरी मधूनमधून कसला, तरी कलप लावतो म्हणे.

**सवनीस :** कॉलेजांत असतांना किती देखणा होता बाळासाहेब.

**विना :** काय भयंकर फर्निचर आहे हं

दिवाणखान्यांतलं—नी कव्हरांचं कापड पण काय निवडलंय्! शीः!

**सवनीस** : (कोपऱ्यांतल्या टीपॉयकडे जातो आणि तिथला सिगारेटचा डबा उचलून सर्वांना दाखवीत) डबा फाइव्ह् फाइव्ह् फाइव्ह्चा, नि आंत सिग्रारेट्स् चार मिनार! (सर्वजण त्या डब्याकडे तिरस्कारानें पहातात.) मी मुद्दाम पाणी आणायला स्वतः जाणार होतों. त्याचं सैपाकघर पाह्यचं होतं मला.

(बाळासाहेब पाण्याचें भांडें, ग्लास वगैरे ट्रेमधून घेऊन येतात.)

**बाळा** : (एका टीपॉयवर ट्रे ठेवीत) घ्या ना. (सवनीस आणि विनायक पाणी घेतात) थंड आहे ना? रेफ्रिजरेटरमधलं आहे.

**सवनीस** : (पाणी घेतांना तोंड वांकडें करीत) फारच थंड झालंय्. इतक्या थंड पाण्यानं माझ्या घशाला त्रास होतो.

**विना** : आज मी एक गंमत करून पाहिली—

**बाळा** : काय बुवा?

**विना** : एका मासिकांत टोमॅटोची चटणी करायची कृति दिली होती. तसली चटणी सैपाकीणबाईकडून करून घेतली. फारच रुचकर होते. सगळ्यांनीं मिटक्या मारीत खाल्ली.

**बाबू** : कशी—कशी करायची रे, विनायक?

**विना** : तशी कांहीं कठीण नाहीं रे. टोमॅटोच्या फोडी करायच्या, नी मीठ, खोबरं, मिरची घालून वाटायच्या—मग लिंबू पिळायचं—

**बाबू** : पण टोमॅटो किती घ्यायचे? खोबरं किती? मिरच्या किती? बरोबर कृती सांग.

**सवनीस** : थोडी साखर घालावी लागत असेल—

**बाळा** : साखरेपेक्षां मला वाटतं गूळच—

**विना** : कांहीं चालतं. मासिकांतलं तें कात्रणच आणून देईन मी तुला, बाबू.

(सवनीस दाढीवरून बोट फिरवून कुठें खरखरीत लागते का पहातो. लगेच खिशांतून साबूची ट्यूब, लहानसा आरसा आणि सफ्टी रेझर काढतो. टेबलावर आरसा ठेवून ट्यूबमधला साबू दाढीला लावतो. तेवढ्या खरखरीत भागावरून वस्तरा फिरवतो. रुमालानें साबूचा फेस पुसून टाकतो. इतर त्याच्याकडे लक्ष देत नाहींत. बाळासाहेब फ्लॉवरपॉट मधलीं फुलें नीट करीत आहेत. बाबू टेबलावरल्या चित्रांची चाळवाचाळव करतो आहे. विनायक शांतपणें आपल्या खुर्चीवर रेलून सिगारेट्र ओढतो आहे. दाढी पुसून झाल्यावर सवनीस खिशांतून एक फणी काढतो आणि केंस व्यवस्थित करतो.)

**बाबू** : (स्तब्धतेचा भंग करून.) काय, करायची डावाला सुरुवात?

**बाळा** : (फ्लावरपॉटकडून मान वळवून) थांबा—थांबा जरा.

(आंतल्या खोलींतून एक सुंदर टेबलक्लॉथ आणून मधल्या टेबलावर तें पसरतो.)

**सवनीस** : (टेबलक्लॉथवर हात फिरवीत) छान आहे. कुठं घेतलंस रे बाळासाहेब?

**बाळा** : नाक्यावरल्या त्या डिपार्टमेंटल स्टोअर्समध्यें—

**विना** : तिथं मिळतं? केवढ्याला?

**बाळा** : सात रुपये पंधरा आणे. पण मी घेतलं तेव्हां सेल चालू होता. आतां केवढ्याला विकतात कुणाला ठाऊक. तीं कोपऱ्यांतलीं फुलं मात्र मी भरलीं हं—

**बाबू** : छानच दिसतात तीं

**सवनीस** : सुखटणकरची दिल्लीहून मुंबईला बदली झाली. परवाच माझी गांठ पडली. तुम्हांला कुणाला भेटला का?

**विना** : नाहीं बुवा.

**सवनीस** : तो म्हणत होता दिल्लींत हल्लीं जो तो बंद गळ्याचे कोट वापरतो.

**विना** : खरंच ?

(बुलनचे कोट बंद गळ्याचे बरे दिसतील, पण सुती कापडाचे बरे दिसतील की काय, या विषयावर थोडा वेळ कडाक्याची चर्चा होते.)

**वाळा** : (बदाम, पिस्ते, खारका वगैरे सुक्या मेव्याच्या बशा टेबलावर आणून ठेवीत) मग कसं खेळायचं—आणा पॉइंट कीं—

**वावू** : पैसा काय नी आणा काय! काय, बुवा विनायक ?

**विना** : मग काय पिसायचे पत्ते ? (पत्ते उचलतो.)

**सवनीस** : आपल्या वाटवे वकिलांची मजा कळली का रे तुम्हांला ?

**वाळा** : नाहीं बुवा.

**सवनीस** : तो लठ्ठ किती आहे तुम्हाला माहीतच आहे. बारीक व्हायच्या औषधाची जाहिरात त्यानं कुठं तरी वाचली, आणि घेऊन आला त्या गोळ्या.

**विना** : नाहीं तरी लग्न झाल्यापासून फारच फुगला होता तो.

**सवनीस** : पुढची गंमत ऐका. पांच दिवस गोळ्या घेतल्या त्यानं, नी मग काय झालं तुम्हांला वाटतं ?

**विना** : काय, बुवा ? (सवनीस त्याच्या कानांत कुजबुजतो.) ह्यः, कांहीं तरीच !

**वाळा + वावू** : (अधीरपणें) काय, काय ?

(विनायक बाळासाहेबांच्या कानांत कुजबुजतो. तो वावूंच्या कानांत सांगतो. सर्वांचीच गडबड उडाली आहे.)

**सवनीस** : पत्ते कुठं आहेत ?

**विना** : (पिसीत) हे काय. (पिसून वांटण्याची तयारी करतो.)

**सवनीस** : मला फार वेळ बसतां येणार नाहीं. परत जाताना मार्केटिंग करायचंय

**विना** : मलाहि जातांना त्या पंजाबी न्हाव्याच्या सलूनमध्यें जायचंय्. केंस कुरळे करायचं त्यानं एक नवीन यंत्र आणलंय म्हणे.

(पत्ते वांटतो)

**वावू** : (पत्ते पाहात) अरे हा राजा कीं गुलाम ?

**विना** : हं. कोण चिड् करतो ?

**वाळा** : चौकटला डायमंड का रे म्हणतात ?

**विना** : अरे हो. बरी आठवण झाली. आमच्या ऑफिसच्या शेजारच्या त्या सिंध्याच्या दुकानांत डायमंडच्या—खऱ्या डायमंडच्या नव्हे—टायपिन्स फार सुंदर आल्यात.

**सवनीस** : काय रे विनायक, तुझ्या गड्याला पगार किती देतोस तूं ?

**विना** : जेवून खाऊन, पस्तीस रुपये. पण काम नाहीं चांगलं त्याचं. (गडी, गड्याचा पगार इत्यादि विषयावर एक दोन मिनिटें कडाक्याची चर्चा.)

**वाळा** : इतका वेळ आपण बोलतों आहोंत, पण तुम्हांला आल्याबरोबर सांगायचं म्हणून मी जें ठरवल होतं तें सांगायचंच राह्यलं

**वाकीचे सर्व** : काय-काय ?

**वाळा** : माझ्या बिनतारी सेटच्या ~~?~~ यांची कमाल झाली !

**सर्व** : काय तें-काय तें ?

**वाळा** : मात्र कुणा कुणाला तुम्ही ही गोष्ट सांगतां कामा नये हं. ज्यानं मला सांगितली त्यानं वचन घेतलंय् माझ्याकडून.

**विना** : हो, हो, पण सांग कीं.

**सवनीस** : काय आहे, बुवा ?

**वावू** : अं ?

**वाळा** : आपल्या ताल्या यादेबद्दल आहे मात्र कुणालाहि तुम्ही सांगतां कामा नये निदान माझ्याकडून तुम्हांला कळलं हें बाहेर येतां कामा नये.

**सर्व** : मुळींच येणार नाहीं.

**वाळा** : मला अगदी निश्चित कळलंय् कीं ताल्याला म्हणे लवकरच—लवकरच—(डोळे मोठे करून मान वर खालीं करतो.)

**सवनीस** : छेः, मला नाहीं वाटत.

**वावू** : खरंच ?

**विना** : पण कधीं ? कोणत्या महिन्यांत ?

**वाळा** : मे म्हणतात

**सवनीस** : मे !

(सर्व जण बोटांवर एक, दोन, तीन, चार मोजतात.)

**विना** : कसं शक्य आहे ?

**वाळा** : तेंच तर. लग्न झालं फेब्रुवारी

(हातांतले पत्ते सर्व जण टेबलावर निरक देतात, आणि गडबडीनें बोलूं लागतात.)

[अनुवादित] पड

● ● ●

*आमचें राज्य !... आमचा राज्यकारभार !... : १४ :*

**राजस्थानी रासलीला !**



## सुरेखा

[पान २७ वरून पुढें चालू ]

दोन महिने माझ्या मनांत एक निःशब्द द्वंद्व चालू होतं. ह्या दोन महिन्यांत मी सुरेखाला कधीं पाहिलं नव्हतं. आणि ह्या दोन महिन्यांत तिचा विचार मला कधीं सुचला नव्हता. आज ना उद्यां ती येईल अशी आशा मी उगाचच बाळगून होतों. पण तसं कांहीं घडलं नाहीं. दोन महिने गेले. अडीच गेले. व तीन गेले! सुरेखा येण्याची कांहींच शक्यता आतां मला दिसेना. आणि तिच्या भेटीची शक्यता ज्या प्रमाणांत नष्ट झाली, त्याच प्रमाणांत तिचा भेटण्याचा माझा हव्यास वाढत गेला. तिच्या माझ्या परिचयांतील लहानलहान प्रसंग मी आठवूं लागलों. तिचं बसणं, तिचं बोलणं, तिचं चालणं, तिचं दिसणं!...

—आणि मधेंच मला वाटूं लागलें कीं, तिचा चेहरा मला नीटसा आठवत नाहीं! तिचा स्वर मला आठवतो, आकृति आठवते; पण तिचा चेहरा संपूर्णपणें मला आठवत नाहीं. केवळ तिच्या चेहऱ्याची स्थूल रूपरेषा मी माझ्या डोळ्यांसमोर उभी करूं शकतो. पण संपूर्णपणें तिचा चेहरा कांहीं मला आठवत नाहीं.

आणि मग मी तिचा चेहरा अगदीं संपूर्णपणें आठवण्याचा प्रयत्न करूं लागलों. पण कधीं मला तिचे नुसते डोळे आठवत, कधीं नुसतं तिच्या गालांचं गोंडस वळण आठवे, कधीं तिच्या हनुवटीवरील तीळ आठवे. पण तिचा संपूर्ण चेहरा कांहीं केल्या मला आठवेना.

त्या प्रयत्नांत माझं डोकं दुखूं लागलं; मला किंचित् कसर भरल्यासारखं वाटूं लागलं! आणि मग सुरेखाला भेटण्याच्या, तिचा चेहरा पहाण्याच्या व तो चेहरा मनोमन गिरवून आजन्म ध्यानांत ठेवण्याच्या माझ्या इच्छेला एखाद्या वेडाचं स्वरूप आलं. दुसरं कांहीं मला सुचेचना! कांहींहि असो, कसंहि दिसो, सुरेखाची आणि माझी भेट झालीच पाहिजे, ती माझ्या दृष्टीला पडलीच पाहिजे, असा अनावर हट्ट माझं मन धरून बसलं. तीन महिने माझ्या ओढाळ मनाला घालून ठेवलेले बांध जागोजाग कोसळले. व वासनेच्या वेगवान् प्रवाहांत वितळून पडले. जें कधीं केलं नव्हतं, तें आतां मी केलं. मी सुरेखाला गड्याबरोबर चिठ्ठी पाठवली : "मी आजारी आहे. असशील तशी ये!"

आणि मग मी केलं तें बरं कीं वाईट, ह्याचा किंचित्हि विचार न करतां मी सुरेखाची वाट पाहूं लागलों. मी आजारी असतां ती आल्याविना रहाणार नाहीं, असंच मला वाटत होतं.

आणि झालंहि तसंच!

सरासरी अर्ध्यापाऊण तासांत सुरेखा माझ्यापुढं येऊन उभी राहिली.

"आजारी आहांत?" पलंगाजवळ येत तिनं विचारलं.

"थोडी कसर आहे. पहा ना!" मी तिच्या दिशेनं हात पुढं केला.

"मला स्पर्श करूं नका!" अतिशय कोरड्या स्वरांत ती म्हणाली, "मी परस्त्री आहे!"

"परस्त्री?" ताडकन् उठून बसत मी म्हणालों, "तुझ्या बोलण्याचा अर्थ? तुझं कधीं लग्न झालं? मला नाहीं कुठं बोलावलंस?"

"माझं लग्न अजून झालं नाहीं. ठरलं आहे. होईल महिनापंधरा दिवसांत!"

मी बसलों होतों तो उभा झालों. व कोरड्या पडणाऱ्या तोंडानं म्हणालों, "आठपंधरा दिवसांत तुझं लग्न होईल? कुणाशीं?"

सुरेखानं तोंडांतून शब्द काढला नाहीं. तिनं खिडकीबाहेर बोट दाखवलं. पदपथावर दिव्याच्या खांबाशीं एक भला आडदांड धष्टपुष्ट पुरुष उभा होता !

" त्या माणसाशीं तूं लग्न करणार ?" मी स्तंभित होऊन विचारलं.

" होय. "

" दिव्याच्या खांबाशीं उभ्या असलेल्या त्या माणसाशीं ? "

पुन्हां एकदां बाहेर त्या माणसाकडे व एकदां सुरेखाकडे मी पाहिलं. त्या तरुण माणसाचे कपडे जेमतेमच होते. त्याच्या चेहेऱ्यावर बुद्धिमत्तेचं तेजहि कुठं दिसत नव्हतं. तो देहानं मात्र भला दांडगा होता.

अविश्वासाच्या स्वरांत मी म्हणालों, " पण सुरेखा, तो माणूस—"

"तो माणूस—तो माणूस—म्हणून त्यांचा उल्लेख करूं नका. ते माझे वाग्दत्त पति आहेत."

"हें लग्न कुणी ठरवलं ?"

"मी ठरवलं. "

"केव्हां ठरवलंस ?"

"गेल्या दोन महिन्यांत !"

"कां ठरवलंस ? "

"हा प्रश्न तुम्ही विचारावा ? हें आतां मला एकोणिसावं वर्ष चालू आहे. मुलींचीं लग्नं फारच तर विसाव्या वर्षापर्यंत झालीं पाहिजेत असं तुम्हीच लिहिलं आहांत !"

"अग, पण तुझी परीक्षा आतां कांहीं महिन्यावर आली आहे—"

"हें बायकांना कारकून करणारं पुरुषी शिक्षण घेत बसण्यापेक्षां लग्न करणं बरं नाहीं का ? लग्न हेंच सर्वसाधारण मुलीच्या आयुष्याचं ध्येय असतं कीं नाहीं ?"

"तो माणू—ते गृहस्थ काय करतात ?"

"व्यायाम शिक्षक आहेत."

"त्यांना पैसे किती मिळतात ?"

"मिळतात शें सव्वाशें रुपये !"

"अग, पण सुरेखा ! आजकालच्या दिवसांत शें सव्वाशें रुपये म्हणजे कांहींच नाहींत. तूं श्रीमंताची मुलगी आहेस."

"मला पैशाशीं लग्न करायचं नाही. पैसा म्हणजे सुख नव्हे !"

" त्यांचं शिक्षण किती झालं आहे ?"

"ते मॅट्रिक आहेत."

"पण तूं बी. ए. च्या वर्गांत आहेस. तुझ्या मानानं त्यांचं शिक्षण –' मला मधेंच थांबवीत सुरेखा म्हणाली, " शिक्षण म्हणजे संस्कृति नव्हे !"

"तुझी आणि त्यांची ओळख कशी झाली ?"

" तेजस्वी राजपूत स्त्रीसारखा आपल्यालाहि जंबिया चालवतां यावा असं मला वाटलं. जंबिया शिकायला म्हणून मी त्यांच्याकडे गेले—"

" आणि त्यांनीं तुला हें शिकवलं ?"

"मग त्यांत काय बिघडलं ! ते माझ्याशीं लग्न करणार आहेत."

"ते तुझ्याशीं लग्न करणार आहेत ह्यांत नवल नाहीं ! पण तूं त्यांच्याशीं कां लग्न करणार आहेस ?"

"कां करूं नये ? त्यांच्यांत काय कमी आहे ? त्यांच्यापाशीं रूप नसेल, पैसा नसेल, फारसं शिक्षणहि नसेल. पण म्हणून काय झालं ?"

"म्हणून कांहींच झालं नाहीं ?"

"नाहीं. पुरुषाचा मोठ्यांतला मोठा गुण त्यांच्यापाशीं आहे. ते फार पराक्रमी आहेत. रागीट आहेत. त्यांच्या अंगांत खूप शक्ति आहे."

“ अग पण सुरेखा, संसार म्हणजे काय नुसते शक्तीचे प्रयोग आहेत ? ”

“ शक्ति हें पुरुषाचं सौंदर्य आहे. सौंदर्य ही स्त्रीची शक्ति आहे. ह्या दोन शक्तींचा संगम म्हणजेच संसार ! ”

“ तुझ्या आईवडिलांना हें सगळं ठाऊक आहे का ? ”

“ अजून नाहीं. पण लवकरच कळेल. एर्वीतेर्वी उघडपणें आम्ही दोघं आतां बरोबर फिरतों, बरोबर सिनेमाला जातों. ग्रीक कॉर्नरमध्यें चारदोनदां जेवायलाहि गेलों होतों. ”

तें वाक्य ऐकून माझ्या काळजाला चिमटा बसला. उद्वेगानं मी उद्गारलों, “ त्या माणसा—त्यांच्याबरोबर तूं सिनेमाला जातेस ? ग्रीन कॉर्नरमध्यें जातेस ? ”

“ होय, जातें. त्यांत काय बिघडलं ? मी त्यांच्याशीं लग्न करणार आहे. ”

“ सुरेखा ” मी कळवळून ओरडलों, तू हें लग्न करूं नकोस ! ”

“ कां करूं नको ? लग्न हाच तर स्त्रीच्या आयुष्याचा मोक्ष आहे ! ”

“ तें खरं आहे, सुरेखा ! पण माझं ऐक. हें लग्न तूं करूं नकोस ! ”

“ हा उपदेश तुम्ही मला करतां ? ” निर्भर्त्सनेच्या स्वरात ती म्हणाली.

“ हो सुरेखा. मी तुला हा उपदेश करतों. मी तुला ही विनंति करतों. पहा, अजून वेळ गेली नाहीं. ”

“ ती वेळ केव्हाच गेली. मी त्यांना मनानं वरलं आहे... ”

“ मनानं वरलं असशील. पण अजून तुमचं लग्न झालेलं नाहीं. अजून वेळ गेली नाहीं. तूं फार भाबडी आहेस, सुरेखा ! फार भावनाप्रधान आहेस. प्रामाणिक आहेस. मी तुला हात जोडून सांगतां, तूं हें लग्न करूं नकोस ! ”

“ हा फ़सवणुकीचा उपदेश तुम्ही मला करतां ? मी त्यांना लग्नाचं वचन दिलं आहे. तें पवित्र वचन तुम्ही मला मोडायला सांगतां ? ”

“ हो. मला वाटतं, फसवणूक तुझी होते आहे. [illegible]

“ तरी ते मला सांगतच होते ! — ”

“ काय सांगत होते ? ”

“ कीं तुमच्याकडे मी येऊं नये— ”

“ असं तो...ते तुला सांगत होते ? ”

“ होय. त्यांची प्रथम तशीच आज्ञा होती. ”

“ आज्ञा ? ”

“ होय. मला आज्ञा करण्याचा त्यांचा अधिकारच नाहीं का ? ”

“ त्या अधिकारात काय सांगितलं त्यांनीं तुला ? ”

“ त्यांनीं सांगितलं कीं, मी तुमच्याकडे आज येण्याचं मुळींच कारण नाहीं. ते म्हणाले कीं, तुमचं नांव फारसं चांगलं नाहीं. तुम्ही आमच्या लग्नांत मोडता घालाल असं ते म्हणाले. ”

“ बरं मग ? ”

“ मग मी त्यांना सांगितलं कीं, ते आजारी आहेत. मला त्यांना भेटलं पाहिजे. ”

“ मग पुढं ? ”

“ तेव्हां पुढं ते म्हणाले कीं, तो माणूस...कसं सांगूं तुम्हांला ? ”

“ सांग—सांग ! ”

“ ते म्हणाले कीं. तो माणूस आजारी असूं दे कीं मरूं दे. मेला तर पीडा गेली. तुला त्याचं सोयरसुतक काय ? तेव्हां मी म्हणालें कीं, ते माझे गुरु आहेत ! ”

“ गुरु ? ” उद्वेगानं मी उद्गारलों.

“ होय. मी म्हणालें कीं, ते माझे गुरु आहेत. मला त्यांना भेटलं

सुरेखानं तोंडांतून शब्द ६

पद्मथावर दिव्याच्या खांबाशीं ओठयानं हंसले. म्हणाले कीं, हें गुरुशिष्येचं नातं

"त्या माणसाशीं तूं लग्न करायला जाशील तर तंगडी मोडून टाकीन!"

"होय. ...डण्याची भाषा आतांपासून करूं लागले का ते?"

"कां करूं नये? ते पराक्रमी आहेत. रागीट आहेत. बाईलबुद्धे नाहींत. मवाळ नाहींत. खरा पुरुष असाच असायला पाहिजे ना? तसेच ते आहेत. मी तुमच्याकडे येण्याची कल्पना नुसती ऐकायला ते सिद्ध नव्हते."

"मग अखेर कसं ऐकलं त्यांनीं तुझं?"

"मी रडले. त्यांच्यासमोर पदर पसरला. त्यांच्या पायावर डोकं ठेवलं."

"तूं त्यांच्या पायावर डोकं ठेवलंस? तूं?" सुरेखाच्या सुंदर मस्तकाकडे पहात मी म्हणालों.

"होय!" तिनं उत्तर दिलं, "मग काय करायचं तर? पति हेंच स्त्रीचं दैवत नाहीं का? त्यांना शरण जाणं मला भाग होतं. तुम्ही आजारी होतां, मला तुम्हांला भेटायचं होतं..."

तिचे ते शब्द ऐकतांच माझ्या काळजांत कालवाकालव झाली. रुद्ध स्वरांत मी म्हणालों, "मला भेटण्यासाठीं तूं त्यांची करुणा भाकलीस?"

"होय." सुरेखा म्हणाली, "मी त्यांच्या पायावर डोकं ठेवलं आणि त्यांना सांगितलं कीं, मी त्यांच्याशीं लग्न करते आहे ह्याला कारण तुमची शिकवण! पुरुषाचं रूप पहायचं नसतं, त्याचा पराक्रम पहायचा असतो, त्याचं सामर्थ्य पहायचं असतं. माणसानं पैशावर किंवा यशावर प्रेम करायचं नसतं, हें सारं मी तुमच्या लिखाणावरून शिकले. मुलींनीं उगाच पुरुषी शिक्षण घेत बसूं नये, त्यापेक्षां त्यांनीं एखाद्या कळकट पुरुषाशीं लग्न करावं, उगाच वय वाढवत बसूं नये, हा सारा उपदेश तुमचाच! मी त्यांना सांगितलं कीं, हा तुमचा उपदेश जर माझ्या वाचण्यांत आला नसता आणि त्याचा अतिशय खोल परिणाम माझ्यावर झाला नसता..."

"तर काय सुरेखा?" धडधडत्या छातीनं मी विचारलं.

"तर मी चार मुलींसारखी बी. ए. झाले असते. कदाचित् नोकरी केली असती. बहुधा लग्नहि केलं असतं. पण तें सारं मी कांहीं हिशेबानं केलं असतं. मी त्या पुरुषाचं यश पाहिलं असतं, पैसा पाहिला असता, रूपहि पाहिलं असतं. आणि मग त्याच्यावर प्रेम केलं असतं..."

"पण तें अगदीं बरोबर झालं असतं, सुरेखा! तें अगदीं बरोबर झालं असतं. थांब. जरा माझं ऐक तर..."

"नाहीं. आतां जास्त वेळ मला इथं थांबतां यायचं नाहीं. त्यांनीं मला दहा मिनिटं दिलीं होतीं. ते बाहेर उभे आहेत!"

"मग त्यांना आंत बोलाव!"

"नाहीं. ते आंत यायचे नाहींत. त्या माणसाच्या घरांत पाऊलसुद्धां टाकायची माझी इच्छा नाहीं असं ते म्हणाले. हें पहिलं आणि शेवटचंच मी तुला त्याच्याकडे जाऊं देतो असं त्यांनीं मला निक्षून सांगितलं..."

"पहिलं आणि शेवटचंच?"

"होय. अगबाई! वेळ होत आली. येते मी. तुम्हांला नमस्कार करते."

"सुरेखा!" माझ्या डोळ्यांत पाणी आलं. हें काय होत होतं व काय झालं होतं, तेंच मला कळेना. माझ्यासमोर वांकलेल्या सुरेखाकडे मी एकदां पाहिलं व एकदां बाहेर उभ्या असलेल्या त्या पुरुषपुंगवाकडे पाहिलं—

आणि त्याच क्षणीं आरोळी आली, "सुरेखा! आलीस कीं नाहींस?"

एखाद्या खोंडाच्या डरकाळीसारखी ती आरोळी होती. आरोळी ऐकतांच सुरेखा कांपऱ्या स्वरांत म्हणाली, "आले—आले—"

आणि माझ्या आशीर्वादाचीहि वाट न पहातां ती निघून गेली!

—वाटेनं जाणाऱ्या त्या दोघांच्या पाठमोऱ्या आकृतींकडे मी बांधल्या दृष्टीनं व भरल्या हृदयानं पहात राहिलों. जोडीनं जाणाऱ्या त्या दोघांचं तें चित्र मोठं विसंगत होतं. मोठं विदारक होतं. व कळत नकळत त्या चित्रांत रंग भरण्याचं काम माझ्या हातून घडलं होतं! माझ्या त्या भयानक कर्तृत्वाकडे मी मूढपणें पहातच राहिलों. अगदीं चार दोन क्षणांत सुरेखानं वळण घेतलं आणि ती माझ्या दृष्टिआड झाली. अजूनहि तिचा किनारा स्वर माझ्या कानांत घुमत होता. अजूनहि तिच्या अत्तराचा गंध माझ्या खोलीत तरळत होता. पण सुरेखा मात्र गेली होती.

वाट मोकळी दिसत होती!

खिडकींतून मी सुरेखा नेहमीं बसत असे, त्या वेत्रासनाकडे धांव घेतली व त्या आसनावर सुन्नपणें मस्त टेकलं. माझ्या डोळ्यांतून आंसवं गळत होतीं. "सुरेखा!" सद्गदित कंठानं मी म्हणत होतों, "सुरेखा!

—आणि कितीतरी वेळ मी तसाच आंसवं ढाळीत होतों!

• • •





हें मासिक श्री. दीनानाथ दलाल यांनीं जगदीश्वर प्रिंटिंग प्रेस, गायवाडी, गिरगांव, मुंबई नं ४, येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२ केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें आहे.


भारताच्या समृद्धीसाठीं
आणि
आपल्या सुखासाठीं
कर्तव्यदक्ष.... सेवातत्पर....!
स्वस्तिक
गमबूट्स्, इंडस्ट्रिअल ग्लव्हज्, होज पाइप्स, इलेक्ट्रिक केबल्स, प्युअर रबर शीटिंग्ज, हॉस्पिटल शीटिंग्ज, हॉट वॉटर बॅग्ज् इ० असंख्य प्रकारच्या रबरी वस्तू तयार करून 'स्वस्तिक' गेलीं अनेक वर्षं आपल्या सेवेसाठीं झटत आहे.
बाजारांत आज स्वस्तिकच्या वस्तूंनाच प्राधान्य मिळतें. कारण त्या शास्त्रीय दृष्ट्या परिपूर्ण असून, दिसतात सुबक, वापराच्या दृष्टीनें दीर्घकाळ टिकाऊ आणि शिवाय मिळतात अगदीं माफक किंमतीं
Swastik
SWATIK CABLE
स्वस्तिक
स्वस्तिक रबर प्रॉडक्टस् लिमिटेड, खडकी, पुणें ३

अनुक्रमणिका

